सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

# नवभारत

वर्ष पहिलें, अंक सातवा एप्रिल १९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादकमंडळ

आचार्य शं. द. जावडेकर | आचार्य स. ज. भागवत
श्री. हरि कृष्ण मोहनी | प्रो. वि. म. वेडेकर (कार्य. संपादक)

व्यवस्थापक : श्री. चिं. य. मराठे

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक–मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक–मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक चिं. य. मराठे यांनीं हें मासिक विश्वास छापखाना, २९१ शनिवार पुणें २, येथें छापिलें आणि नवभारत कचेरी, २१९ शिवाजीनगर, पुणें ५ येथें सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका






# अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

---

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# नवभारत, एप्रिल १९४८

## या अंकांतील लेखक

१ श्री. त्र्यं. सी. कारखानीस ( पुणें )—' महाराष्ट्र नाटक मंडळी'च्या संस्थापकांपैकीं एक असून त्यांनीं मंडळी १५ वर्षें चालविली व पुढें निवृत्त झाले. ' राजाचें बंड ' 'स्वैरिणी' या नाटकांचे कर्ते. नाट्यविषयावरील व्यासंगी लेखक. वयाच्या ७५ व्या वर्षींही त्यांचा व्यासंग चालू आहे.

२ श्री. वि. द. साठे ( पुणें )—नाट्यविषयावरील व्यासंगी अभ्यासक

३ गिरीश ऊर्फ श्री. शं. के. कानेटकर ( सांगली )—विलिंग्डन कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. सुप्रसिध्द कवि. ' आंबराई ' ' मानसमेघ ' इत्यादि काव्यांचे कर्ते.

४ श्री. ना. वि. करवेलकर एम्. एस्सी. ( नागपूर )—सरकारी सायन्स कॉलेजमध्यें रसायनाचे प्राध्यापक. Colloids वर संशोधनपर लेखक. ' हिरवळ ' या कथासंग्रहाचे, ' कल्पवृक्ष ' ' हद्दपार ' आदि नाटकांचे लेखक.

५ श्री. चिं. य. मराठे ( पुणें )—'गांवरान गोष्टी' या सुप्रसिध्द कथासंग्रहाचे लेखक, 'नवभारता'चे व्यवस्थापक.

६ प्रा. ना. पां. गुणे एम्. ए. ( पुणें )—महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक. त्यांनीं प्रा. लागू यांच्या सहकार्यानें तयार केलेले इंग्रजी गद्यवेंचे मुंबई विद्यापीठानें इंटर कामर्स परीक्षेला नेमले आहेत.

७ श्री. दि. के. बेडेकर ( पुणें )—'सोव्हिएट राष्ट्रें व लोक' व 'संयुक्त महाराष्ट्र' या ग्रंथांचे लेखक.

८ श्री. ना. गो. चापेकर ( बदलापूर )—सुप्रसिध्द साहित्यिक व समाजशास्त्रज्ञ. 'समाजनियंत्रण' ' वैदिक निबंध ' इत्यादि ग्रंथांचे लेखक.

९ डॉ. के. ल. दप्तरी ( नागपूर )—प्राच्यविद्यापंडित व ज्योतिर्गणितज्ञ. ' धर्मरहस्य ' ' Social Institutions in Ancient India ' इत्यादि ग्रंथांचे लेखक.

१० श्री. वसंत बापट ( पुणें )—समाजवादी कार्यकर्ते व कवि.



# जॉर्ज बर्नार्ड शॉचें पहिलें नाटक

श्री॰ त्र्यं. सी. कारखानीस

शॉचें हें पहिलें नाटक सन १८९२मध्यें प्रथम रंगभूमीवर आलें. याचा सुरुवातीपासूनचा पूर्वेतिहास मोठा मनोरंजक व शॉच्या जीवनविकासावर प्रकाश पाडणारा आहे. शॉ हा आपल्या वयाच्या विसाव्या वर्षी (इ. स. १८७६) जन्मभूमीला (आयर्लंडला) कायमचा रामराम ठोकून लंडन येथें आला व त्याची आई त्यापूर्वीच तेथें येऊन स्थाईक झालेली होती, तिच्या जवळच राहिला.

आयर्लंडचें कोंदट वातावरण आपल्या महत्त्वाकांक्षेला पोषक नसून उलट मारकच होईल अशी त्याची खात्री पटल्यामुळें तो लंडनला आला होता. तेथें आल्यावर पहिलीं नऊ वर्षें (स. १८७६ ते १८८५) घरीं कादंबऱ्या लिहिण्याचा धूमधडाका आणि बाकीचा सारा वेळ ब्रिटिश म्यूझियममधील वाचनालयांत निरनिराळ्या विषयांचा व्यासंग अशा व्यवसायांत त्यानें घालविलीं. याप्रमाणें सतत नऊ वर्षें चालू केलेला व्यासंग आपण कमींत कमी दहा लक्ष लोकांची उन्नति करण्यास समर्थ व्हावें म्हणून केला असे उद्गार त्यानें एके ठिकाणीं काढले आहेत. हा दहा लक्षांचा अंदाज त्याच्या नाटकांचे प्रेक्षक व प्रस्तावनादि इतर लिखाणांचे वाचक जमेस धरुन मोठ्या सावधगिरीनें केलेला आहे.

## पहिलें नाट्यलेखन—सुरुवात व शेवट.

ब्रिटिश म्यूझियम ही संस्था जगाला नाना तऱ्हांच्या रत्नांचा पुरवठा करणारी एक खाणच आहे. कार्ल मार्क्सनें मरेपर्यंत सतत चौतीस वर्षें तेथेंच अज्ञातवासांत व्यासंग करुन 'डास कॅपिटल' हें रत्न जगाला उपलब्ध करुन दिलें. जवळजवळ पन्नास नाटकें व निरनिराळ्या राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक अशा विषयांवर चर्चात्मक प्रस्तावना लिहिणारा शॉ देखील तेथूनच उदयाला आला. त्याच्या पहिल्या नाटकाचीं वेडीवांकडीं मुळाक्षरेंहि तेथेंच गिरविलीं गेलीं. नाट्यप्रयोगांवर परीक्षणें लिहिणारा व इब्सेनच्या नाटकांचीं भाषांतरें करणारा सुप्रसिद्ध टीकाकार वुइल्यम आर्चर याची व शॉची प्रथम ओळख येथेंच झाली. शॉला नाटकाचें बाळकडूच होतें. "दहा वर्षांचा होण्यापूर्वीच शेक्सपीयर माझ्या रोमरोमीं भरुन गेलेला होता", "विसाव्या वर्षापूर्वीच शेक्सपीयरमधील पात्रांचा व माझा इतका दाट परिचय झालेला होता कीं, तीं मला माझ्या समकालीनांपेक्षांहि जवळचीं वाटत" असे उद्गार त्यानें निरनिराळ्या प्रसंगीं काढलेले आहेत. तेव्हां शॉ व आर्चर यांच्यामध्यें नाटकासंबंधानें साहजिकच चर्चा होत असे. सन १८८५मध्यें अशीच चर्चा चालू असतां शॉनें आर्चरपाशीं आपल्या मनांतील नाट्यनिर्मितीसंबंधीं एक गोम सांगितली; "माझ्या मनांत किती तरी नाट्यप्रसंग, त्यांतील पात्रें, त्यांचे संवाद सारखे घोळत असतात; पण त्यांसाठीं कथानक कांहीं मला जुळवितां येत नाहीं." यावर आर्चरनेंहि आपली गोम सांगितली: "कथानकाच्या रचनेचीं सारीं तंत्रें मला अवगत आहेत. पण त्यांतील पात्रांचे संवाद कांहीं माझ्या मनांत येत नाहींत." याप्रमाणें परस्प-

१ शॉच्या Widower's Houses या समाजवादी नाटकाचा अनुवाद श्री॰ कारखानीस यांनीं केला असून प्रस्तुत लेख हा त्या आगामी अनुवादित नाटकाची प्रस्तावना आहे.








रांच्या हद्दत गोष्टींचा विनिमय झाल्यानें उभयतां-नाहि वाटलें कीं, आपण या बाबतींत सहकार्य केलें तर किती तरी नाटकें आपण निर्माण करूं शकूं. लागलीच आर्चरनें आपल्या मनांत घोळत असलेल्या एका फ्रेंच नाटकाच्या कथानकाची त्या काळीं फ्रान्समध्यें रूढ झालेल्या ठराविक पद्धतीनें मांडणी करून, त्यांत एक गंभीर आणि भावनामय व एक हास्योत्पादक अशा दोन नायिका आणि एकच धीरोदात्त नायक अशीं पात्रें घातलीं. र्‍हाइन नदीकांठच्या एका हॉटेलची बाग पहिल्या प्रवेशासाठीं मुक्रर करून 'र्‍हाइन गोल्ड' असें नांव त्या नाटकाला दिलें आणि पुढील प्रवेशबारीचें टांचण लिहून काढून तें सारें बाड शॉच्या हवालीं केलें. पुढें कित्येक दिवस याबद्दल कोणीच कांहीं बोललें नाहीं. आर्चरला वाटलें, शॉ ही नाटकाची बाब पार विसरून गेला असावा. तो कांहीं तरी एकसारखा लघुलिपीमध्यें झपाझप पानांमागून पानें लिहीत बसलेला त्याला दिसे व 'डास कॅपिटल' वगैरे पुस्तकें शेजारीं असत त्यावरून तो त्यसंबंधीं ग्रंथ लिहीत असावा, असा त्याचा समज झाला. पण पांचसहा आठवडे याप्रमाणें लोटल्यानंतर शॉनें एके दिवशीं हा त्याचा भ्रम नाहींसा करून त्याला चकित करून सोडलें. " हें पाहा, " तो म्हणाला, " आपल्या नाटकाचा पहिला अंक मीं लिहून पुरा केला आहे. पण तुम्हीं सांगितलेलें कथानक त्यांत आलें नाहीं. खरें सांगावयाचें तर मी तें विसरूनच गेलों आहें. तुम्ही पुनः एकदां तें मला सांगा पाहूं ? " हें शॉचें बोलणें ऐकून आर्चर मनांतल्या मनांत चिडून गेला. तरी पण आपलें मन आंवरून त्यानें पुनः आपलें कथानक सविस्तरपणें त्याला सांगितलें. " गरीब लोकांकरितां जुनीं घरें विकत घेऊन तीं भाड्यानें देण्याचा व्यवसाय करणारा एक जमीनदार मीं कथानकांत घेतला आहे हें तुम्हांला आठवत असेलच. त्यांतील भावनामय नायिका ही त्याची मुलगी आहे. नायकाची मात्र समजूत कीं ती त्याची अनाथ व निर्धन अशी पुतणी आहे व तिच्यावर त्याचें प्रेम आहे. पण पुढें त्याचा हा भ्रम नाहींसा होतो. ती निर्धन मुलगी पुतणी नसून जमीनदाराची सधन मुलगीच आहे हें कळल्यानंतर तो धीरोदात्त व ती भावनामय असल्यामुळें उभयतांहि त्या कलंकित म्हणजे गरिबांना पिळून मिळविलेल्या धनाचा त्याग करून विवाहबद्ध होतात, असा नाटकाचा शेवट केला आहे. " आर्चरनें अगदीं गंभीरपणें हें आपलें कथानक सांगितलें आणि शॉनेंहि तितक्याच गंभीरपणें तें ऐकून घेतलें. दोनतीन दिवसांनीं शॉनें आपण कोठवर प्रगति केली त्याचा अहवाल आर्चरला असा सादर केला: " दुसऱ्या अंकाचीं तीन पानें लिहून झालीं असून तुमचें सर्व कथानक त्या तीन पानांतच संपून गेलें. आतां पुढें लिहिण्यासाठीं त्याच्या भरीला थोडेंसें जोड–कथानक द्याल तर बरें होईल. " यावर आर्चरनें जरा रागानेंच त्याला सुनावलें, " माझें कथानक मूलतःच सर्वावयव–पूर्ण आहे. त्याला जोड द्यावयाची म्हणजे आणखी हातपाय जोडायचे कीं काय ? " यावर शॉनें त्याला शांत करण्याचा प्रयत्न करून म्हटलें, " मी दुसरा अंक पुरा करून तुम्हांला वाचून दाखवतों, म्हणजे मी काय म्हणतों तें तुमचें तुम्हांलाच कळून येईल. " आर्चरनें हें मान्य केलें व शॉनें दुसरा अंक पुरा करून त्याला नाटक वाचून दाखविलें. पहिला अंक ऐकत असतां आर्चर कांहींसा संभ्रमित झाला व त्याच्या कपाळावर आंठ्या दिसूं लागल्या. आणि दुसऱ्या अंकाच्या वेळीं तो झोंपून घोरूंच लागला ! मग जागा झाल्यावर " छे ! हें काय नाटक म्हणायचं ? तुमच्यानं तें जमेलसं दिसत नाहीं आणि असल्या नाटकासाठीं सहकार्य करायला कांहीं मी तयार नाहीं. " असा आपला रोकडा अभिप्राय व्यक्त करून आर्चर त्यांतून मोकळा झाला. शॉनें मग आपला स्नेही व त्या वेळचा एक नाटककार हेन्री आर्थर जोन्स याला तें अर्धवट नाटक वाचून दाखविलें व आर्चरबरोबरच्या सहकार्याचा शेवट कसा झाला ती सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून जोन्स म्हणाला, " नाटक ऐकत असतां झोंप येणें हा कांहीं नाटकाबद्दल अनुकूल अभिप्राय म्हणतां येणार नाहीं. " तरी पण स्वतः त्यानें तें नाटक, अखेरपर्यंत जागा राहून त्यांत एखादा तरी रोमहर्षक प्रसंग असेल अशा आशेनें, ऐकून घेतलें. पण त्यांत त्याची निराशाच झाली. "यांत खून, मारामाऱ्या असलं कांहींच नाहीं.








मग याला नाटक कसें म्हणावें ?'' असाच आपलाहि अभिप्राय त्यानें व्यक्त केला. या एकंदर अनुभवानें शॉचा निदान त्या वेळीं तरी असा ग्रह झाला कीं नाटक लिहिणें हें आपल्यासारख्या 'येरा गबाळा'चें काम नव्हे. मग त्यानें तें आपल्या अर्धवट नाटकाचें बाड आपल्या पांच कादंबऱ्यांच्या गळाठ्यांत टाकून देऊन त्याबद्दलचा विचार निदान त्या वेळेपुरता तरी डोक्यांतून काढून टाकला.

## कादंबऱ्यांचें लेखन——आत्मविश्वास

शॉनें आपल्या पांच कादंबऱ्या स. १८७९ ते १८८३च्या दरम्यान लिहिल्या. म्हणजे नाट्य-लेखनाला सुरुवात होण्यापूर्वी त्या लिहिलेल्या आहेत. त्याची पहिली कादंबरी Immaturity (अपरिपक्वता) ही त्याच्या त्या वेळच्या भांडखोर निरीश्वरवादी मनोवृत्तींतून निर्माण झालेली आहे. एका ईश्वरवादी श्रद्धाळु प्रतिपक्षीयाशीं वाद करतांना जरी त्यानें त्याला निरुत्तर केलें तरी त्या प्रतिपक्षीयानें अखेरीला असे उद्गार काढले कीं आपली श्रद्धा जर ढळली तर आपण वेडे होऊन जाऊं. या उद्गारांनीं स्वतः शॉचें हृदयहि द्रवलें आणि त्यामुळें आपण अजून किती अपरिपक्व आहों याची जाणिव त्याला आली. हा स्वतःचा अनुभवच त्यानें त्या कादंबरींत रेखाटला असून प्रांजलपणें Immaturity ( अपरिपक्वता ) असें नांव त्या कादंबरीला दिलें. अशा रीतीनें पुढेंहि त्यानें ज्या कादंबऱ्या लिहिल्या त्या, स्वतः तो जगांत वागत असतांना त्याला जो अनुभव आला त्यांतूनच निर्माण झालेल्या आहेत. केवळ कल्पनेनें लोकांचें रंजन करण्यासाठीं त्या लिहिलेल्या नसून प्रत्यक्ष आपल्या अनुभवाचा जगाला परिचय करुन देऊन त्याला त्याबद्दल विचार करावयाला लावण्या-साठीं लिहिलेल्या आहेत. त्या त्यानें इंग्लंडमधील व अमेरिकेंतील निरनिराळ्या साठ प्रकाशकांकडे प्रसिद्धी-साठीं पाठविल्या; पण सर्वांनीं त्या नाकारल्या. इंग्लंडमधील प्रकाशक मॅक्मिलन् यांचे परीक्षक जॉन मोर्ले यांचा मात्र त्यांची पहिली कादंबरी वाचून, हा लेखक चांगला होतकरू आहे, असा ग्रह झाला. व आपल्या 'द पालमालगॅझेट 'मध्यें लेखक म्हणून उपयोगी पडेल असें वाटून त्यांनीं त्याला 'तुम्ही कोणत्या विषयावर लिहूं शकाल ?' असा प्रश्न विचारला. शॉनें 'आपण ललितकलेवर लिहूं शकूं' असें सांगितलें. यावर जॉन मोर्ले नाक मुरडूनच उद्गारले, 'ऊं:! ललितकलेवर काय, कोणीहि लिहूं शकेल'. शॉनेंहि त्याला उलट, 'अस्सं ? कोणीहि लिहूं शकेल ?' असा-टोमणा देऊन चीत करून टाकलें ! हा त्या तरुणाचा दर्प पाहून मोर्लेनें त्याचा नादच सोडून दिला. अशा प्रकारें, कादंबऱ्यांच्या प्रकाशनाबाबत जरी त्याला अगदीं कटु अनुभव आला, तरी त्यामुळें तो खचून गेला नाहीं. उलट त्याचा स्वाभिमान जागृत झाला. यशापयश व स्तुतिनिंदा यांबद्दल तो अगदीं बेफि-कीर झाला. जॉन मोर्ले यांच्या पहिल्या कादंबरी-वरील अभिप्रायाचा रोख लक्षांत आल्यानें त्याची खात्री झाली कीं आपलें लिखाण वाङ्मयदृष्ट्या कमी प्रतीचें खास नाहीं. त्याला जो विरोध होतो तो, त्यांत जुन्या परंपरागत विचारसरणीच्या त्या वेळच्या व्हिक्टोरियन काळाला अत्यंत विरोधी विचारसरणी त्यांत प्रतिपादिली आहे म्हणून होतो, अशी त्याची खात्री झाली. व्यावहारिक दृष्टीनें जरी आपल्या पदरीं अपयश आलें तरी परंपरागत विचारसरणीला विरोधी असा आपला प्रगतीचा संदेश देण्याचे दृष्टीनें आपली लेखणी प्रभावी आहे, असा आत्मविश्वास त्याचे ठायीं जागृत झाला व कांहीं काळ चरितार्थासाठीं निरनिराळ्या वृत्तपत्रांत संगीत, चित्रकला व नाट्य-प्रयोग यांवर टीकात्मक परीक्षणें लिहिण्याचा व्यवसाय केल्यावर, संधि मिळतांच, तो पुनः आपल्या स्वाभा-विक प्रवृत्तीला अनुसरुन नाट्यलेखनाकडे वळला.

## 'स्वतंत्र नाट्यमंदिर' संस्था

## (The Independent Theatre)

ही संधि त्याला नाट्यलेखनाचा आपला पहिला प्रयत्न सोडून दिल्यापासून सात वर्षांनीं मिळाली. जे. टी. ग्रीन या नांवाच्या एका डचमननें सन १८९१मध्यें The Independent Theatre ( स्वतंत्र नाट्यमंदिर ) या नांवाची संस्था स्थापन केली. ग्रीन हा एक नवीन विचारसरणीचा धाडसी कर्मयोगी होता. त्यानें यापूर्वी इब्सेनचें Ghosts ( मृत विचारसरणींचीं पिशाचें ) हें नाटक इंग्लंडच्या रंगभूमीवर आणून मोठी खळबळ उडवून दिली होती ! त्यानेंच ही नवीन संस्था काढलेली होती.










इंग्लंडची रंगभूमि त्या काळीं कांहीं थोडीं जुनीं नाटकें वगळल्यास, बहुतेक परकीय–विशेषतः अर्वाचीन फ्रेंच नाटकांनीं व्यापलेली होती. म्हणून केवळ स्वदेशी अशीं नवीन विचारसरणीचीं नाटकें रंगभूमीवर आणण्यासाठीं ही संस्था काढण्यांत आली; पण तशीं नाटकें धुंडाळण्याचा प्रयत्न करूनहि ग्रीनला तीं मिळेनात. शॉला ही गोष्ट असह्य झाली. त्यानें सन १८८५ सालीं अपुरें म्हणून टाकून दिलेल्या आपल्या नाटकाचें बाड शोधून काढलें. सात वर्षांनीं पुनः तें वाचून पाहतां त्याला आढळून आलें कीं, ज्या विचारसरणीमुळें तें सन १८८५ सालीं आर्थिक दृष्ट्या रंगभूमीला स्वीकारतां आलें नसतें, त्याच विचारसरणीमुळें तें ग्रीनच्या ' स्वतंत्र नाट्यमंदिर ' संस्थेला इष्ट असेंच आहे. म्हणून त्यानें तें पुरें करुन ग्रीनच्या हवालीं केलें व ग्रीननेंहि लागलींच त्याचा रॉयल्टी थिएटरमध्यें स. १८९२च्या डिसेंबरमध्यें पहिला प्रयोग केला.

## खळबळ उडवणारें पहिलें स्वदेशी नाटक

शॉचें हें पहिलें स्वदेशी नाटक रंगभूमीवर आलें तो काळ म्हणजे व्हिक्टोरिया राणीची कारकीर्द. ' व्हिक्टोरियन एज् ' या नांवानें तो प्रसिद्ध आहे. या काळाचा विशेष म्हणजे जुन्या परंपरागत चालीरीतींची व विचारसरणीची लोकांच्या मनावर पुरी पकड बसलेली होती हा होय. राणीचें साम्राज्य जगभर पसरलेलें व राजधानी लंडन म्हणजे जगाला भांडवल पुरवणारी कुबेर–नगरी ! पुढारलेल्या प्रतिष्ठित वर्गाला हा काळ म्हणजे मानवी उन्नतीच्या परमोत्कर्षाची सीमा वाटत असे. भांडवलशाही–प्रणीत समाजरचना आर्थिक विषमतेवर उभारलेली असली, तरी जगभर सत्ता गाजवणाऱ्या साम्राज्यापासून मिळणाऱ्या फायद्यामुळें तेथील कामगार–वर्गाला तितकीशी जाचक झालेली नव्हती. धार्मिक व सामाजिक चालीरीती अशा समाजरचनेला पोषकच असल्यामुळें त्या साहाजिकच रुढ झालेल्या होत्या. अशा या काळांत समाजांतील आर्थिक व्यवहार कसे गलिच्छपणानें चाललेले आहेत या गोष्टीवर लख्ख प्रकाश पाडणारें हें नाटक प्रथमच रंगभूमीवर आलें, तेव्हां उदयोन्मुख समाजवादी विचारसरणीच्याच प्रेक्षकांनीं तेवढें त्याला जोरानें उचलून धरलें; पण गतानुगतिक वृत्तीच्या लोकांनीं त्याहूनहि अधिक जोरानें त्याचा धिक्कार केला ! प्रयोगाचे शेवटीं उभयतांनींहि नाटककाराला रंगभूमीवर आणून त्याला बोलायाला लावलें. शॉनें आपल्या भाषणांत गतानुगतिकांना, त्यांनीं कडवा विरोध दर्शवून कां होईना पण त्या नाटकाविषयीं आस्था दाखविल्याबद्दल धन्यवाद दिले. उदासीन राहून त्यांनीं उपेक्षा केली असती तर आपली फार निराशा झाली असती असें तो म्हणाला. मात्र ' टीकाकारांनीं नाटककार व नट यांना एकाच दावणींत गोवूं नये; नटांविषयीं तरी त्यांनीं अवश्य सहृदयता दाखवावी; कारण त्यांनीं आपली जबाबदारी कसोशीनें व कौशल्यानें पार पाडलेली आहे; नाटककारावर वाटेल तितकी कडक टीका करा; पण नटांशीं सहानुभूतीनें वागा ' अशी विनंति त्यांनें केली. त्या विनंतीनुसार नाटककारावर वृत्तपत्रांतून भयंकर भडिमार सुरू झाला ! उलटसुलट चर्चाहि होऊं लागल्या. एकंदरींत या नाटकानें त्या वेळीं बरीच खळबळ उडवून दिली ! त्यामुळें आपण कडव्या विरोधानें कां होईना पण गतानुगतिकांचींहि मनें हलवून सोडूं शकतों याबद्दल त्याची खात्री झाली व आपण जन्मजात नाटककार आहों असा आत्मविश्वास त्याला वाटूं लागला.

## छेः ! हें नाटकच नव्हे

पण स्वतः शॉला जरी हा आत्मविश्वास वाटला व त्या आत्मविश्वासामुळें तो नाटकांमागून नाटकें लिहूं लागला, तरी त्या काळचे टीकाकार, बहुसंख्य प्रेक्षकवर्ग इतकेंच नव्हे, तर नट यांना मात्र तो नाटककार म्हणून पटेचना. त्याच्या या पहिल्या नाटकावर जी टीकेची झोड उडली, तींत टीकाकारांनीं ' हें नाटकच नव्हे तर एका समाजवादी विक्षिप्तानें लिहिलेलें प्रचारपत्रक आहे; नाटक म्हणजे काय व तें कसें लिहावें याचा गंधहि त्याचे अंगीं नाहीं, ' असा आपला अभिप्राय व्यक्त केला.

लोकांना शॉ हा नाटककार म्हणून पटेचना, याला त्या काळच्या अनेक रुढ झालेल्या कल्पना कारणीभूत आहेत. त्यांपैकीं The Well-made Plays च्या (कृत्रिम बांधेसूद नाटकांच्या) पद्धतीच्या त्या काळीं प्रचारांत आलेल्या नाटकांचा लोकांच्या मनावर बसलेला पगडा हें एक प्रमुख कारण होय. असल्या

# जॉर्ज बर्नार्ड शॉचें पहिलें नाटक

नाटकांचा एक ठराविक सांचा, सूत्र किंवा तंत्रच बनून गेलेलें होतें. एकाद्या नाट्यप्रसंगाची कल्पना घ्यावयाची, त्यासाठीं सोयीचें अर्थात कृत्रिम असें कथानक रचावयाचें, मध्यंतरीं कांहीं-तरी गैरसमजुतीचा विच्छेद निर्माण करावयाचा व अखेरीस खुलासे, प्रतिखुलासे करुन सर्व विच्छेदांची सांधासांधी करावयाची व नाटकाचा शेवट करावयाचा, असा या नाटकांचा ठराविक सांचा आहे. अर्थात्च नाट्य--रचनेची ही पद्धति कृत्रिम आहे हें वेगळें सांगावयास नकोच. शेक्सपियरसारखे नैसर्गिक म्हणजे 'बीजांकुर—न्याय'—पद्धतीनें लिहिणारे नाटककार त्या काळीं मागें पडले होते. हेन्री आयर्व्हिंगसारखे प्रमुख नट त्या काळीं शेक्सपियरचें पुनरुज्जीवन करण्याचा आव आणीत होते. पण तेहि काळाच्या ओघानुरूप त्याच्या कृतींत छाटाछाट करुन व तिला विकृत स्वरूप देऊनच करीत होते हें लक्षांत घेतलें पाहिजे. "Shakespeare in his integrity was then unknown in the theatre" (अखंड शेक्सपियर त्या काळीं रंगभूमीवर दिसतच नसे,) असे उद्गार शॉनें त्या काळासंबंधानें लिहितांना काढले आहेत. अन्यत्र वरील ठराविक सांच्यांच्या नाटकांचाच प्रसार प्रामुख्यानें होत होता. हा सांचा प्रथम फ्रान्समध्यें निर्माण झाला. सारडो, स्क्राइब, यांसारखे नाटककार तेथें उदयाला आले. इंग्लंडमध्यें पिनेरो हा या पद्धतीचा पुरस्कर्ता म्हणून त्या काळीं पुढें आला. या सर्व नाटककारांचे ठायीं बुद्धिकौशल्य (Talent) असल्याकारणानें त्यांनीं या पद्धतीला एक प्रकारें अभिजातपणा प्राप्त करुन देऊन टीकाकारांकडून मान्यता मिळविली होती. प्राथमिक शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार त्या काळीं झालेला असल्यामुळें समाजांत असा एक बहुसंख्य वर्ग निर्माण झालेला होता कीं त्याची प्रवृत्ति वकऱ्यांकोंबड्यांच्या झुंजी किंवा निव्वळ तमाशे पाहण्यापेक्षां चुरचुरीत व खमंग अशीं वृत्तपत्रें वाचणें व तशींच नाटकें पाहणें याकडे वळली होती व भांडवलशाही-प्रणीत उद्योग-धंद्यांची वाढ झाल्यामुळें या वर्गाच्या हातीं मुबलक पैसाहि खेळूं लागला होता, त्यायोगें या प्रवृत्तींत भरच पडली होती. आपल्या समाजांतहि अलीकडे हेंच दृश्य आपणांस पाहावयास मिळत आहे. प्राथमिक शिक्षणापलीकडे या वर्गाची बौद्धिक वाढ झालेली नसल्यानें अर्थात्च या बहुसंख्य वर्गाच्या अंगीं शेक्स्पीयरसारख्या नाटककारांचीं अभिजात नाटकें समजण्याची व त्यांचा आस्वाद घेण्याची पात्रता आलेली नव्हती आणि म्हणून साहजिकच त्यांचा ओढा सुटसुटीत, समजण्यास सोपीं व खमंग अशीं हीं कृत्रिम व बांधेसूद नाटकें पाहण्याकडेच अधिक असे. समाजांत असा बहुसंख्य वर्ग निर्माण झाला, कीं त्यांच्यासाठीं अशाच प्रकारचीं अधिकाधिक नाटकें लिहिणारा वर्गहि आपोआप निर्माण होतो. अशीं नाटकें लिहावयास प्रतिभा लागत नाहीं; बुद्धि-कौशल्य असलें कीं काम भागतें. बुद्धिकौशल्य म्हणजे नुसती प्रज्ञा. पण तीच नवनवोन्मेषशालिनी म्हणजे क्षणाक्षणाला नवेंनवें तेज प्रसवणारी असेल तरच ती प्रतिभा या नामाभिधानाला पात्र होते. प्रतिभा ही सृष्टीप्रमाणेंच सृजनधर्मी असते. सृष्टीनें निर्माण केलेल्या पुष्पवल्लीला नित्य नवीं पुष्पें येतात, त्याप्रमाणेंच प्रतिभेनें निर्माण केलेली कृति नित्य नवेंनवें तेज प्रकट करते. बुद्धिकौशल्य सृष्टीप्रमाणें हुबेहूब दिसणारी पुष्पवल्ली बनवूं शकेल; पण तिला नवीं नवीं पुष्पें आलेलीं कांहीं दिसावयाचीं नाहींत. शॉचें हें नाटक अन्य दृष्टीनें शेक्स्पियर-सारख्या नाटककारांच्या तोडीचें नसलें तरी रचना-पद्धतीच्या दृष्टीनें त्यांच्याप्रमाणेंच 'बीजांकुर—न्याय'—पद्धतीचें आहे, पिनेरो वगैरेंच्या कृत्रिम बांधेसूद रचना-पद्धतीचें नाहीं. म्हणून तशीं नाटकें पाहण्याचा सराव झालेल्या बहुसंख्य प्रेक्षकांना व टीकाकारांना हें आतां वेगळ्या पद्धतीचें वाटणारें नाटक प्रथमच त्यांच्यापुढें आल्यामुळें बुजल्यासारखें होऊन त्यांना हें नाटक असें वाटेचना.

दुसरें कारण म्हणजे त्यांतील विचारसरणी. भांडवलशाही समाजरचनेंतील आर्थिक व्यवहार गरीब जनतेच्या दृष्टीनें कसे पिळवणुकीचे व गलिच्छ असतात हें या नाटकांत उघड करुन दाखविलें आहे. पुढें या नाटकाचें संविधानक दिलें आहे त्यावरुन हें कळून येईलच. आपल्या व्यवहाराचें हें गलिच्छ स्वरुप ज्या नाटकांत उघडेंनागडें करुन दाखविलें आहे तें नाटक भांडवलशाही मनोवृत्तीच्या








श्रेष्ठ व मध्यम वर्गांच्या लोकांना अर्थातच रुचलें नाहीं. त्या वेळचा बराचसा प्रेक्षकवर्ग व टीकाकार हे या वर्गांपैकींच असल्यामुळें त्यांनीं या नाटकावर टीकेची कशी झोड उडविली हें पूर्वी सांगितलेंच आहे.

तिसरें कारण म्हणजे आतांपर्यंत शेक्स्पियरप्रभृति पूर्वींच्या सर्व नाटककारांच्या नाटकांत रंगविलेलीं निर्लेप मानवी पात्रेंच पाहण्याचा लोकांना झालेला सराव. शॉनें आपल्या नाटकांत अशीं अगदीं निर्लेप मानवी पात्रें न रेखाटतां इब्सेनप्रमाणें त्या काळच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक व धार्मिक संप्रदायांच्या दडपणाखालीं सांपडलेलीं पात्रें कशीं वावरतात हें दाखविलें आहे. त्या संप्रदायांत लोकांचे हितसंबंध गुंतलेले असल्यामुळें ते त्यांना जिव्हाळ्याचे झालेले असतात. मग त्यांची छाननी करुन ते कसे अनिष्ट आहेत हें कोणीं दाखविलें तर तें लोकांना कसें रुचावें ? शॉनें आपल्या या नाटकांत हेंच केलेलें असल्यामुळें लोकांत या नाटकानें मोठी खळबळ उडवून दिली ! हें तिसरें कारण फार महत्त्वाचें असून तें अधिक सविस्तर समजावून घेण्याची अवश्यकता आहे. त्यासाठीं एक स्वतंत्र लेखच लिहावा लागेल व तो मी पुढें लिहिणारहि आहें.

याशिवाय, त्या काळीं 'भावना-शील आदर्श-कल्पनावादा'चा ("Sentimental Idealism चा) लोकांच्या मनावर पगडा होता हेंहि एक कारण विचारांत घेतलें पाहिजे. युरोपांत पंधराव्या शतकांत ज्ञानाचें पुनरुज्जीवन ( Renascence ) झालें, त्यांतून या वादाचा उदय झालेला आहे. प्रथम प्राचीन अभिजात साहित्याबद्दलचा उत्कट अभिमान ( Classicism )व पुढें साहित्याचें शास्त्र बनविणारा नव-अभिजात साहित्य-वाद ( Neo-classicism ) निर्माण झाला, विधिनिषेधपर दंडक घातले गेले. आपल्या प्राचीन संस्कृतींतहि अशीं विधिनिषेधपर अनेक शास्त्रें निर्माण झालेलीं आहेत. त्यांपैकीं पाश्चिमात्य काय किंवा पौर्वात्य काय दोन्ही नाट्य-शास्त्रांत असा एक दंडक आहे कीं नाटकांतील नायक आदर्शवत् म्हणजे भारतीय नाट्यशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें धीरोदात्त वगैरे प्रकारांपैकींच एकाद्या प्रकाराचा असला पाहिजे. कालिदासानें मूळ महाभारतांतील दुष्यंत नैसर्गिक मानवी प्रवृत्तीचा असूनहि त्याला आदर्श म्हणजे धीरोदात्त नायक बनविला याचें कारण हेंच होय. या नव-अभिजात साहित्य-वादाचा इंग्लंडमध्यें सतराव्या शतकांत होऊन गेलेला प्रमुख पुरस्कर्ता टॉमस रायमर यानें आपल्या The Tragedies of the last age considered वगैरे ग्रंथांत या वादाच्या अनुरोधानें जी टीका केली आहे ती हल्लींच्या काळीं किती विचित्र व हास्यास्पद वाटणारी आहे ! त्यानें शेक्स्पियरच्या आयागो अशक्य कोटींतील ठरविला आहे ! कारण, आयागो हा शिपाई गडी; आणि शिपाई गडी हा सच्चा व प्रामाणिकच असावयाचा, तो खलपुरुष असणें शक्यच नाहीं. अशा प्रकारचा या भावनामय आदर्श कल्पनावादाचा पगडा इंग्लंडमधील जुन्या परंपरेला मान देणाऱ्या व्हिक्टोरियन काळांतील प्रेक्षक व टीकाकार यांच्या मनांवर कमीअधिक प्रमाणावर बसलेला होताच. शॉनें आपल्या या नाटकांत अशा प्रकारचा एक आदर्शवादी परंपरेंतील भावनाशील नायक आर्चरनें सुचविल्याप्रमाणें घेतला आहे; पण प्रत्यक्ष आर्थिक व्यवहाराचें ज्ञान होतांच त्याच्या बुद्धिशून्य भावनेचा भ्रमनिरास कसा होतो हें त्यानें पुढें दाखविलें आहे. वास्तवाचें असें केलेलें हें दिग्दर्शन त्या काळचे काल्पनिक आदर्शवादी प्रेक्षक व टीकाकार यांना अगदीं रसहीन व रुक्ष असें गद्य वाटलें. म्हणून त्यांनीं त्यावर "छेः ! हें काय नाटक ? निव्वळ समाजवादी विचारसरणीचें हें एक प्रचार-पत्रक आहे" असा शिक्का मारला ! त्याबद्दलची आपली तुच्छता व बेपर्वाई दर्शविण्यासाठीं उलट शॉनेंहि आपल्या पुढील नाटकांना 'चर्चा', 'संवाद', अशा प्रकारचीं उपनामें देऊन त्या शिक्क्याची संभावना केली !

वर सांगितल्याप्रमाणें शॉनें आपल्या नायकाचा भ्रमनिरास झालेला दाखवून जगाची वास्तवता निदर्शनास आणली हें इतरांप्रमाणें आर्चरलाहि मान्य झालें नाहीं. त्याचें म्हणणें असें कीं 'त्या नायकानें गरिबांना पिळून मिळविलेल्या कलंकित धनाचा त्याग करुन आपल्याप्रमाणेंच भावनाशील असलेल्या

आपल्या प्रियकरणीशीं विवाह केला व सन्माननीय गरिबींत तो समाधानानें आयुष्य कंठीत आहे असें दाखवून नाटकाचा शेवट करावयास हवा होता. हें आर्चरचें म्हणणें कसें अव्यवहार्य व असमर्थनीय आहे हें हल्लींच्या आपल्या राजकारणांतील कार्यकर्त्यांच्या प्रत्यक्ष वर्तनावरूनच निःसंदिग्धपणें दाखवितां येईल. हे कार्यकर्ते आपली राष्ट्रसेवा काळा बाजार करून व गरीब कामगारांना पिळून गबर होणाऱ्या भांडवलदारांकडून निरनिराळ्या पर्यायांनीं मिळणाऱ्या मदतीवरच करीत आहेत, हें उघड रहस्य सर्वांना ठाऊकच आहे. त्यांनीं जर हें 'कलंकित' धन म्हणून त्याचा त्याग करण्याचा मार्ग पत्करला, तर वायुभक्षण करूनच आपल्या राष्ट्रसेवेची तपश्चर्या करण्याचा प्रसंग त्यांच्यावर येईल. पण हा त्याग ते अर्थात्च करीत नाहींत; यावरून आर्चरचेंच म्हणणें कसें अव्यवहार्य व असमर्थनीय आहे हें सिद्ध होतें. शॉनें आपल्या या नाटकाचा शेवट आर्चरच्या असल्या अव्यवहार्य मार्गानें केला नाहीं हें योग्यच केलें असें म्हटलें पाहिजे.

या एकंदर कारणांचा विचार केला म्हणजे The Independent Theatre (स्वतंत्र नाट्यमंदिर) या संस्थेचा हा पहिला स्वदेशीय नाटककार इंग्लंडमधील रंगभूमीचें एक नवें युग निर्माण करणारा ठरतो व त्या दृष्टीनें त्याचें हें पहिलें नाटक क्रांतिकारक आहे असें म्हटलें पाहिजे.

## संविधानक

या नाटकाला Plot म्हणजे कृत्रिम कथानक नाहीं, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. जें कांहीं आहे तें 'बीजांकुर-न्याया'नें विकसित होत जाणारें संविधानक किंवा गोष्ट (Story किंवा Tale) आहे. चार्लस् लँबनें शेक्सिपयरच्या संविधानकांचें जें पुस्तक लिहिलें आहे त्याला त्यानें गोष्टी (Tales) असेंच नांव दिलें आहे. येथें हा जो Plot म्हणजे कथानक व Story किंवा Tale म्हणजे संविधानक असा फरक करून दाखविला आहे तो करण्याची आवश्यकताच साहित्यशास्त्रज्ञांना अद्यापपर्यंत भासली नाहीं. शास्त्रज्ञ हे प्रयोगशरण असतात. त्यांच्यासमोर अशा प्रकारचा फरक करून दाखविण्याची आवश्यकता उत्पन्न करणारा प्रयोगच (Practice) आला नाहीं. पण अलीकडे Well—made Plays (कृत्रिम रचनेचीं नाटकें) हा एक नवा प्रकार अस्तित्वांत आल्यामुळें हा फरक विशेष ठळक रीतीनें करून तो लोकनिदर्शनास आणणें प्राप्त झालें आहे. तसेंच या नाटकाचें संविधानक वस्तुतः अगदीं साधें आहे; पण त्यांत जे आर्थिक व्यवहार[1] दाखविले आहेत ते आज आपल्या समाजांत घडत असूनहि सामान्य जनतेला त्यांची तितकीशी जाणीव आलेली नाहीं. म्हणूनहि संविधानक साध्या गोष्टीसारखें सांगून भागणार नाहीं. संविधानकांतील घटनांचीं कारणें आर्थिक व्यवहारांतून उद्भवलेलीं असल्यामुळें त्या व्यवहाराच्या भाषेंतच सांगितल्यास तीं समजतील. म्हणून संविधानक त्या भाषेंतच सांगणें प्राप्त आहे.

या नाटकाचें संविधानक पुढें दिल्याप्रमाणें आहे:— गरिबांना परवडतील अशीं वसतिस्थानें (Slums) म्हणून अगदीं जीर्ण झालेलीं घरेंच मुद्दाम विकत घेऊन त्यांतील खोल्या घनफुटांच्या हिशेबानें भाड्यानें देऊन एखाद्या प्रासादापेक्षांहि अधिक भाडें कमावणारे लंडनमधले एक जमीनदार (Slum-landlord) सारटोरियस हे युरोपमध्यें (Continent-वर) प्रवास करण्याकरितां निघाले आहेत व ते

[1] मुंबईंत आज अनेक वर्षें हे व्यवहार घडत आहेत. सन १९०८च्या सुमारास 'महाराष्ट्र नाटक मंडळी'चा मुक्काम तेथें असतांना मला स्वतःला ते पाहण्याचा एकदां योग आला होता. कोंकणांतील एका खोताबरोबर त्यांच्या कुळांचा शोध घ्यावयासाठीं एका दाट वस्तीच्या भागांत गेलों असतां एका इमारतीच्या पायांतील भुयारांत अंधारमय चिंचोळ्या कोंदट खोल्या असून त्या खोल्यांतून प्रत्येकीं वीसपंचवीस तरी कुळें राहत असल्याचें आढळून आलें. गरिबांकरितां केलेलीं हीं वसतिस्थानें! यांनाच इंग्रजींत Slums हा शब्द आहे. यांचें भाडें घनफुटाच्या हिशेबानें आकारलें जातें असें शॉनें आपल्या स्वतःच्या आयर्लंडमधील अनुभवावरून आपण नाटकांत दाखविलें असल्याचें आर्चरच्या टीकेला उत्तर देतांना सांगितलें आहे.








विधुर असल्यामुळें त्यांच्याबरोबर फक्त मिस् ब्लॅन्शी ही त्यांची आईविरहित पोरकी एकुलती एक मुलगीहि आहे. जर्मनींतील ऱ्हाइन नदींतून बोटीनें प्रवास करुन ते नदीकांठीं असलेल्या रॅमेजेन या गांवीं एका हॉटेलांत उतरतात. नुकतीच वैद्यकीय परीक्षा पास झालेले लंडनमधीलच डॉ० ट्रेंच हे आपले प्रवासी मित्र मि० कोकेन यांच्यासह त्याच बोटीनें प्रवास करीत असतात, तेहि त्याच हॉटेलांत येऊन उतरतात. बोटीवर असतांच डॉ० ट्रेंच व मिस् ब्लॅन्शी यांच्यामध्यें परस्परांविषयीं प्रेम उत्पन्न झालेलें असतें. या त्यांच्या प्रणय–विवाहाला सारटोरियस मान्यता द्यावयास तयार असतात. पण डॉ० ट्रेंच यांची आप्तमंडळी उच्चवर्णीय आहेत असें त्यांच्या निदर्शनास येतें. तेव्हां आपली मुलगी तर सामान्य-वर्गीतील असल्यामुळें तिची त्यांच्याकडून कदाचित् उपेक्षा होईल अशी त्यांच्या मनांत शंका येते. म्हणून ते डॉ० ट्रेंच यांना अट घालतात कीं त्यांनीं आपल्या आप्तांना ही गोष्ट कळवावी आणि त्यांच्याकडून या विवाहाचें स्वागत करणारीं आलेलीं पत्रें जर त्यांनीं हजर केलीं तरच आपण या विवाहाला मान्यता देऊं. डॉ० ट्रेंच यांना याबद्दल खात्री असते; म्हणून ते ही अट कबूल करतात. पुढें सारटोरियस हें सुरबिटान या गांवीं भाड्यानें घेतलेल्या आपल्या बंगलींत राहावयास जातात व जातांना आपले भावी जामात व त्यांचे मित्र मि० कोकेन यांना तेथें आपल्याकडे पाहुणचारासाठीं येण्याचें आमंत्रण देऊन ठेवतात. येथेंच दुसऱ्या अंकाला सुरुवात होते.

डॉ० ट्रेंच यांना त्यांच्या अपेक्षेप्रमाणें आप्तांकडून स्वागतपर पत्रें आलेलीं असतात. तीं घेऊन मोठ्या उत्साहानें ते आपल्या मित्रासह सुरबिटानला येतात. पण त्याच वेळीं लिक्चीज् हा सारटोरियस यांचा वसुलीकामगार वसुलीचे पैसे व हिशेब देण्यासाठीं लंडनहून आलेला असतो. त्याच्या व्यवहारांत कांहीं गैरशिस्त प्रकार आढळून आल्यामुळें सारटोरियस त्याला आपल्या नोकरींतून कमी करतात. तो पोराबाळांचा पोशिंदा असल्यानें या अचानक बडतर्फीमुळें अगदीं हताश होतो व पुढें डॉ० ट्रेंच हे आपल्या मालकाचे भावी जामात आहेत हें कळल्यानें तो त्यांना आपल्याबद्दल त्यांच्यापाशीं रदबदली करण्याविषयीं गळ घालतो. डॉ० ट्रेंचना त्याची कींव येते; पण सारटोरियस हें योग्य कारणावांचून अशी भलती गोष्ट करणार नाहींत अशी त्यांना खात्री वाटत असल्यामुळें ते ही गोष्ट नाकारतात. लिक्चीज् त्यामुळें चिडून जाऊन सारटोरियस यांचें वास्तविक स्वरुप त्यांच्या निदर्शनास आणतो. त्यांची सारी कमाई कशी गरिबांना पिळून काढून म्हणजे गैरमार्गानें मिळविलेली आहे हें यामुळें डॉ० ट्रेंच यांना कळतें, त्यांच्या भावनामय आदर्शवादी मनाला त्यामुळें धक्का बसतो व ते मिस् ब्लॅन्शीला विवाहसमयीं आंदण म्हणून बापाकडून कांहींहि न घेण्याची अट घालतात. पण ती त्यांच्याप्रमाणें आदर्शवादी नसून पक्की व्यवहारवादी असल्यामुळें त्यांची अट मान्य करीत नाहीं. इकडे डॉ० ट्रेंच यांनीं सारटोरियस यांना आपलीं पत्रें दाखविल्यामुळें त्यांचें समाधान होऊन ते विवाहाला आपली संमति देतात. पण डॉ० ट्रेंच जेव्हां त्यांना आपली अट सांगतात तेव्हां ते त्याबद्दल खुलासा विचारतात. तो ऐकल्यावर सारटोरियस हे डॉ० ट्रेंच यांसहि सारें उत्पन्न अप्रत्यक्षतः कसें गैरमार्गानेंच मिळत असतें हें त्यांच्या निदर्शनास आणून देतात. कारण त्यांचें उत्पन्न प्रत्यक्षतः जरी व्याजाच्या रुपानें मिळत असलें तरी तें व्याज त्यांनीं सारटोरियस यांनाच जमिनीच्या तारणावर दिलेल्या रकमेचें असतें आणि तें गरिबांना पिळून मिळविलेल्या भाड्याच्या पैशांतूनच सारटोरियस त्यांना देत असतात. आपल्या उत्पन्नाचें हें वास्तविक स्वरुप कळल्यावर डॉ० ट्रेंच यांचा आपल्या उत्पन्नाच्या सोंवळेपणाबद्दलचा सर्व भ्रम नाहींसा होतो व आपण आणि सारटोरियस हे एकाच मालिकेंतील असल्यामुळें नसता अभिमान व्यर्थ आहे हें ओळखून ते मुकाट्यानें विवाहाला तयार होतात. पण सारटोरियस ही आनंदाची वार्ता आपल्या मुलीला सांगावयास गेले असतां ती मानीपणानें त्या वार्तेचा धिक्कार करते व आपणाला आतां विवाहच करावयाचा नाहीं असा आपला निर्धार त्यांना सांगते. सारटोरियस यांना अर्थातच तो ऐकून फार खेद होतो; पण आपल्या आईवेगळ्या पोरक्या मुलीला, तिच्या इच्छेविरुद्ध वागून दुःख देणें










## जॉर्ज बर्नार्ड शॉचें पहिलें नाटक

त्यांच्यानें होत नाहीं. ते डॉ० ट्रेंचशीं जमत आलेला संबंधच तोडून टाकतात व आपला प्रवासाचा पुढील कार्यक्रम तहकूब करून परत लंडनला आपल्या घरीं येतात. यापुढील अंकाच्या घटना अर्थात् तेथेंच घडलेल्या आहेत.

सारटोरियस आपल्या मुलीच्या निर्धारानें फार दुःखी झालेले असतात व पुनः कोठेंतरी प्रवासाला जावें अशा विचारांत असतात. इतक्यांत अनपेक्षितपणें त्यांचा नोकरींतून काढून टाकलेला वसुलीकामगार लिक्चीज् त्यांचेकडे येतो. तो बेकार झाला होता तरी जात्या हुशार व आर्थिक व्यवहारांतला अनुभवी असल्यामुळें स्वस्थ बसला नव्हता. स्वतंत्रपणें व्यवहार करून त्यानें आपला जम चांगला बसविला होता. एका फायदेशीर व्यवहाराचा सुगावा लागतांच त्यांत अवश्य असलेल्या सहकारितेसाठीं प्रथम तो आपल्या पूर्वीच्या मालकाकडेच आला होता. त्या व्यवहारांत डॉ० ट्रेंच यांचेकडे तारण असलेल्या जामिनीचा संबंध असल्यामुळें सारटोरियस यांच्या संमतीनें त्यांनाहि तो मग घेऊन येतो. डॉ० ट्रेंच व मिस् ब्लॅन्शी यांचे परस्परांतील संबंध बिनसले असल्याचें त्याला कळलेलें असतें. ही गोष्ट आपला व्यवहार जुळून येण्याचे दृष्टीनें प्रतिकूल वाटल्यामुळें तो मोठ्या कुशलतेनें त्या उभयतांची भेट जुळवून आणतो. मानवी मनाचे गुंतलेले धागेदोरे कसे आपोआप सुटतात याचें त्याला ज्ञान असल्यानें व त्या उभयतांचें आंतून खरोखर प्रेम आहे हेंहि तो जाणत असल्यानेंच तो ही भेट जुळवून आणतो. अर्थात् त्याच्या अपेक्षेप्रमाणेंच त्या भेटीचें पर्यवसान परस्परांच्या मीलनांत होतें व नाटकाचा शेवट होतो.

नाटकांत डॉ० ट्रेंच यांचा प्रवासांतील मित्र म्हणून मि० कोकेन हें जें एक हास्योत्पादक पात्र आहे, तें 'सेंट् जोन्'मधील ड स्टोगम्बर व 'सीझर आणि क्लियोपाट्रा'मधील ब्रिटॅनस इत्यादि शॉच्या पुढील नाटकांत येणाऱ्या हास्योत्पादक पात्रांचा आगाऊ नमुनाच आहे.

### निष्कर्ष

हें नाटक रंजनार्थ नसून वस्तुस्थितीवर प्रकाश पाडणारें व तीव्र विचार करावयास लावणारें आहे. समाजांतील घाणेरड्या अनिष्ट गोष्टी या दृष्टीआड सृष्टि म्हणून मानल्या जातात. आपण त्या मनांत आणावयाचेंहि टाळतों. आपल्या हातून असल्या गोष्टी प्रत्यक्ष घडत नसतलि तर त्या केवळ दैवयोगामुळें; आपण त्याबद्दल सावधगिरी घेतों अशांतला भाग मुळींच नसतो. दैवाचा योग आला तर तसल्या गोष्टी आपल्या हातून घडणारच नाहींत असें म्हणतां यावयाचें नाहीं. या नाटकांत जे आर्थिक व्यवहार दाखविले आहेत ते नित्याच्या व्यवहारांतीलच आहेत. म्हणजे वेळ आली तर आपल्याहि हातून तें घडणें शक्य आहे असाच त्याचा अर्थ. पण त्यांची नैतिक जबाबदारी त्या व्यवहारांतील कोणाहि एकाच व्यक्तीवर किंवा घटकावर मात्र टाकतां यावयाची नाहीं. गरीब लोकांचीं गलिच्छ वसतिस्थानें हा जो या नाटकांतील मुख्य प्रश्न त्यांत त्या वसतिस्थानांत राहणारे गरीब लोक ही जशी समाजांतलि एक अनिष्ट बाब, तसेंच, तीं वसतिस्थानें चालविणारा जमीनदार व त्यांचें भाडें वसूल करणारा वसुली कामगार याहि तितक्याच अनिष्ट बाबी होत. पण ज्या प्रचलित समाजरचनेमुळें या बाबी निर्माण होतात त्या समाजरचनेला आपण सारेच जबाबदार असल्यामुळें ती समाजरचनाच आमूलाग्र बदलल्यावांचून या अनिष्ट गोष्टी नाहींशा होणार नाहींत असा जो निष्कर्ष या नाटकांत काढला आहे तो योग्यच आहे. टीकाकारांनीं हें नाटक म्हणजे 'समाजवादी प्रचारपत्रक' असा जो शिक्का यावर मारला आहे तो यथार्थच आहे, असें म्हटलें पाहिजे.

रशियन राज्यक्रांतीमुळें समाजवाद सर्व जगभर फैलावला आहे. आपल्या देशांतहि 'समाजवादी पक्ष' म्हणून एक संघटित पक्ष निर्माण झालेला आहे. नाटक हें एक प्रचाराचें प्रभावी साधन आहे, म्हणून त्याच्या प्रचाराला उपयोगीं पडावें या हेतूनेंच या शॉच्या समाजवादी नाटकाचा अनुवाद मीं केला आहे. प्रयोगरूपानें त्यानें याचा उपयोग करून घेतला तर माझा हेतु सार्थकीं लागल्यासारखें होईल. जे. टी. ग्रीनसारखे नवीन विचारसरणीचे धाडसी कर्मयोगी पुढें आले तरच हें शक्य आहे.








## नाटकाचें नांव

या नाटकाच्या नांवासंबंधानेंहि खुलासा करणें अवश्य आहे. कारण, नुसतें नांव वाचून अर्थबोधच होत नाहीं. Widower's Houses याचा शब्दशः अर्थ विधुरांचीं घरें असा होतो. पण प्रत्यक्ष नाटकाशीं या नांवाचा संबंध समर्पक रीतीनें जोडून दाखविणें जवळजवळ अशक्य आहे. स्वतः शॉनें या संबंधानें लिहितांना " I gave it the far-fetched scriptural title of the Widower's Houses" (मीं या नाटकाला 'विधुरांचीं घरें' हें नांव दूरान्वयानें बायबलमधीलच दिलेलें आहे.) असें म्हटलें आहे. या विधानांत अभिप्रेत असलेला बायबलमधील उल्लेख एकच स्वरूपांत तीन ठिकाणीं आढळून येतो तो असाः— " Woe unto you Scribes, Pharisees, Hypocrites! for, ye devour widows' Houses and for a pretence make long prayers; therefore ye shall receive the greatest damnation." याचा मथितार्थ असाः— " हे धर्मनिर्णय देणारे ज्यूइश दांभिक हो! तुम्ही विधवांच्या घरांचा अपहार करतां व आपल्या या पापांच्या क्षालनासाठीं देवाची करुणा भाकण्याचें ढोंग करतां; पण तुम्हांला घोर नरकाचीच प्राप्ति होईल. " या उल्लेखांत 'Widows' (विधवा) असा शब्द आहे, 'Widowers' (विधुर) असा नाहीं. पण नाटकांतील प्रमुख पात्र सारटोरियस हे विधुर आहेत व त्यांनीं गरिबांकरितां घरें बांधलेलीं आहेत, येवढ्यावरूनच नाटकाला Widower's Houses (विधुरांचीं घरें) हें नांव दिलेलें दिसतें.

———

लंडनमध्यें नुकताच एक आयरिश क्लब स्थापन झाला. त्या क्लबच्या स्थापनेच्या वेळीं बर्नार्ड शॉ यांना निमंत्रण देऊन ' आपण आपला या क्लबास आशीर्वाद द्यावा ' अशी विनंति केली. शॉनीं एका पोस्टकार्डावर खालील अर्थी आपला आशीर्वाद पाठविला—

" इंग्लंडमधील आयरिश लोकांनीं इंग्लिश क्लबचे सभासद व्हावें. एकमेकांची संगत त्यांनीं प्लेगप्रमाणें मानून ती कटाक्षानें टाळावी.

"जर बदकाप्रमाणें एकत्र जमून त्यांना आपला 'कळप'च करावयाचा असेल, तर त्यांनीं आपलें आयर्लंड सोडून यावयाला नको होतें. एकमेकांबद्दल त्यांना आदर वाटत नाहीं, आपापसांत स्नेहभावनाहि नाहीं !—

"इंग्लिश क्लबमधून ते हवेसेच आहेत. अर्थात् इंग्रज लोक त्यांच्यापेक्षां अधिक मूर्ख असतील. पण ते दोघेहि एकमेकांना इतके पारखे व अपरिचित आहेत कीं परस्परांच्या संगतींत आणि सहकार्यांत त्यांना पुष्कळच शिकतां येण्यासारखें आहे. "












# तमाशाचें लोकनाट्यांतील स्थान

श्री. वि. द. साठे

वृत्तपत्रांतून " मुम्बई—सरकारनें तमाशांचे प्रयोग बंद करण्याचें ठरविलें असून यापुढें तमाशांच्या कार्यक्रमांना परवाने देण्यांत येऊं नयेत व जुन्या परवान्यांची मुदत संपल्यावर ती पुढें वाढविण्यांत येऊं नये असें जिल्हाधिपतींना कळविण्यांत आलें आहे " अशी बातमी प्रसिद्ध होऊन सहा महिन्यां हून अधिक कालावधि लोटला आहे व ह्या काला वधींत सरकारी धोरणावर भरपूर टीकाहि झालेली आहे. परंतु या बाबतींत जबाबदार सरकारी अधिकाऱ्यांनीं आपल्या धोरणाच्या समर्थनार्थ कांहींहि खुलासा प्रसिद्धीस दिलेला पाहण्यांत आलेला नाहीं. राष्ट्राची धुरा खांद्यावर घेतलेले सुशिक्षित अधिकारी आपल्या अशिक्षित बांधवांच्या कलांकडे जर केवळ सुशिक्षित पांढरपेशा वर्गाच्याच दृष्टिकोनांतून पाहून त्यांबद्दल एकदम कांहीं अटीतटीचे निर्णय घेण्याचें ठरवितील तर त्यामुळें ते सामाजिक प्रगतीचा विशेष टप्पा न गांठतां उलट अविश्वासाचे व अप्रीतीचे धनी मात्र होण्याचा संभव आहे ! तमाशाबंदीबाबतच्या सरकारी धोरणामुळें ह्याच प्रकारचा धोका संभवतो. ह्या धोक्याची स्वच्छ कल्पना यावी या हेतूनें तमाशाची पूर्वपीठिका, तंत्र, अद्ययावत् राष्ट्रीय परंपरा, महत्त्व व उपयुक्तता थोडक्यांत सांगून त्यांत सुधारणा होण्याच्या दृष्टीनें कांहीं विधायक सूचना करण्याचें प्रस्तुत स्थळीं योजिलें आहे.

## तमाशाची उत्पत्ति व त्याचा विकास

इतिहास—पुराणांवरून असें स्पष्ट दिसतें कीं भाटचारण हे वीरांची स्तुति करून त्यांस युद्धास प्रवृत्त करीत, तसेंच ते युद्धानंतर त्यांची करमणूक करून त्यांना रिझविण्याकरितां शृंगारिक कवनें रचून गातहि असत. तमाशा हा प्रकार असाच आहे.

तमाशा हें मूळच्या 'तमाशा' या अरबी शब्दाचें मराठी रूप आहे. ' मनाला आनंद देणारें दृश्य ' असा त्याचा अर्थ आहे. ( ' चित्तको प्रसन्न करनेवाला दृश्य ' —शब्दार्थ—पारिजात. ) हा एक नाट्यप्रकार आहे येवढेंच नव्हे, तर मराठी रंगभूमीचा पाया तयार होण्यास कारणीभूत झालेल्या ललित-दशावतारादि नाट्यप्रकारांच्या इतकाच महत्त्वाचा नाट्यप्रकार आहे, याबद्दल विद्वानांत जरी मतैक्य असलें तरी हा प्रकार मराठींत केव्हां व कोणाकडून आला याबद्दल मात्र मतभेद आहेत. ' मराठी रंगभूमि '—कर्ते श्री० आ. बि. कुलकर्णी यांच्या मतें " तमाशे हे मुसलमानी अमदानींत सुरू झाले असून बादशाही वैभवाबरोबर जे कांहीं चैनीचे व करमणुकीचे प्रकार अस्तित्वांत आले त्यांत यांची गणना होते; व पुढें यांचेंच अनुकरण मराठी राज्यांत झालें " ( पृ. ३ ). 'मराठी नाट्यसृष्टि—पौ० नाटकें '—कर्ते प्रा० वि. पां. दांडेकर यांच्या मतें " तमाशाचें मूळ कानडी तमाशांत असण्याचा संभव आहे. " महाराष्ट्रांतील एक पट्टीचे रसिक व विद्वान् सरदार आबासाहेब मुजुमदार यांच्या मतें तमाशाची उभारणी मुख्यतः जिच्यावर झालेली असते, ती ' लावणी ' केवळ पेशवाईमध्येंच महाराष्ट्रांत उत्पन्न झाली असें दिसत नाहीं. प्राचीन काळापासून शिव व शक्ति यांची उपासना करणारे उपासक आपापल्या उपास्य देवतांचें महत्त्व दाखवून दोहोंपैकीं कोण श्रेष्ठ हें सांगणारीं काव्यें म्हणून दाखवीत असत व तीच पद्धत आजपावेतों रूढ आहे. 'शिवपक्ष' म्हणजे आजचा ' तुरे-












वाला पक्ष ' व ' शक्तिपक्ष ' म्हणजे आजचा ' कलगीवाला पक्ष ' होय. लावणी म्हणणारांमध्यें ' कलगिवाले ' व ' तुरेवाले ' असे दोन मोठे पक्ष आहेत. एकानें पौराणिक गोष्टींचे प्रश्न विचारतांच तावडतोव दुसऱ्यानें त्यांचें बिनचूक काव्यमय उत्तर दिलें पाहिजे व त्यास तसें देतां आलें नाहीं तर त्याचा पाडाव झाला असें समजून व पहिल्या पक्षास विजयी समजून बक्षीस देण्यांत येतें. मतभेद कांहींहि असले तरी तमाशा हा महाराष्ट्राच्या सह्याद्रीवर व त्याच्या पठारावर शिलेदारी गाजविणाऱ्या वीरांच्या जीवनांत निर्माण झाला असून त्यांतच फोंफावला व तो त्याचा अविभाज्य घटक बनला यांत शंका नाहीं.

तमाशाला प्रेरक अशा शाहिरी वाङ्मयाचा विकास मुख्यत्वेंकरून इ. स. १७६० ते १८४०च्या दरम्यान—विशेषतः सवाई माधवराव व दुसरे बाजीराव यांच्या कारकीर्दीत झाला. ह्याच कालखंडांत एकीकडे मोरोपंत—वामनादि पंडित कवि प्रायः अध्यात्मपर, निवृत्तिपर व संस्कृत—प्रचुर पर—पुष्ट असें काव्य लिहीत होते, तर दुसरीकडे रामजोशी, अनंतफंदी, गंगू हैबती, होनाजी बाळा, प्रभाकर, सगनभाऊ, कुशाबा, परशुराम, साताप्पा गवळी, धोंडिबा गवळी वगैरे शाहीर—मंडळी ऐहिक, प्रवृत्तिपर व अस्सल मराठ—मोळ्या वळणाचें शाहिरी काव्य निर्माण करीत होती. अर्थातच या दोन्ही परंपरांचीं ध्येयक्षितिजें अगदीं भिन्न—मार्गी होतीं. पंडित कवींना उच्चवर्णीय, सुशिक्षित वर्गाच्या श्रोत्यांना बौद्धिक आवाहन करावयाचें होतें, तर शाहिरांना बहुजनसमाजांतील निरक्षर व अप्रगल्भ अशा शेतकऱ्यांच्या, कामकऱ्यांच्या व सैनिकांच्या भावनांना प्रायः आवाहन करावयाचें होतें. गण-मात्रांच्या रेखीव, कांटेकोर बंधनांत शब्दांची कसरत करण्यांतच पंडित कवींच्या प्रतिभेला प्रसन्नता वाटे, तर कटाव, फटके, लावण्या वगैरे अक्षरवृत्तांच्या ऐसपैस क्षेत्रांत मोकळेपणानें बावरण्यांत जातिवंत व प्रतिभासंपन्न शाहिरांना मौज वाटे. परंतु त्यांचा मुख्य भर असे तो पोवाडे व लावण्या यांवरच. शाहिरांचे स्वतंत्र फड असत आणि भरपूर लावण्या व इतर आवश्यक सरंजाम पदरीं असलेला शाहीर त्यांच्या आधारावर तमाशा करून वाटेल तेवढें धन आपल्या पायाशीं ओढून आणूं शकत असे. विशेषतः तमाशांत ज्या प्रकारच्या लावण्या म्हटल्या जातात त्यांविषयीं लिहीत असतांना श्री० आबासाहेब मुजुमदार यांनीं "पठ्ठे बापूराव यांच्या ढोलकीवरील लावण्या, भाग १ " या लावणी—संग्रहाच्या प्रस्तावनेंत लावणी व तिचें तमाशांतील स्थान व तमाशाचें एकंदर तांत्रिक स्वरूप या विषयींच्या मूलभूत मुद्दयाची मोठी सूक्ष्म व मार्मिक चर्चा केलेली आहे. या चर्चेचा आशय थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे:—

" लावणी हा एक गायनाचा कवित्वप्रकार ( ख्याल, होरी, टप्पा, ठुंबरी, फटका, भूपाळी, कजरी वगैरेंप्रमाणें ) आहे व ती म्हणण्याचीहि धाटणी कांहीं विशिष्टच आहे. जो चांगला धृपदिया, ख्यालिया अथवा टप्पेवाला आहे, त्याला लावणी म्हणतां येईलच असें मुळींच नाहीं. ......लावणी गाण्याचे तीन प्रकार मुख्य समजले जातात: ( १ ) बैठकीची अथवा तंबुरीची, ( २ ) कडे--ढोलकीची, ( ३ ) तबला—पेटीच्या साथीवर बैठकीची. प्रत्येक लावणी तुटक तुटक असते. परस्पर—संदर्भ त्यांमध्यें मुळींच नसतो. एकेका लावणींतच एकेक विषय संपतो. परंतु कडेढोलकीच्या लावण्या तशा नसून त्या एकाद्या संविधानकांतील कथेप्रमाणें परस्पर-संदर्भ असलेल्या असतात. म्हणजे एक सबंधच्या सबंध गोष्ट असून तिचा विस्तार या लावण्यांतून केला जातो. यांत गद्य व पद्य दोन्हीहि असतात. दोन लावण्यांचा संदर्भ दाखविणारें जें भाषण करतात त्याला 'संपादणी करणें' असें म्हणतात व असा संपादणी करणारा जो इसम त्याला 'सोंगाड्या' असें म्हणतात. हा संपादणी करणारा फार हुषार, प्रसंगावधानी, चतुर, हजरजबाबी व थट्टेखोर असावा लागतो. तो कांहीं कांहीं श्लेष, दृष्टान्त, उपमा वगैरे अलंकार करतो ते फार बहारीचे असतात. ... लावणी ही बहुधा निरनिराळ्या रागदाऱ्यांत म्हणतात. तथापि ती प्रायः मिश्र रागांत म्हटली जाते. ज्या लावण्या संविधानकांत म्हटल्या जातात, त्या संविधानकास 'बग' म्हणतात. हे बग तमाशांत लावावयाचे म्हणजे त्याकरितां साधारणपणें सात इसम







अवश्य असतात. तुणतुणेंवाला, मंजिरीवाला, ढोलकीवाला, कडेवाला, नायिका, नायक व एक सोंगाड्या— सम्पादणी करणारा. 'जीगऽजीगऽ, सावळे रामा, दाजीऽजीऽ' इत्यादि जे पूरणार्थी शब्द उच्चारतात त्यांना 'झील' म्हणतात व हे शब्द जो म्हणतो त्यास 'झीलकरी' म्हणतात.''

## तमाशाच्या लोकप्रियतेची अखण्ड परंपरा

मराठी राज्यांत बहुजनसमाज ज्या आस्थेनें व अगत्यानें तमाशेवाल्यांना आश्रय देत असे ती आस्था व तें अगत्य दिडशें वर्षांच्या पारतंत्र्याच्या कालखंडानंतरहि काडीमात्र कमी झालेलें नाहीं. आजकालची नाटकें वा चित्रपट हे तमाशाची लोकप्रियता हिरावून घेऊं शकलेले नाहींत. खेडेंगांवांतले शेतकरी, गिरण्यांतले मजूर, इंग्रजी पद्धतीनें तयार झालेल्या कवायती फौजेंतील सैनिक हे पूर्वीच्याच आस्थेनें अजूनहि तमाशाचें स्वागत करीत आहेत. स्वदेशी राजसत्ता असतांना तमाशेवाल्यांना उमाप पैसा व निवडक शाहिरांना कायमचीं वतनेंहि मिळत. रामजोश्यांनीं उतार वयांत काशीस जाण्याची इच्छा व्यक्त करतांच पुणेंकरांनीं एका बैठकींत चौदा हजारांची रक्कम त्यांच्या उपरण्यांत टाकली ! त्यांना पेशव्यांकडून सव्वाशें रुपयांचें जें वर्षासन मिळें तें आजतागायत त्यांच्या वंशाकडे चालू आहे. सवाई अनंतफंदींनीं गायकवाडींत ( बडोद्यास ) जें पांचशें रुपयांचें वर्षासन मिळविलें तें अद्यापपर्यंत त्यांचेकडे चालत आहे येवढेंच नव्हे, तर फंदींचे वंशज बडोद्यास गेले म्हणजे शहरांत येण्याकरितां सरकारची गाडी, छत्री, मशाल पाठवून देण्याची चाल अद्यापपर्यंत आहे. परशुरामास लावण्या करण्याची सनद मिळाली होती व त्याचा शिष्य भवानी तेली ( बाकेराव ) ह्यास सयाजीराव गायकवाडांकडून तीनशें रुपयांची नेमणूक व शंभर रुपयांचा पोषाख दरसाल चालू आहेत. राजसत्ताधीश अशा प्रकारें तमाशेवाल्यांचा जो परामर्ष घेत तो आजकाल अगदीं तसाच्या तसा जरी घेतला जात नसला तरी विभागशः व थोड्या अल्प प्रमाणांत कां होईना पण घेतला जातोच; म्हणजे तमाशाच्या लोकप्रियतेची परंपरा अखंड चालू आहे. पेशवाईंत ती अगदीं कळसाला पोंचली होती. तत्कालीन पुण्याचें पुढील वर्णन या दृष्टीनें पाहणें उद्‌बोधक होईलः— ''... दिव्यांत वात पडली नाहीं तों मंदिरांत चौघडे, सनया यांचा मंजुळ घोष, श्रीमंतांच्या व सरदार लोकांच्या वाड्यांत सरकारी ताफ्यांचे मुजरे, रात्रीस रस्त्यांत आणि बोळांत फिरणाऱ्या विलासी लोकांचीं मनें ओढून घेणारे तुकतेच चिमणी, साळू, मैना यांच्या मंजुळ कंठांत होनाजी बाळानें घातलेले खडे सूर आणि फौजेकडील शिलेदार, बारगीर, शिपाई आणि शहरांतील सुखवस्तु शिंपी, माळी, सराफ, दुकानदार यांस रिझविण्याकरितां बहिरू मल्हारी, धोंडी बापू, सगनभाऊ आणि रामा गोंधळी यांनीं सजविलेले तुणतुण्याचे तमाशे आणि कलगीतुऱ्यांतील भांडणें हे सर्व थाट पुणें शहरांत जेथें तेथें गाजून राहिले होते !'' ( ''केकावली–प्रस्तावना.'' दादोबा पां. तर्खडकर ) इंग्रजी अमदानींतहि नव्या युगांतील विचारांचे संस्कार झालेले विद्वान् देखील या तमासगिरांना यत्किंचितहि कमी लेखत नव्हते. निबंध-मालेंत **विष्णुशास्त्री चिपळूणकर** लिहितात, '' वर्णमाधुर्याची ज्याच्या कानास कांहीं लेश म्हणून ओळख असेल, शब्दांचा सुंदरपणा व खुमारी हीं ज्यास यत्किंचित् कळत असतील, तसाच त्यांचा झोंक व प्रौढपणा हे ज्यास थोडे तरी समजत असतील, स्त्रियांच्या लावण्याचा डोळ्यांवर व हृदयावर कसा व्यापार घडतो याचा ज्याला लवलेश अनुभव असेल त्यास रामजोशी यांचें कवन थरारून टाकील यांत संशय नाहीं.'' लोकमान्य टिळकांनीं राजकीय प्रचाराकरितां तमाशाचा केलेला उपयोग व त्याबद्दल झालेल्या जप्त्या व शिक्षा जुन्या पिढींतील मंडळींच्या स्मृतींत अजूनहि अगदीं ताज्यातवान्या आहेत. १९४२च्या प्रचंड राजकीय आंदोलनांत व तदनंतरहि राजकीय जागृतीकरितां व सामाजिक व धार्मिक अन्यायांचें स्वरूप समाजांतल्या अगदीं खालच्या थरापर्यंत कळविण्याकरितां तमाशाचा उपयोग अतिशय झालेला आहे. या पद्धतीचे तमाशे लिहिण्याचें कार्य साताऱ्याचे सुप्रसिद्ध शाहीर निकम, औंधचे माडगुळकर बंधू, पार्ल्याचे पु. ल. देशपांडे बी. ए., एल्‌एल्. बी., पुण्याचे वसंतराव बापट बी. ए. वगैरे मंडळींनीं अत्यंत यशस्वीपणें करून दाखविलेलें आहे. तमाशाचा उपयोग प्रचारा-








करितां करणाऱ्या या मंडळींच्याच जोडीला केवळ लोकरंजनाचाच मर्यादित हेतु मनापुढें ठेवून तमाशे करणारे अलीकडील काळांतील सुप्रसिद्ध तमासगीर म्हणजे शिवा महार, धोंडू दगडू (महार), भाऊ बापू (मांग), दगडू साळी व श्रीधर कृष्ण ऊर्फ पठ्ठे बापूराव कुलकर्णी होत. हे सारे तमासगीर महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाचें रंजन करण्याचें काम अत्यंत तन्मयतेनें व सातत्यानें गेलीं कित्येक वर्षे करीत आहेत. त्यांचा आत्मविश्वास तशीच कलेवरील त्यांची श्रद्धा प्रचंड आहे. उदा०, पठ्ठे बापूरावांची स्वानिवेदनात्मक अशी पुढील लावणी पाहा:

" श्रेष्ठवर्ण मी ब्राह्मण असुनी
सोंवळें ठेवलें घालुनी घडी ॥
मशाल धरली हातीं तमाशाची ।
लाज लावली देशोधडी ॥ १ ॥

दर्शन झालें महापुरुषाचें
सहस्र वेळां लक्ष घडी ॥
पुनीत केलें त्या भवानीनें,
बुद्धि सुचवली कवित्व जडी ॥२॥

जडतां जडतां दिला अक्षय वर ।
नित्य लेखणी राहील खडी ॥
वाचा होईल सिद्ध रोकडी;
रंगुन वाणी देईल प्रौढी ॥३॥

महत्त्वाकांक्षा मनांत येवढी,
ठेवुनी बाजुला हजार नडी ॥
आपुण तरोनी कैक तारावे,
भवबंधाच्या पैलथडी ॥४॥

तमाशाद्वारें रंजन वा प्रचार करीत असतांना तमासगिरांच्या हातून अतिरेक होण्याची शक्यता अर्थातच आहे. परंतु या दोषांतून कोणताच कलाप्रकार सुटत नाहीं, हें ज्यांना मान्य असेल ते केवळ ह्या अतिरेकास्तव करण्यांत येणाऱ्या तमाशाबंदीची कल्पना अत्यंत अप्रस्तुत व अनुचित मानतील. ह्या अतिरेकाची परंपरा जुनी आहे; तमाशाची उज्ज्वल परंपरा सांगत असतांना तिचें विस्मरण बिलकुल झालेलें नाहीं. निजामाच्या दरबारांत नाना फडणिसांचीं व सवाई माधवरावांचीं आणलीं गेलेलीं तमाशांतील सोंगें, सत्यशोधक समाजाच्या पुढाऱ्यांनीं केलेला तमाशाचा दुरुपयोग, केवळ वर्गकलह वाढविण्याकरितांच तमाशांचा उपयोग करणारे आपलेच्च कांहीं 'भाईबंद', शृंगाराला अश्लील स्वरूपांतच रंगविण्याचा परिपाठ ठेवणारे कांहीं ताफेवाले—हें सगळें डोळ्यापुढें आणूनहि केवळ त्यांच्याकरतां, 'तमाशा'हा नाट्यप्रकारच महाराष्ट्रांतून हुसकून लावण्याचें धोरण बिलकुल पटण्यासारखें नाहीं. उण्यापुऱ्या अडीचशें वर्षांच्या परंपरेचें पाठबळ असलेला, बहुजन-समाजांत या घटकेपर्यंत कमालीचा लोकप्रिय असलेला, अस्सल व उत्कट अशा मराठमोळ्यांच्या काव्याला जन्म देणारा, आधुनिक कालांतील नाटकें व चित्रपट यांच्यामुळें ज्याच्या लोकप्रियतेंत कादीभरहि कमीपणा येऊं शकला नाहीं इतक्या कसाचा व ताठ्याचा आणि सामाजिक व राजकीय जागृतीचें बाळसें नुकतेंच धरूं लागलेला हा महाराष्ट्रीय नाट्यप्रकार केवळ त्यांतील कांहीं अपवादरूप दोषांस्तव अजीबात नष्ट करण्याचा निर्णय घेण्यापूर्वी आमच्या मुंबई-सरकारनें त्याबाबत फेरविचार करणें अत्यवश्य नाहीं काय ?

## तमाशाची लोकाभिमुखता

लोकशाहीच्या या काळांत एकंदर मराठी वाङ्मयच अधिकाधिक लोकाभिमुख होत चाललें आहे. ग्रामीण जीवनावर आधारलेल्या व ग्रामीणांना समजेल नी उमजेल अशा भाषेंत लिहिल्या जाणाऱ्या ललितवाङ्मयाचें प्रमाण वाढतें आहे. माटे, माडगुळकर, दिघे, सोमण, वरेरकर, ठोकळ, मराठे यांच्या लघुकथा, दिघे, ठोकळ व ना. वि. कुलकर्णी यांच्या कादंबऱ्या, फडतरे व शिरधनकर यांच्या शिकार-कथा, वऱ्हाडी व कोंकणी लोकगीतांचे व कथांचे प्रसिद्ध झालेले संग्रह, हीं सर्व अशा वाङ्मयाचीं अगदीं ठोबळ उदाहरणें म्हणून दाखवितां येण्यासारखीं आहेत. नाट्यवाङ्मयाला लोकवाङ्मयाच्या प्रांगणांत उतरविण्याचें कार्य फार पूर्वीपासूनच सुरू झालेलें आहे. माधवराव पाटणकर, नेवाळकर, वरेरकर, मा. ना. जोशी या नाटककारांनीं बहुजनसमाजाच्या चित्ताचा ठाव घेऊं शकणारा तमाशा हा नाट्यप्रकार व किर्लोस्करी








संप्रदायांतील प्रायः उच्चवर्णीयांच्या अभिरुचीला आवाहन करणारीं नाटकें यांचा समन्वय घालण्याचा प्रयत्न आपल्या नाटकांच्या द्वारें बुद्धिपुरःसरच केलेला आढळतो. सध्यां तर राष्ट्रीय सेवादल, समाजसत्तावादी पक्ष व कम्यूनिस्ट पक्ष हे अगदीं अहमहमिकेनें तमाशामार्फत लोकजागृतीचें कार्य जास्त जास्त कलात्मकतेनें परंतु सहेतुकतेनें कसें करितां येईल याचे सतत प्रयोग करितांना आढळून येत आहेत. केवळ अश्लील व बीभत्स कोटिक्रमांवर व घटनांवर भर असलेल्या तमाशांऐवजीं हे नवे सहेतुक परंतु कलात्मक असे तमाशे पाहण्याची इच्छा बहुजनसमाजांतील अशिक्षित शेतकरी–कामकऱ्यांना हळहळू होऊं लागली आहे. सुशिक्षित, सुसंस्कृत पांढरपेशाचे लोकहि ह्या तमाशांतील आधुनिक प्रगतिकारक बदलाकडे आस्थेनें पाहत आहेत. शहरगांवांतील सुशिक्षित इतके दिवस तमाशांकडे दुर्लक्ष कां करूं शकत असत, याची मोठी मार्मिक मीमांसा कै० न. चिं. केळकर यांनीं एके ठिकाणीं केलेली आहे. ते लिहितात, "तमाशे हे उपेक्षित असले तरी ते शहरगांवांतील सुशिक्षितांकडून. पण त्याचें कारण असें कीं, कांहीं प्रतींचीं नाटकें, प्रहसनें व नाटकमंडळ्या त्यांच्या ग्राम्य करमणुकीची भूक तमाशाइतकीच इतर रीतीनें शहरांतहि भागवितात."

परंतु एकंदर मराठी वाङ्मयांतील वाढता वास्तववाद व लोकाभिमुखता पाहतां छुप्या मार्गांचा अवलंब करण्याचें यापुढें कारणच उरणार नाहीं. 'जय मल्हार', 'रामजोशी' यांसारख्या चित्रपटांतून तमासगिरांचें जें अत्यंत वास्तववादी परंतु कलापूर्ण असें चित्र रेखाटण्यांत आलेलें आहे, त्यांचें ज्या उत्साहानें व मोकळेपणानें महाराष्ट्रांतील सर्व वर्गांचे व वर्णांचे प्रेक्षक स्वागत करीत आहेत, तो पाहिला म्हणजे या मुद्द्याची साक्ष मनाला पटते. महाराष्ट्रीय नाट्य-संमेलनांतून तर तमाशाचा कार्यक्रम अलीकडे दरवर्षी अगदीं न चुकतां होत आहे. हिंदी सैन्यांतील मराठा पलटणी केवळ स्वदेशांत असतांनाच नव्हे तर परदेशांत असतांनाहि आपल्या अधिकाऱ्यांमार्फत तमासगिरांना बोलावून घेऊन त्यांनीं केलेल्या तमाशांचें मुक्त कण्ठानें व हस्तानें स्वागत करित. असें 'तमाशा'बाबतचें सर्व बाजूंनीं प्रगतिकारक, उत्तेजक व आशावादी वातावरण असतांना मुंबई–सरकारनें अचानकपणें, कोणत्याहि प्रकारचा खुलासा न करितां, तमाशाबंदीचें फर्मान काढण्याचें कारण काय ?

## कायद्यानें समाजक्रांति !

महाराष्ट्रीय लोकांना 'अप्रिय परंतु पथ्यकारक' सुधारणांचें बाळकडू मागेंच आगरकरांनीं दिलेलें आहे. तेव्हांपासून सामाजिक सुधारणेच्या क्षेत्रांत, समाजाचा भरपूर विरोध सहन करूनहि, फुले, कर्वे, केतकर, सावरकर, आंबेडकर, शिंदे, माटे, साने वगैरे मंडळी आपआपल्या शक्तीप्रमाणें परंतु अत्यंत धीमेपणानें, सातत्यानें व निष्ठेनें कार्य करीत असलेली आढळून येत आहेत. परंतु यांपैकीं कोणींहि समाजक्रांतिकरितां कायद्याची कास धरण्याचा दुराग्रह कधींहि व्यक्त केलेला नाहीं. कायद्याचा उपयोग सामाजिक सुधारणांबाबत करूं नये व करावयाचाच झाला तर तो केवळ आपद्--धर्म म्हणूनच करावा ह्याच विचारसरणीची ही सारी मंडळी आहे. स्त्रीसुधारणा, धार्मिक सुधारणा, शिक्षण, अस्पृश्यता, आर्थिक विषमता ह्यांबाबतच्या त्यांच्या बीजभूत कल्पना आतां चोहोंकडे मूळ धरूं लागलेल्या दिसत आहेत. हा विकास असाच यापुढें त्याच्या नैसर्गिक अवस्थेंत व्हावा असें वाटत असल्यास त्यास कायद्याच्या हत्याराची धार लागतां कामा नये. चित्रपटावरील नियंत्रणासंबंधानें डॉ० जयकर एके ठिकाणीं जें बोलले तें तमाशाविषयींच्या सरकारी धोरणासहि समर्पकपणें लागू पडेल म्हणून त्यांतील महत्त्वाचीं वाक्यें देतों. डॉ० जयकर म्हणतात, "नियंत्रणामुळें लोकांच्या मूलभूत स्वातंत्र्यावर म्हणजे सिव्हिल लिबर्टीवर फाजील ताण पडतां कामा नये. संबंध राष्ट्राला सद्गुणी करण्याचें काम सरकारनें आपल्याकडे न घेतां तें काम समाजाचे नेते, प्रचलित नीतिमत्ता व स्वाभाविकपणें होणारें लोकमत यांवरच सोंपवावें. लोकशिक्षणाचें काम करणारे लोकधुरीण व समाजसुधारक यांचेंच तें काम आहे असें मला वाटतें." (साहित्यनाट्यमहोत्सवांक, एप्रिल १९४७.). कायदा केवळ मानवाच्या शारीर व्यापारांवर—व तोहि अत्यंत









मर्यादित काळपर्यंतच तावा चालवूं शकेल; हृदयापर्यंत त्याचा हात कधींहि पोंचूं शकणार नाहीं. हृदयाला हात घालण्याचें हें कार्य जाग्रत व भावनाप्रधान ललितकथालेखक अनाहूतपणें करीत असतातच. प्रत्यक्ष समाजसुधारणेच्या कार्याला जरी हात घातला नाहीं तरी समाजसुधारकांच्या विचारसरणीला पोषक, प्रेरक अशी पार्श्वभूमि कांहीं प्रमाणांत कां होईना पण तयार करण्याचें काम मराठी वाङ्मयाच्या सर्व क्षेत्रांतून — कथा, काव्य, नाट्य, कादंबरी यांमधून—चालू असल्याचें कोणताहि निःपक्षपाती टीकाकार मान्य करील.

## तमाशाला लोकनाट्याची प्रतिष्ठा

अधिकाधिक लोकाभिमुख होत असलेल्या ह्या मराठी कलाक्षेत्रांत तमाशाला हळूहळू लोकनाट्याची प्रतिष्ठा येऊं पाहत आहे. या लोकनाट्याबाबत सध्यां आघाडीवर असलेल्या रशियाचें उदाहरण आपण अगदीं आदर्श म्हणून डोळ्यांपुढें ठेवण्यासारखें आहे. लोकनाट्याच्या चळवळीला ( People's Theatre Movement ) आपल्या पंचवार्षिक योजनांतून भरपूर वाव दिल्यामुळें रशियाचा किती फायदा झाला ह्याबद्दल विवेचन करतांना Norris Houghton यांनीं आपल्या 'Moscow Rehearsals' या ग्रंथांत दिलेली माहिती अत्यंत उद्बोधक आहे. ते लिहितात:— "It ( The Soviet Theatre ) has served many functions during these strenuous years. It has allowed hungry men & women to forget for a little that they had nothing to eat; it has given them glimpses of future happiness; it has encouraged & excited them; it has relaxed them and made them laugh; it has given them brightness and colour. When all about was drab and bleak, it has talked to them about their problems of work, has shown an interest in what they were doing at the factory or on the farm; it has given them self—confidence and hope; it has helped to give them an education, has opened up the host of art treasure which the world holds as its common heritage."

लोकनाट्याच्या क्षेत्रांत रशियानें निर्माण केलेला हा आदर्श, १९४२च्या चळवळींत पुणें, सातारा, कोल्हापूर व मुंबई या भागांतील राष्ट्रीय कार्यकर्त्यांनीं 'शाहीरपथकां'मार्फत केलेल्या तमाशांद्वारें घडवून आणलेली सामाजिक व राजकीय जागृति, उत्पत्तिकालापासून या घटकेपर्यंत अखंडपणें टिकून राहिलेली तमाशाची लोकप्रियता, ह्या साऱ्या महत्त्वाच्या गोष्टींकडे डोळझांक करून 'तमाशाबंदी'चें मुंबई—सरकारनें काढलेलें फर्मान स्वातंत्र्याच्या क्षितिजावर एकाद्या अशुभ चिन्हाप्रमाणें वाटल्यास त्यांत नवल काय ?

## कांहीं विधायक सूचना

वरवर उथळ वाटणाऱ्या परंतु वस्तुतः गंभीर स्वरूपाच्या अशा एका टीकेकडेहि स्वतःला राष्ट्रीय प्रातिनिधि म्हणवून घेणाऱ्या सरकारनें लक्ष देणें अत्यंत अवश्य आहे. कांहीं जबाबदार कॉंग्रेस-पुढारी मधून मधून मुंबई-सरकारला 'वाण्यांबामणांचें सरकार' म्हणून जाहीर सभांतून हिणवतांनां आढळतात. ह्या टीकाकारांच्या मनांतील केवळ जातिनिष्ठेची बरबरची घाण बाजूला केली तर या टीकेमागील पोटतिडीक उपेक्षणीय नाहीं ही गोष्ट विचारवन्तांच्या ध्यानांत सहज येण्यासारखी आहे. 'ब्राह्मण्य' किंवा 'वाणिज्य'—वृत्ति यांवर केवळ आघात करण्यापलीकडे आणखी कांहीं हेतू या टीकाकारांच्या मनांत सुप्तावस्थेंत आहेत. कोता दृष्टिकोन, शिक्षणाचा अभाव, भावना व विचार न प्रकट करतां आल्या म्हणजे असंस्कृत मनाला येणारा उद्वेग या पोटीं ही मंडळी केवळ जात, व्यक्ति वगैरेंवर वेळीं अवेळीं घसरतांना आढळतात; परंतु त्यांच्या अंतर्यामीं असलेला विचार मात्र दुर्लक्ष करण्यासारखा नाहीं. या बहुजनसमाजाचे आचारविचार लक्षांत घेऊन त्याच्या आर्थिक व सामाजिक प्रश्नांना हात घातला जावा व या दृष्टीनें त्याच्या गरजांकडे त्याच्या प्रातिनिधींनीं सहानुभूतीनें पाहावें हीच त्यांची रास्त व खरी मागणी आहे.

या त्यांच्या मागणीमागील तात्त्विक बाजू विचार करण्यासारखी आहे. त्यांना खरोखरीं असें म्हणावयाचें










आहे कीं, करमणुकीची कल्पना हीं सापेक्ष (Relative) आहे. "माणसाची अभिरुचि, त्याचे हितसंबंध आणि त्याच्या ज्ञानाची पातळी यांशीं ती सापेक्ष आहे." (के. ना. काळे, झंकार, १९-८-४५.) "आमच्या करमणुकीच्या साधनांत कांहीं चुकत असेल तर तें साधन दुरुस्त करा, साफ हिरावून घेऊं नका. पांढरपेशा वर्गाची अभिरुचि आमच्यावर लादण्याचा दुराग्रह तुम्हीं धरूं नये. ज्ञान, संस्कृति व आर्थिक परिस्थिति या दृष्टींनीं जोंपर्यंत आपण सर्व एका पातळीवर नाहीं तोंपर्यंत तुमची व आमची करमणुकीचीं साधनें एक होऊं शकणार नाहींत. कायद्याचें हत्यार आम्हीं तुमच्या हातांत दिलेलें आहे. डॉन क्विक्झोटप्रमाणें तें तुम्ही हवेंत, दगडावर वा झाडावर वापरून बोथट करूं नका. कायद्याचें हत्यार वेळीं--अवेळीं वापरून बहुजनसमाजाशीं असलेले हितसंबंधाचे धागेदोरे तुम्हीं अविचारानें कापून टाकीत आहां. यामुळें समाजाच्या प्रकृतींत सुधारणा व्हावयाचें बाजूलाच राहून उलट त्याचा वैद्य मात्र दिवसेंदिवस क्षीण होत जाण्याची शक्यता आहे.

तत्त्व, व्यवहार व इतिहास या तिन्ही दृष्टींनीं विचार करतां तमाशावर मुम्बई-सरकारनें घातलेली बंदी कशी चुकीची व अन्यायाची आहे हें आतांपर्यन्तच्या विवेचनावरून सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. यास्तव मुम्बई-सरकारला आमची अशी नम्रतापूर्वक विनंति आहे कीं त्यांनीं आपला निर्णय तावडतोब बदलून ही बंदी उठवावी आणि तमाशांत सुधारणा करण्याच्या दृष्टीनें पुढील विधायक सूचनांचा विचार करावा.

( १ ) कोठल्याहि तमाशाचा प्रयोग होण्यापूर्वी त्याचा प्रयोग, शक्य असल्यास त्याची एक लेखी प्रत सरकारनें नेमलेल्या नियंत्रणमंडळाला ( Censor-board ) दाखवावी; व त्यानें मान्यता दिल्यावर त्यानें सुचविलेल्या सुधारणा करून मग त्याचे प्रयोग जनतेपुढें करावे. या बोर्डावर मुम्बईचे न. र. फाटक, भा. वि. वरेरकर, व स. का. पाटील, पुण्याचे शंकरराव मोरे, द. वा. पोतदार व ना. ग. गोरे, सातारचे भाऊसाहेब मोडक व भाऊराव पाटील वगैरे मंडळी नेमावी. तमाशेवाल्यांना सोयीचीं पडतील अशींच ठिकाणें नियंत्रण-मंडळापुढें व्हावयाच्या प्रयोगाकरितां शक्य तों निवडावीं. ( २ ) 'तमाशा' हा नाट्यप्रकार अधिकाधिक कलापूर्ण परंतु राष्ट्राभिमुख करण्याच्या दृष्टीनें, त्यांतील शृंगाराला येणारें अश्लील रूप दूर करण्याच्या दृष्टीनें व तो पाहणाऱ्या समाजाची अभिरुचि हळूहळू चांगल्या मार्गाला लावण्याच्या दृष्टीनें कांहीं विधायक कार्यक्रम आंखावा. उदाहरणार्थ, अशा आदर्श तमाशांना सरकारांतून बिदागी किंवा बक्षीस देणें, राष्ट्रसभेच्या अधिवेशन-प्रसंगीं करमणुकीच्या कार्यक्रमांत त्याची योजना करणें, रेडिओवर अशा तमाशांचे कार्यक्रम घडवून आणणें वगैरे. ( ३ ) पुढील मंडळींना विनंति करून त्यांच्याकडून अशा तऱ्हेचे आदर्श तमाशे लिहून घेणें:—प्र. के. अत्रे ( मुंबई ), पु. ल. देशपांडे ( पार्ले ), वसंतराव बापट व ठोकळ ( पुणें ), माडगूळकर ( औंध ), भालजी पेंढारकर ( कोल्हापुर ), शाहीर निकम ( सातारा ) वगैरे. ( ४ ) थिएटरमधील कांहीं गलिच्छ प्रकार बंद करणें. उदा०, चवल्यापावल्या उधळणें, दारू ताडी पिऊन येणें, तमाशा चालू असतांना आरडाओरड, शिवीगाळ वगैरे करणें, विंगमध्यें चोरून बसणें, तेथें 'सवदे' करणें वगैरे. ( ५ ) बाजिरड्या गलिच्छ व ओंगळ वस्तींत असलेलीं तमाशांचीं थिएटरें तेथून हलवून चांगल्या जागीं नेणें.

---

## मला पुनर्जन्म मिळावयाचा असेल तर !

मला पुनर्जन्म मिळावा अशी इच्छा नाहीं, पण मला पुनर्जन्म जर मिळावयाचाच असेल तर अस्पृश्याच्या कुळांत माझा जन्म व्हावा. म्हणजे मला त्यांचीं दुःखें, हालअपेष्टा, अपमान अनुभवतां येतील आणि त्या दुर्दशेपासून स्वतःची व अस्पृश्यांची सोडवणूक करून घेण्याचा मला प्रयत्न करतां येईल.

—महात्मा गांधी








# महात्माजींच्या समाधीवर

### छंद : परिलीना

अरेरे ! अघोरी गोळी भिडली ! आणि रक्तधार चिळकांडली ! !
असह्य वेदना गात्रागात्रांत आर्त वेणा आल्या नसानसांत !
खादी–धोतरानें धार[1] झेलली, ' धर्मराज ' सार्थ पदवी झाली !
प्राणांतिक उठे मस्तकीं शूळ, अश्वत्थाचें खालीं कोसळे मूळ !
पण तुम्हांपोटीं अथांग शांती, मानव्याची गाढी नितांत भक्ती,
ब्रह्मवाणी बोले ' हा राम ! राम ! ! ' आणि तुम्ही धर्मा ! म्हटला राम ! ! १

शतशा विदीर्ण जहाली धरा ! आकाश फाटलें ! दुभंगे चिरा !
सागर उधाणीं कडकडले ! ज्वालामुखीचेहि स्फोट जाहले !
हिमलाट आली वाऱ्यावरतीं ! खवळलीं महाभूतें भोंवतीं !
दुःखानें कुंदून पिटलें ऊर ! रौद्रभयानक करुण पूर—
येऊन, बुडालें जीवन त्यांत; सत्त्व विरघळे, वाळू हातांत ! "
धर्मराजा ! कसें सोडून गेला ? कां हो मायदेश पोरका केला ? २

दीनबंधू आफ्रिकेंत रडती ! धुळीमध्यें चंपारण्यें दडती !
किसानगीतकें बारडोलीचीं वितळती येतां धग अश्रूंची !
धारासनाच्याहि मिठाचें पाणी जाहलें ऐकून 'हा राम !' वाणी !
दांडीचीं पावलें मरगळून थबकलीं जागीं पेंगळून !
उरीं फुटून आलें हरिजनांना ? चक्रध्वज आज फडफडेना !
समदृष्टी सखा चैतन्यदायी लोपला, म्हणून शिणलीं कां हीं ? ३

साम्राज्यें उदेलीं रक्त शिंपूनी ! साम्राज्यें चढलीं परवंचनीं !
आणि मिळतांना धुळींत, रक्त सांडती कट्टर साम्राज्यभक्त !
'सत्याचा निर्भय आग्रह परी, प्रेम अहिंसेची निष्ठा अंतरीं
रक्ताविण करी साम्राज्यें उभीं,' मंत्रद्रष्टे तुम्ही देखिलें नभीं.
महान् तपस्यातेज ओतलें, जनजनार्दना प्रेमें पुजिलें,
स्वातंत्र्याचा गड तुम्हीं जिंकिला, गड आला पण सिंह कां गेला ? ४

---

१ विराटानें डोक्यावर फांसा मारून धर्मराजाचें रक्त काढल्याची कथा येथें अभिप्रेत आहे.

## महात्माजींच्या समाधीवर

वसिष्ठ तुम्ही या रामराज्याचे; श्रीकृष्ण तुम्ही या भारताचे;
शंकर वैदिक भाष्याचे महान्, बुद्ध, खिस्त, महंमद, भगवान् !
तुमच्या वाणीनें गाणीं रंगलीं, तुमच्या आदेशीं झाडें फुललीं,
तुमच्या वाणीनें सूर्य फिरले, तुमच्या ऋचेनें स्रोत वळले,
तुमच्या गतीनें तारे फिरले । तुमच्या दीप्तीनें तेज फांकलें ! ॥
जीवनाचें ऐसें चैतन्य थोर । कां हो ! लपवून, लाविला घोर ? ५

जुन्यांतून केली सृष्टी नवीन । 'कैलासलेणें' कीं खडकांतून ? ॥
शिल्पकार नव्या भवितव्याचे, । द्रष्टे ऋषी नव्या युगायुगांचे ॥
कर्षक नवीन शेतमाळचे । सेनापती नव्या आत्मबलाचे ॥
वैष्णव महान् मानवतेचे । 'मोहन' सगळ्या सानथोरांचे ॥
महेश होऊन जुनें मोडलें । ब्रह्मा होउनीवां नवें घडलें ॥
विष्णूरूपी झालां राखावयाला । आणि कुठें आतां गुप्त जाहलां ? ६

कमल उमले—देंठ तुटला ! आंबा मोहरला—बुंधा फुटला ! "
हिमालय हांसे—धरा कोसळे ! तारांगण फुले—आकाश ढळे !
इंद्रधनु खुले—सूर्य लपला ! सप्तस्वर आले—षड्ज लोपला !
नंदन फुललें—स्वर्ग हांसळे ! आत्मबल स्फुरे—जीवन गळे !
ब्रह्मवीणा घुमे—सूर विरला ! अभंग रंगला—विठ्ठल गेला !
शांतिदूत विश्वशांतीचे तसे अकालीं बापूजी ! लोपलां कसे ? ७

गुरुस्थान हिंदभूमी जगाचें, शांततेचें, गाढ बंधुप्रेमाचें,
स्वातंत्र्याचें थोर अमरस्थान, करावया तुम्हांवाचून कोण ?
विश्वदेव्हाऱ्यांत तुम्ही बैसलां, आंसवांनीं करूं अभिषेकाला,
सद्‌गुणांचें तुम्हां लावूं चंदन खपुष्पांनीं करूं नित्य पूजन;
आत्मभाव घ्यावा नैवेद्यासाठीं; हिमालयीं लावूं सूर्याची ज्योती
ओंवाळूं हा नरिंजन, उदारा ! विनवीतों 'यावें पुन्हां उद्धारा !' ८

कणीं कणीं वावरावें इथून, फिरावें विचारांविकारांतून;
ओतावें चैतन्य लोकमातांत, आत्मबल द्यावें धान्यकणांत;
फुलीं फुलीं घाला ध्येयजीवनें, प्रकाशांत ठेवा नवीं स्फुरणें;
आकाशीं फिरवा तुमची ज्योत, पक्षि-कूजनांत तुमचें गीत,
जीवनसंगीत हौतात्म्यांतील, अभंग द्यावें हे चरख्यांतील
घडवाया पुन्हां हे साक्षात्कार, यावें हो पिताजी ! तोच उद्धार ! ९

८ फेब्रुवारी '४८,
विश्रामबाग, सांगली.

**गिरीश**










# जीवन-शक्तींचें स्वरूप

श्री. ना. वि. करंदेलकर

जीवनाच्या स्वरूपाविषयींचें कुतूहल फार प्राचीन आहे आणि तें केव्हां ना केव्हां पूर्णपणें पुरें होईल असें आजहि सांगतां येत नाहीं. पूर्वी तात्त्विक वावड्या उडविण्याचें तत्त्वज्ञानाचें हें राखीव क्षेत्र होतें, पण घोडदौड ज्ञानाच्या पारधीस लागलेल्या शास्त्रज्ञांनींहि आपलें लक्ष या रहस्याकडे लाविलें आहे आणि केवळ शास्त्रज्ञांच्या दृष्टिकोनांतूनच या प्रश्नाकडे पाहण्याचा प्रस्तुत मानस आहे.

## जीवनशक्तीचें गूढ

सारांशरूपानें या प्रश्नावर एकदम शास्त्रीय मत द्यावयाचें म्हटलें, तर निराशाजनक उत्तर द्यावें लागेल; कारण, आजहि शास्त्रांना जीवनाचें स्वरूप व जविन-शक्तींचें स्वरूप यांविषयीं कांहीं निर्विवाद असे सिद्धान्त पुढें ठेवणें शक्य नाहीं. तथापि शास्त्र म्हणजे एक दृष्टिकोन आहे व त्यांतून जें आज दिसतें त्याचें स्वरूप हरघडी बदलत राहणारें असल्यामुळें शास्त्रीय सिद्धान्त म्हणजे केवळ अर्धसत्यें होत. इतकेंच नव्हे, तर असेंहि म्हणतां येईल कीं, शास्त्रीय सत्य म्हणजे वास्तविक वा अन्तिम सत्याचें जवळांत जवळून घेतलेलें दर्शनी चित्र किंवा अन्तिम सत्याचें जवळांत जवळचें असत्य रूप ! तथापि जीवनाबद्दलचें रहस्य उकलण्याचा बुद्धिवाद्याला पटण्यासारखा हाच एक मार्ग आहे.

सि. जि. जंग यांचे 'It is an almost ridiculous prejudice to assume that the existence can be physical.' असे उद्गार वाचल्यावर जीवनाचें रहस्य शोधून काढणें हें शास्त्रीय क्षेत्राच्या पूर्णतः बाहेरचें ठरतें. पण 'शास्त्र संपतें तेथें तत्त्वज्ञान सुरू होतें' या न्यायानें या प्रश्नाचा शास्त्रीय पाया समजावून घेतला, तर तें बोधप्रदच होणार आहे.

जीवनाच्या स्वरूपाचा थांगपत्ता कधींहि लागणार नाहीं, असें एक प्रचलित मत आहे. या वर्गाचा बुद्धीच्या डोळसपणावरच विश्वास नाहीं ! त्याचें म्हणणें असें कीं, बुद्धि ही जीवनधर्माची व जीवसंस्थेची बटीक आहे. जीवाच्या जनन आणि स्वसंरक्षण ह्या दोन मूलभूत गरजा भागविण्यासाठीं बुद्धि ही जीवास विकास-मार्गावरून फरफटत ओढत नेणारी जोखड आहे. तिला तिऱ्हाईतपणें जीवनाचें विश्लेषण करून जीवनाच्या स्वरूपाचें निदान करण्याची शक्ति नाहीं !

कार्य-कारण-भावावर बोट ठेवणें, हें शास्त्रांचें खरेंखुरें कर्तव्य. आणि 'जीव' ही क्रियास्वरूप संस्था सापेक्ष दृष्टीनें अनन्य म्हणून सर्वांस परिचित असली, तरी तिच्या मागची चालनशक्ति, नियामक शक्ति ही मात्र अजून अगम्यच आहे. म्हणून या बाबतींत कार्य-कारणाचा दुवा जोडून दाखविणें अजून शास्त्रांच्या आवाक्यांत नाहीं.

जीव कांहीं यंत्र नव्हे. जीव ही स्वनियंत्रित, एकतंत्री, स्वयंपरिपूर्ण, नित्यचलित, संस्कारक्षम, समतोलित आणि आत्मविशिष्ट अशी संस्था आहे. निर्जीवापासून सजीव ओळखण्याचीं अनेक गमकें आपल्या नित्य परिचयाचीं असून जनन, खाणें-पिणें, प्रतिक्रिया, वाढ इत्यादि त्यांतील मुख्य होत. जीवनसंस्थेची अगदीं पूर्णपणें यांत्रिक उपपत्ति लावणें शक्य व रास्त नाहीं.










अनुक्रमणिका

जीव-संस्थेंत अधिक गूढ अशा ज्या गोष्टी आहेत, त्यांत ( १ ) जीवाच्या एकतंत्री संघटनेचें रहस्य, ( २ ) त्याची स्वयंनियामकता, ( ३ ) मानसशक्तीचें स्वरुप व तिचें इतर भौतिक शक्तींशीं नातें व ( ४ ) जीवनशक्तीचें प्रतिष्ठापन व तिचा विलय, ह्या गोष्टींपुढें बुद्धि अगदीं तोटकी ठरूं पाहत आहे. ह्यांचाच आतां आपणांस क्रमशः विचार करणें प्राप्त आहे.

## जीवनाचा पहिला उन्मेष

जीवसंस्थेच्या अस्तित्वास एकतंत्री संघटना अगत्याची असून जीवाचें अधिष्ठान जें शरीर त्याची रचना व व्यवस्था तीस पोषक अशी असते. जीवाची वाढ, त्याचा विकास, त्याचें संरक्षण व त्याची निर्मिति यांस अवश्यक त्या क्रिया–प्रतिक्रिया आत्मिकपणें करण्याची वस्तुसामग्री जीव–संस्थेंत उपलब्ध असते. हें जीवाच्या आजपर्यंतच्या विकासाचें फळ आहे. जीव–विकास-वृक्षाच्या जसजसें मुळाशीं यावें तसतशी ही सामग्री व व्यवस्था शिथिल व ओबडधोबड आणि अगदीं प्राथमिक स्वरूपाची दिसून येते.

जीवसंस्थेची संघटना, इंद्रियांची उत्पत्ति व त्यांचा विकास, मानसशक्तीचा उदय, तिचा विकास व तिचें केंद्रीकरण, एकत्वाची प्रतिष्ठापना, संरक्षण-सामग्री व नित्य प्रतिक्रियांसाठीं लागणाऱ्या वस्तु-सामग्रीचा व शक्तीचा विकास इतक्या गोष्टींचा उत्तम परिचय गर्भविकासाचें ज्ञान, उत्क्रांतीच्या चढत्या पायऱ्यांचें अनेकविध दृष्टांत व जीवघटा(cell)च्या जननक्रियेचें निरीक्षण यांवरून होण्यासारखा आहे. ( १ ) एकतंत्री संघटना उत्क्रांति–मार्गानें विकसित होत गेली आहे.(२)या उत्क्रांतीच्या मुळाशीं जीवाची नैसर्गिक शक्तींशीं झुंज घेणारी क्रिया–प्रतिक्रिया-त्मक कार्यशक्ति आहे. ( ३ ) जीवघटकांच्या, जीव-घटाच्या आणि म्हणून पर्यायानें जीवसंस्थेच्या उत्क्रांतीस अनेक आकस्मिक विधायक रासायनिक क्रिया कारणीभूत झाल्या आहेत. निसर्गानें अनेक प्रयोग या बाबतींत केले, त्यांतले फार थोडे यशस्वी झाले व अशा केवळ आकस्मिक घटनांतून जीव-संस्थेच्या उत्क्रांतीचा मोहोर फुलला !

निर्जीवापासूनच सजीवाची उत्पत्ति झाली, असें मानण्यावांचून गत्यंतर नाहीं. जीवोत्पत्ति हें एक ऐति-हासिक सत्य आहे. जडपदार्थांहून अलित—केवळ कल्पनामय—सजीवाचा प्रत्यय अजून कोणास आलेला नाहीं. अर्थात् जीवनशक्ति पार्थिव अंशाच्या सान्नि-ध्यांतच प्रकट होते. सूक्ष्मांत सूक्ष्म जीव सुद्धां किती तरी व्यूहाणूं( Moleculesच्या संघटित समुदाय होय. म्हणून व्यूहाणूंच्या उत्पत्तीस व स्थायित्वास पोषक असें वातावरण पृथ्वीग्रहावर होईपर्यंत जीवोत्पत्ति झाली असणें शक्य नाहीं.

निर्जीव आणि सजीव यांच्या सीमेवर कांहीं जीव-प्राय पदार्थ आहेत. चिदर्थ (virus) किंवा विषाणु, पावकातीत ( filter passers ) आणि शाकाणुलव ( bacteriophuge ) इत्यादि या सीमेवर असून ते अस्फटात्मक किंवा श्लिष्मावस्थेंत ( colloidal ) आढळतात. तत्सदृश श्लेष्मीय कणांपासून गुणकण ( genes ) बनले असले पाहिजेत. श्लेष्मीय विलयन ( Colloidal Solution ) निर्जीव असून त्याची कणसंख्या[1], पृष्ठवृत्ति[2], कणांतील संकुलन–वृत्ति[3], वर्धन-तृष्णा[4], व विभाजन-वृत्ति[5] ह्या सारख्या बदलत अस-तात—जणूं काय जीवनशक्तीच्या लहरीच सुखेनैव त्यांत विहरत आहेत. या अस्फटात्मक शक्तिभारित श्लेपाभ अवस्थेंतच जीवनाचें बीज रुजणें शक्य आहे; नव्हे, त्यांतून आकस्मिक संघटनानें स्वयं-नियामक कणाचा उन्मेष होऊन त्यांतच जीवनाचा पहिला विलास एकाद्या पाणथळींत कधीं तरी झाला असेल ! मग असे गुण–कण जवळ आले, त्यांचे संघ बनले व त्यांचें जीवन अधिक निर्विघ्न, अधिक सुकर व अधिक सुसज्ज झालें. निसर्गाशीं झुंज देतां देतां पोषक तत्त्वें आत्मसात् करीत व स्वयंरचना अधिक प्रतिक्रिया-क्षम करीत, अशा संघांत एकतंत्रीपणा येऊं लागला.

---

1 Number of particles or micells per unit. 2 Surface energy or surface tendency 3 Coalescing tendency. 4 Tendency of growth and aging in colloid particles 5 Disper-sion tendency of colloidal solution.

जीवघटांत लांबट, रंगद्रव्य लवकर शोषणारे, आळीसारखे घटक असून हे लहान कणांचे बनलेले असतात. या कणांवर प्राण्यांची रचना, विकास व क्रियाप्रवृत्ति हीं अवलंबून असतात. जनन–क्रियेंत एका घटाचे दोन घट होतांना हे घटक उभे द्विभाजित होतात; यांस गुणबीजें वा पित्र्यसूत्रें (chromosomes) म्हणतात. आनुवंशिक गुण, रचना व प्रवृत्ति यांचा वारसा त्यामुळेंच अखंड राहतो. या गुणबीजाचे घटक जे गुणकण वा पित्र्यैक (genes) ते स्वतंत्रपणें वा समुचयानें एका वा अधिक गुणांचे व त्या गुण-विशिष्ट जविघटनेचे प्रवर्तक असतात. हे गुणकण व मूलभूत सूक्ष्म घटपूर्व जीव यांत फार साम्य असूनें तेच जीवनाच्या उदयकालाचे प्रातिनिधिक दिसून येतात. यांच्या संघटनेनें वर सांगितल्याप्रमाणें गुणबीजांचे संघ बनले. मग या संघांच्या क्रियांप्रतिक्रियांतून संघसमूह बनून त्याभोंवतीं आकस्मिक क्रिया–प्रतिक्रियांच्या द्वारें एक पोषक, संरक्षक वातावरण तयार झालें. वातावरणाच्या निर्विघ्नतेस्तव कवचाची उत्पत्ति होऊन वा संश्लेषणांतून काय निर्माण झालें ? तर जीवघट ! या जीवघटानें परिस्थित्यनुरूप व कालानुरूप स्वतंत्र अस्तित्वासाठीं किंवा सामूहिक जीवनाचा श्रम-विभागविशिष्ट कार्यभाग पार पाडण्यासाठीं अनंत चित्रविचित्र रूपें धारण केलीं. मज्जातंतूचा, स्नायूचा किंवा रक्ताचा घट, श्लिष्ममात्र 'कामरूपी' (amoeba) इत्यादि एकघटीय जीव, हीं याच बहुरुपी घटाचीं चित्रविचित्र रूपें होत ! यानंतर घटांच्या सामूहिक जीवनाच्या श्रम–विभागानुरूप कार्यविशिष्ट विकास त्यांत होऊन व पायऱ्यांपायऱ्यांनीं नवे नवे उन्मेष, व नव्या नव्या वृत्ती उद्‌भवून उत्क्रांति-मार्गाची चढण जीव चढूं लागला. या ऐतिहासिक जीव–विकासाच्या सांखळीमुळें एकतंत्री, स्वयंनियामक जीवसंस्था निर्माण झाली.

उत्क्रांतिमार्गावरचे अनुभव गर्भावस्थेंत गर्भ–विकसन होतांना गर्भ अनुभवीत असतो. अनंत काळाच्या पार्श्वभूमीवर मनुष्याच्या आजच्या अवस्थेप्रत पोंचण्यापूर्वीं ज्या अनेक अवस्था झाल्या त्यांच्या विकास–पाकळ्या अगदीं कमी अवधींत सुमारें २८० दिवसांत मानवगर्भ उकलून टाकीत असतो. प्रत्येक अवस्थेंत पुढील अवस्थेचीं बीजें व कार्यदिशा निश्चित करण्यांत येतात. उदा०, अंड्याच्या प्रथमावस्थेंत अंडें एकजिनसी असतें. मग प्रकाशादि गोष्टींशीं शक्ति–संघर्ष व तदितर स्फूर्तिप्रवण प्रतिक्रियेमुळें त्यांत एक प्राथमिक आंस धरला जाऊन, त्याभोंवतीं अण्डांतर्गत घटकांची मांडणी होऊन व निरनिराळ्या भागांत हळूहळू भिन्न भिन्न श्रमविभाग–विशिष्ट विकसन सुरू होऊन, शेवटीं एकतंत्री संपूर्ण जीवसंस्था तयार होते. नीडॅमनें म्हटल्याप्रमाणें विकसन, परिवर्तन इत्यादि बरेच प्रश्न (१) चाइल्डनें दाखविलेली शरीरक्रिया उतरण आणि (२) स्पीमननें प्रयोगानें सिद्ध केलेली स्वयंस्फूर्त संघटक (organizing organazator) रसायनांची कार्यसंघटना यांमुळें सुटण्यासारखे आहेत. या दोन महत्त्वाच्या सिद्धान्तांचा सारांश असा कीं, लहानसहान प्राण्यापासून ते मोठ्यांत मोठ्या प्राण्यापर्यंत अंड्याच्या फलन–संयोगापासून संपूर्ण जीवसंस्था होईपर्यंत प्रत्येक अवस्थेंत पुढील कार्याची दिशा, वस्तुसामग्री, शक्त्यभिसरण त्यापूर्वीच्या दशेचें फल असतें. तींत एक सुसूत्र क्रिया–प्रतिक्रिया, कार्य——›कारण——›फल एवं नवकारण—— पुनःफल, अशी विकास-गुंफण आढळून येते.

जीवाच्या स्वयंनियामकतेचें रहस्य एकतंत्रीपणाबरोबरच उत्क्रांतींतून निर्माण झालेल्या श्रम-विभाग-केंद्रीकरण--प्रवृत्तीचें फळ आहे. त्यासाठीं मानसशक्तीचा उदय व मज्जातंतु संस्थेची संघटना निर्माण झालेली आहे. मज्जातंतूंच्या शासनसंस्थेंत, अंतःस्राव-ग्रंथींच्या व तदितर शरीरानिर्मित व जीवनरक्षक अशा अनेक रसायनांवर जीवसंस्थेचा गाडा चालू आहे. जीवाच्या क्रिया-प्रतिक्रिया बहुंशीं त्याच्या पाठीशीं असणाऱ्या भौतिक-रासायनिक पार्श्वभूमीकडून होणाऱ्या निर्जीव-सदृश क्रियाच होत. शरीर श्लेष्ममय पदार्थांचें बनलेलें असल्यानें

---

1 C. C. Hurst : 'Ascent of man' 2 " Egg in its primary stage is isotrophic. -Hertwig.










जीवनास आवश्यक अशा शक्ती व साधना श्लेषाभ[1] अवस्थेच्या आवेजक ( Catalytic) प्रवृत्तींतून निर्माण झाल्या आहेत. तुमचा स्वभाव, तुमची प्रतिक्रिया व तुमची वृत्ति या म्हणजे तुमच्या अंगोपांगांतील भौतिक–रासायनिक, पार्थिव–शाक्त क्रिया–कोलाहलाचें संकलित स्वरूप होय !

## मानसशक्तीच्या उगमाचें रहस्य

जीवनशक्तींतील मानसिक शक्तीचें स्वरूप आपणांस अगदींच अगम्य असें वाटतें. पण तिचीहि समाधानकारक उपपत्ति लावणें शक्य आहे. उष्णता, प्रकाश, वीज इत्यादि शक्तींप्रमाणें मानसिक व तदितर शक्तींत परस्पररूपान्तराची शक्यता अजून दिसून आलेली नाहीं. म्हणून मानसशक्ति इतर शक्तींशीं सममूल्य व तुल्य ठरवितां येत नाहीं. तथापि येवढ्यासाठीं मानसशक्तीची पार्थिवता वा भौतिकता अमान्य करण्याचें कांहींच कारण नाहीं. एक तर पॉवलोव आणि त्याचे अनुयायी यांच्या प्रयोगांवरून परावर्तक ( reflex ) प्रतिक्रियांची यांत्रिक उपपत्ति लागलेली आहे; आणि ह्या प्रतिक्रिया आणि आत्मस्फूर्त ( voluntary ) प्रतिक्रिया ह्यांत क्रिया-केंद्र निराळें असण्याखेरीज मूलभूत भेद कांहींहि नाहीं, असें म्हणतां येईल. उदा०, हॉगबेन आपल्या The Nature of Living Matter ह्या पुस्तकांत म्हणतो, " The modern physiology of the conditioned reflex has undermined the distinction between the reflex and voluntary behaviour. ...... a the concept of biology Mind is replaced by Behaviour. "

दुसरें असें कीं, संघटनांतून व संरचनेंतून नव्या गुणांचा, नव्या शक्तींचा उन्मेष होत असतो.[2] याचें एक सोपें उदाहरण घेऊं. पाणी हें उदजन आणि प्राणवायु ह्या दोन वायूंच्या संयोगानें बनलेलें असतें, पण त्यांचे धर्म या घटकांहून किती भिन्न आहेत ! घटक व संघटनाफल यांत साम्यापेक्षां भिन्नताच डोळयांत अधिक भरण्यासारखी असते. मूलतत्त्वें केवळ ९२, पण त्यांच्या निरनिराळ्या संघटनांच्या योगें यच्चयावत् चित्रविचित्र विविध पदार्थ बनलेले आहेत. तींच तींच ५४ मुळाक्षरें, पण त्यांच्या निरनिराळया मांडणींतून वेगवेगळे अर्थ, निरनिराळ्या भावना, भिन्नभिन्न रस, वेद, गीता, शाकुंतल आणि रुपेरी पडद्यावरील गाण्यांची चोपडीं आणि खरींखोटीं वहीखातीं बनतात ! हीच प्रतीति मानसशक्तींच्या बाबतींतहि खरी असल्यास नवल कसलें ? बीज अंकुर आणि वृक्ष एकाच मूल पदार्थाचीं भिन्न विकसित रूपें पण केवढें अंतर असतें त्यांत? यंत्राचा सांगाडा व नुसतें पोलाद यांत केवढी तफावत ? पण वस्तुद्रव्य दोहोंतहि तेंच !

या दृष्टीनें पाहूं जातां मानसशक्तीचें बीज असेंच सुप्तप्राय असूं शकेल. उत्क्रांतीच्या चढणीवरून चढतांना मानसशक्तीचा उदय, विकसन, केंद्रीकरण व आत्म-प्रतीति यांची वाढ हळूहळू झाल्याचें स्पष्ट दिसून येतें. यापेक्षां संघर्षणजन्य, संरचनाजन्य उन्मेष हेंच मानस-शक्तीचें रहस्य असलें पाहिजे, याचा आणखी प्रबळ पुरावा काय असणें शक्य आहे ?

पण यापेक्षां निराळी व्युत्पत्ति मानस-शक्तीच्या बाबतींत देणें शक्य आहे. पर्यायानें कां होईना पण बीजरूपानें व सुप्तावस्थेंत तरी उन्मेषजन्य गुणांचें अस्तित्व मूळ घटकांत कल्पितां आल पाहिजे. तसें तें मानसशक्तीच्या बाबतींत करतां येतें किंवा नाहीं हें पाहूं या. एक तर ' निर्जीव ' म्हणून आपण ज्या पदार्थांस ओळखतों त्यांत अखंड, अमर जिवंतपणा आपल्या दृष्टोत्पत्तीस येतो ! त्यांचे अन्तिम प्रातिनिधिक कण व्यूहाणू ( molecules ) हिंदोळ्यावर अव्याहत झुलत असतात व झुलण्याच्या जोमदारपणावर व्यूहाणूंचा ताप अवलंबून असतो ! व्यूहाणू म्हणजे अखंड चंचलता दाखविणाऱ्या व अव्याहतपणें आपसांत पिंगा घालणाऱ्या परमाणूंचा एक गट ! आणि परमाणू म्हणजे जड केंद्रकण व त्याभोंवतीं वेगानें दौड मारणाऱ्या विद्युदणूं ( electrons )चा

---

१ श्लेष्मीय=श्लेषाभ=श्लिष्मावस्था= colloidal state.

2 Bertalanffly : " Modern Theories of Development ". व Prof. K. Koffka: " Principles of Geotalt Psychology ".

संच यांची लहानशी सूर्यमालाच ! विद्युदणं, धनकण वा प्राणु ( proton ) व क्लीबाणु ( neutron ) यांविषयीं आतांपर्यंत कितीतरी कळलें आहे, आणि कळलें आहे त्याहून कितीतरीपट यापुढें कळावयाचें आहे. त्या अन्तिम कणांवर मानसशक्तीचा आरोप करण्यास कुठली हरकत आहे ? विद्युदणुंचें स्थान व वेग एकाच वेळीं निश्चितपणें सांगतां येत नाहींत. त्याला एका बाबतींत मोकळीक असते. मग या मनःपूत मोकळिकीच्या सांदींतून मानसशक्तीचा जन्म झाला नसेल, असें कोणीं म्हणावें ? लांबी, रुंदी, उंची या अनुरोधानें आपणांस अवकाशाचा वेध घेतां येतो, पण काळाचा वेध घेतां येत नाहीं. तद्वत्‌च शक्तींच्या अनेक रूपांचा परस्परांत संबंध असला तरी त्या मानसशक्तीहून भिन्न असून कोणत्याहि शक्तीचें यांत्रिकतेनें मानसशक्तींत रूपांतर किंवा याच्या उलट कृति आपणांस करतां येत नाहीं. यावरूनहि विद्युदणूंच्या स्वेच्छा–शक्तींतच मानसशक्तीचा उगम असावा, असें वाटूं लागतें. कारण, मानसशक्तीचा विशेष गुण स्वेच्छया लीला हाच आहे !

## जीवशक्तीचा विकास

गर्भविकासाच्या कोणत्या अवस्थेंत गर्भामध्यें ' जीवन ' ( वा जीव--शक्ति ) भरलें जातें, हें सांगणें कठिण आहे. अंड्यांत सहभूत होण्यापूर्वी पुं--बीजांत जिवन्तपणाची चंचलता असते खरी; पण अंड्याच्या विकासाच्या प्रथमावस्थेंत तरी त्यास जीवनशक्तीच्या दृष्टीनें एक प्रकारची सुप्तावस्था प्राप्त झालेली असते, असें म्हणतां येईल. तसेंच गर्भविकासाच्या एकाद्या निश्चित अवस्थेंत मनाची वा मानसशक्तीची स्थापना गर्भांत होते, असेंहि म्हणणें शक्य नाहीं. तात्पर्य हेंच कीं, जीवनशक्ति आणि मानसशक्ति या विकसनाच्या अवस्था आहेत, संघटनेचे व संरचनेचे उन्मेष आहेत, हेंच खरें! आणि म्हणून जीवनशक्ति व मानसशक्ति यांची उत्पत्ति हें बहंशानें विकसनाचें फल असलें पाहिजे. मात्र ह्यांचें बीज मूळ स्वरूपांत कां होईना पण जीवघटांत तद्वत्‌च पर्यायानें जीवघटाच्या 'पित्र्यसूत्रें, पित्र्यैक आणि जीवनरस (Protoplasm)' ह्या आनुवंशिक गुणांची पुनरावृत्ति करणाऱ्या घटकांतहि असावयास पाहिजे ! सरतेशेवटीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें यांचा माग घेत गेल्यास विश्वाचे अन्तिम घटक आणि त्यांचे आकस्मिक संयोग व त्यांच्या क्रिया–प्रतिक्रिया येथपर्यंत हें लोण पोहोंचविणें शक्य आहे ! हक्स्लेनें एका ठिकाणीं (The Listener, 1933) म्हटलें आहे कीं, "..completely misterious fact sdemanding vital force are now explainable in material terms. " दुसऱ्या ठिकाणीं हक्स्ले म्हणतो, 'Today we are on the verge of having organizing (जीव--संस्थाविषयक) powers reduced to a chemical formula and stored in a bottle.

ई. बी. विल्सननें आपल्या The cell या नामांकित पुस्तकांत जीवघटाविषयीं पुढील विधान केलें आहे:— " Cell is a colloidal system what we call life is a complex of innumerable chemical reactions in the substance of this system. " बी. मूर. यानेंहि श्लिष्मावस्थेवर ( colloidal supermolecule वर ) जीवशक्तीचा आरोप केला आहे लीवेन्थाल यानें ' अधिद्रव्य ' ( super-matter ) नामक विशेष गुणयुक्त वस्तु-द्रव्य कल्पून गास्केलनें 'दिव्य द्रव्य' (para-matter ) कल्पून व आर. एस्. लिलीनें 'मनोद्रव्य' ( psycho matter ) कल्पून जीवनशक्तीची संगति लावलेली आहे. गोल्डस्मिटनें तर शरीरपरिवर्तनाची संपूर्णतः रासायनिक उपपत्ति दिली आहे. बर्क, ब्रुधोर व ल्युश्नी यांनीं कृत्रिम जीवघट बनविण्याचा यत्न केला आहे !

जीवघटाचें अधिक सूक्ष्म अवलोकन अलीकडे चालू आहे आणि त्यामुळें घटाविभाजन, पित्र्यसूत्रें व पित्र्यैक ह्यांचें विभाजन आणि त्यांचें स्वरूप इत्यादिकांवर नवा प्रकाश पडणार आहे.

येथें एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे आणि तीं म्हणजे रशियांत ( जर्मनींत व अमेरिकेंत ) निरनिराळीं इंद्रियें जीवसंस्थेच्या मृत्यूनंतर विलगपणें जिवंत ठेवण्यासाठीं केलेले प्रयत्न ही होय.

1 Heseinberg: 'Principle of Indeterminacy.'







मृत्यूनंतर सर्व इंद्रियें एकदम व पूर्णत्वानें मरत नाहींत. मृत्यु हळूहळू शरीरांत पसरतो. इ. स. १८८७पासून पॉवलोव यानें हे प्रयोग चालू केले व चिस्तोविच, क्राकोव, कुल्याको, ओसिनोवस्की प्रभृतींनीं हे आणखी पुढें चालविले. मेंदू फार नाजूक असून रक्ताचा व पोषक द्रव्यांचा पुरवठा थांबतांच मंद पडून मृत्यु पावतो, असें दिसून आलें आहे. ओसिनोवस्कीनें तर १९३६-मध्येंच एकाहत्तर हृदयांवर ( प्रयोग ) क्रिया करून त्यांतील अर्ध्यांहून अधिक पुनः चालू केलीं ! आणि ह्या सर्व गोष्टींचा कळस म्हणजे ३ मार्च १९४४ रोजीं जखमांनीं घायाळ होऊन मृत्यु पावलेल्या लाल सैन्यांतील वॅलेंटिन चेरेपानोव नामक सैनिकाला पुनः जिवंत करण्यांत आलें व आज तो आनंदांत जगत आहे.

तथापि जीवनशक्तीचा संपूर्ण थांगपत्ता आतां लागला आहे वा लवकरच लागेल, असें मात्र म्हणतां येणार नाहीं. झाडपाल्याचा रस चोळून एकाद्यानें जखम बरी केली येवढ्यावरून त्याला जखमेचें सम्यग्-ज्ञान झालेलें असतें असें थोडेंच आहे ? शास्त्रांनीं कधींहि अशी अवाजवी फुशारकी मारलेली नाहीं.शास्त्रें प्रगतीची चढण चढतांना आपली कुवत, आपल्या मर्यादा तद्वतच आपलें मारक स्वरूपहि ओळखून आहेत. तथापि भौतिक साधनांनीं प्रत्येक प्रश्न शास्त्रीय दृष्टीनें तपासणें पार्थिव जीवनास अधिक उपकारक ठरूं शकतें, येवढाच हक्क शास्त्रांनीं सांगितलेला आहे.

प्रस्तुत लेखांत मुख्यत्वें यांत्रिक उपपत्तीचा पुरस्कार केला आहे खरा; पण आजहि कौल गूढ जीववादाकडेच आहे. यांत्रिक उपपत्तीचा ऊहापोह व निरास आणि परमशक्तिवादाचा पुरस्कार करणारें McDougall यांचें The Riddle of Life हें पुस्तक यांत्रिक मीमांसेच्या विरोधकांचें समाधान करूं शकेल. हा प्रश्न गूढ तर आहेच, पण त्यावर इतक्या उपपत्ती दिल्या गेल्या आहेत कीं, त्यांचा न्याय्य व पुरेसा विचार करण्यासाठीं स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल; शेवटीं वरील दृष्टिकोन विद्यार्थ्याचा आहे, अधिकारी टीकाकाराचा नाहीं, हें सांगणें अवश्य आहे.

---

1 Sullivan: 'Limitations of Science ; Hall : 'The Frustration of Science .

---

## माझ्या जिवंतपणीं नाहीं, माझ्या मागें तरी !

बापू आगाखान पॅलेसमध्यें असतांना, एकदां कोणी तरी त्यांना म्हणाले कीं त्यांच्या अनुयायांच्या, विधायक कार्यकर्त्यांच्या ठिकाणीं तें तेज, तें पराक्रमी व्यक्तिमत्त्व दिसून येत नाहीं, कीं जें असल्याशिवाय त्यांचा संदेश जनतेपर्यंत जिवंत स्वरूपांत पोहोंचणें शक्य नाहीं. त्या वर त्यांनीं उत्तर दिलें, " होय, ते आज तसे दुबळे दिसतात खरें ! परंतु त्याचा दोष माझ्याकडे आहे. प्रत्येक बाबतींत मार्गदर्शनाकरितां ते माझ्यावर अवलंबून राहतात. मी जिवंत आहे तोंपर्यंत तरी असेंच चालणार ! पण मला आपली आशा आहे कीं माझ्या मागें त्यांच्या जीवनाची कळी उमलेल आणि तोंपर्यंत त्यांच्या अंतःकरणांत जें जें बिंबलें असेल तें तें कृतीच्या रूपानें सफल होईल. " थोडा वेळ स्तब्ध राहून ते पुन्हां म्हणाले " ख्रिस्त जिवंत असतांना, त्याच्या शिष्यांनीं तरी आपलें कर्तृत्व कोठें सिद्ध करून दाखविलें होतें ? ख्रिस्ताच्या निर्याणानन्तरच परमेश्वरानें ख्रिस्त शिष्यांना ख्रिस्ताच्या तत्त्वांचा प्रचार करण्याचें बळ आणि सामर्थ्य दिलें ! "

—सुशीला नायर, 'हरिजन' ८-२-४८

# तीन क्रांतिवीर

## श्री० चिंतामणी यशवंत मराठे

[ अनुसंधान : पुणे येथील फर्ग्युसन कॉलेज व सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी यांच्या दरम्यान चतुःश्रृंगीच्या दक्षिणोत्तर टेकडीस जोडणारी पूर्व–पश्चिम टेकडी आहे. या टेकडीच्या साधारण मध्यावरील टेंबूवर जुन्या पिढींतले एक थोर देशभक्त श्री. गोपाळ कृष्ण गोखले यांच्या समोर श्री. गोपाळ कृष्ण देवधर, नटेश अप्पाजी द्रविड व अनंत विनायक पटवर्धन यांनीं देशसेवेंत आजीव आयुष्य वेंचण्याच्या शपथा १९०५ सालीं घेतल्या. तो प्रसंग व तें स्थळ पुढील पिढ्यांच्या स्मरणांत राहावें म्हणून तेथील सुमारें दहा फुटी औरस—चौरस जागेवर चौथरा बांधून एक स्मारक उभें केलें आहे व शपथविधीचा निर्देश त्या त्या व्यक्तींच्या नांवासह करणारी एक शिला साक्षीस ठेवण्यांत आली आहे.

ही टेकडी आज कैक वर्षे अनेकांच्या व्यग्र चित्तांना विरंगुळा पाडण्याचें शांतवन–कार्य निश्चलपणानें करीत आहे. सकाळ – संध्याकाळच्या सहलीसाठीं या टेकडीचा उपयोग होत असून तेथें अनेकांनीं आपापल्या पावलांच्या अदृश्य खुणा मागें ठेविल्या आहेत. पण गंगेंत पावित्र्य वाहतें, तसा मळही वाहतो. सज्जनांप्रमाणें कळाहीनांनीहि आपली मिरास या टेकडीवर पुरलेली आहे.

कोणत्याहि कारणानें मूळ धरलेली असो, पण जीवनांतील पवित्र्य व संयम उद्दामपणानें लाथाडण्याची वृत्ति समाजांत शेंदाडांच्या वेलीसारखी फोफावली आहे. व्यक्तिस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य हीं त्या वृत्तीचीं देखणीं नांवें आहेत. याच वृत्तिवंतांनीं, देशसेवेची शपथ ज्या शिळेवर कोरली आहे तेथें, कांहीं तरुणींचीं नांवें लसलशीत कामुकतेनें कोरून ठेविलीं आहेत ! आणि अशा रीतीनें त्यांनीं स्मारकाचें पावित्र्य ठोकरलें आहे. त्याच्याहि पुढची पायरी म्हणजे सदर स्मारक उद्ध्वस्त करण्याच्या प्रयत्नांत चौथऱ्यावरील कठडा विदारून टाकिला आहे. व्यक्तिस्वातंत्र्य व विचार–स्वातंत्र्य या नांवाखालीं अनाचार माजला तरी चालेल; पण संयम ? छे ! त्या चोराच्या मुसक्या बांधल्या पाहिजेत. आणि पावित्र्य ? त्या परीटघडीचीं लक्तरें लोंबलीं पाहिजेत. ]

### १. तीन क्रांतिवीर

त्या तीन क्रांतिवीरांचीं नांवें जिवा, भिवा व शिवा अशीं आहेत. हीं नांवें ऐकतांच तीं एखाद्या कवीनें ठाकून–ठोकून तयार केलेल्या कवितेप्रमाणें बनावट, तिघांचा एकजीव 'दिसावा' म्हणून मुद्दाम ठेविलेलीं अथवा वस्तुस्थिति लपविण्यासाठीं स्वीकारिलेलीं टोपण-नांवें आहेत, असें कोणासहि वाटेल. आणि तें कांहीं खोटें नाहीं.

उघडच आहे कीं, क्रांतीचा पंथ हा एखाद्या धर्मांतील उपपंथाप्रमाणें अनेक प्रच्छन्न प्रक्रियांत गुरफटलेला आहे. त्याला उघड्या व्यवहाराचें वावडें असतें. सोलापुराला जावयाचें असेल तर मावळांत जातों असें सांगावें लागतें. दिसाऊपणांत बावळा आणि अंतरीं नाना कळा असलेला माणूस या पंथांत संपादतो. एकाद्याच्या नांवानें एकादी क्रांतिकारी क्रिया जाहीर झाली म्हणजे म्हणावें हवें तर कीं त्याच्या डोळ्याची धार आग खाईल अशी तल्लख आहे, त्याच्या नाकाची बोंडी माशी बसूं न देण्याइतकी अणीदार आहे, त्याची मुखचर्या उपसा नसलेल्या विहिरीसारखी गहन आहे. पण चार–चौघांत अमका एकादा क्रांति-








वीर असला पाहिजे, असें हेतुपूर्वक निहाळूनहि कोणास बोट दाखवितां येणार नाहीं. मग बाटल्यास तो इतका सामान्य असतो असें म्हणावें किंवा मुख--चर्या ही अंतरींच्या खळबळीचा आरसा आहे असें म्हणणाऱ्याच्या म्हणण्यास खुशाल हरताळ फांसावा.

जिवा, भिवा व शिवा हीं अशींच चार--चौघांसारखीं सामान्य माणसें आहेत. जिवा हा त्यांचा पुढाईत आहे. हे तिघे जणूं ब्रह्मा, विष्णु व महेश आहेत असें कधीं काळीं त्यांचे भगत म्हणतील तेव्हां म्हणोत ! तूर्त तरी ब्रम्हा कोणाला म्हणावें, विष्णु कोणाला करावें आणि महेशाच्या नांवानें कोणाला संबोधावें यावद्दल एकमत नाहीं. कारण, सनातन धर्माप्रमाणें प्रत्येक देवाचे अभिमानी इतरांना तुच्छ लेखतात. नाक खाजविण्यासाठीं एकादशीला कांदाभाकर खाणारे आणि शिवरात्रीला पुरणपोळी उठविणारे त्या त्या देवांचे अनेक सोयरे आहेत. म्हणून आजमितीला या त्रिमूर्ति--वादांत पडण्यांत हंशील नाहीं.

जिवानें आपलें पुढाईतपण केवळ व्यक्तिमत्त्वाच्या जोरावर स्थापिलेलें आहे. म्हणजे तो स्वयंसिद्ध पुढाईत आहे. निवडणुकीच्या लोकशाही तत्त्वावर त्याचा भरंवसा नाहीं. आणि भिवा--शिवांनीं तें अबादपणानें मान्य केलें आहे. कदाचित् तें त्यांनीं मान्य केलें नसतें तर जिवानें अन्य कोणी भिवा--शिवा मिळविले असते आणि क्रांतीचा पुकार केला असता. कोणी आले तर त्यांच्यासह क्रांतीची बीज कडाडेल; पण न आल्यास त्यांच्यावांचून क्रांति खोळंबून राहील असें नाहीं, असा जिवाचा सवाल आहे.

असें आहे तरी मिळालेल्या त्या दोन अनुयायांना तुच्छ लेखण्याइतका जिवा चढेल नाहीं. आपल्या अनुयायांचे योग्य दरदाम तो ठरवून आहे. उलट ते दोघेहि आपआपल्या मनगटावरचे केंस मोजून आहेत. शिवाय कोणत्याहि पंथांत--आणि विशेषतः क्रांतिपंथांत असें ठरून गेलें आहे कीं ज्या कोणाला एकदां पुढाईत म्हटलें असेल, त्याचें उणें काढावयाचें नाहीं. तो वेड-बागडा कसाहि असला तरी त्याला मानावयाचें असतें. त्याचीं पावलें क्रांतीच्या तालावर लयीनेंच पडतात असें समजावयाचें असतें. अर्थात् क्रांतीचा ताल वा तोल पुढाइतानेंच ठरवावयाचा असतो, ही गोष्ट वेगळी.

जिवा क्रांतिवीर बनला आणि पुढाईत झाला तेव्हां त्यानें हा तालतोल ठरवून टाकिला. केव्हां पुढें जावयाचें व केव्हां माघार घ्यावयाची, केव्हां हूल दाखवावयाची व केव्हां झेंप घालावयाची, केव्हा बांकुल्या दाखवावयाच्या व केव्हां जरवेवर वेळ मारून न्यावयाची, हें ठरवून त्यानें आपल्या पंथाची एक गीताच रचिली ! हें सर्व त्या दोन अनुयायांनीं बयाजवार समजून घेतलें आणि त्यांची जिवाच्या अगाऊपणावर श्रद्धा बसली. कावळा अलगद फांदीवर बसतो तशी बसली. अथवा पिकलीं पानें डहाळीला नकळत निखळून पडतात तशीं त्या दोघांचीं मनें निखळलीं आणि जिवावर जडलीं. जिवाच्या पूर्वचरित्राशीं त्यांनीं परिचय करून घेतला. तें त्यांनीं जसें अजमावलें होतें तसें, म्हणजे क्रांतिवीराला शोभेल असेंच होतें.

## २. जिवा क्रांतिवीर कसा झाला ?

जिवा कॉलेजांत होता तेव्हां काव्य हा जणूं त्याचा दुसरा प्राणच इतका तो रसिक होता. सूर्य झांकोळून गेला, ढग तरळूं लागले, पानांची हालचाल थंडावली आणि अकाळ समजून पक्षिगण घरट्यांकडे परतूं लागला म्हणजे चकोरानें चंद्राकडे टक लावावी तसा जिवा वास पाहूं लागे. त्याच्या हातांतलें पुस्तक हातांतच राही, मनांतले विचार मनांतच घुंगाळत. आणि तो अंतरात्म्याच्या ओलावण्यानें निथळत सभोंवार पाहूं लागे. मग त्याला कॉलेजांतील छंदाचें भान राहत नसे, तहान--भुकेची क्षितीहि उरत नसे.

" किती हळुवार आहे हा ! सृष्टीचें रूप पालटलें कीं याची चर्याहि पालटते ! त्याअर्थीं याच्या अंतरांत अनिवार काव्य वाहत असलें पाहिजे. त्यावांचून हा असा स्थिर होत नसावा. मग हा त्या रसाळ काव्याचा उपसा कां बरें करीत नाहीं ? आज एकाद्या महाकाव्याची वाण आहे. जिवंत काव्याचें अवतरण आवश्यक आहे. सृष्टीशीं समरस होणारा आणि







आपले रोजचे व्यापार विसरणारा एकादा महाकावि देशांत निर्माण व्हावयास हवा आहे. तसा हा असेल काय ? तसलें ताकदवान् काव्य हा रचील काय ? न जाणों क्रांतीचें आवाहन याच्या निपुण वैखरीनेंच निर्माण व्हावयाचें असेल. नका त्याला चळवूं. लावूं द्या त्याला समाधि. व्हा दूर. तो आपसुख भानावर येईल तेव्हां येऊं दे. एरवीं रमूं दे त्याला आत्मानंदांत. कारण आत्मानंदांतूनच स्फूर्तीचे पाझर फुटत असतात. ''

कॉलेजकर मित्रांच्या या अपेक्षेप्रमाणें कवि या नात्यानें जिवा प्रसिद्धीस आला असता. पण विधि–घटना निराळी होती. काव्याचा व जीवनाचा कांहीं-तरी संबंध असतो हें सिद्ध करण्यासाठीं म्हणा अथवा अन्य कोणत्याहि कारणासाठीं म्हणा, जिवा कवि झाला नाहीं. त्याच्या जीवनांत काव्याचीं लक्तरें वाळत घालण्याचा एक प्रसंग घडून आला. आणि कवितेचे आड भरून काढणारा झरा क्रांतीच्या आडांत पाझरूं लागला. जिवा कवि झाला नाहीं, क्रांतिवीर बनला.

ती हकीकत मोठी अद्भुत आहे असें नाहीं. नित्याच्या परिचयांतलीच आहे. कॉलेजांत नवथर आलेल्या एका सुकन्येवर त्याचें प्रेम जडलें. ती त्या प्रेमाला अनुकूल होती कीं नव्हती कोणास ठाऊक ? पण कवि–संकेताप्रमाणें नायकानें जिच्याकडे रेंगाळत पाहिलें ती नायिकाच झाली पाहिजे, हें सत्य-सृष्टींत मात्र घडून आलें नाहीं.

कांहींच्या मतें त्यांचा परिचय होऊन हास्य–विनोदापर्यंत मजल गेली होती, असें आहे. तर कांहीं म्हणतात कीं टेकडीवर त्यांचे अनेक संभाषण–प्रसंग होऊन प्रेमाची आणभाकहि झाली होती. तें कांहींहि असो, कॉलेजांत ती वर्षभर असेल नसेल तोंच, एका अनुरूप वराशीं तिचें लग्न झालें आणि तिनें कॉलेज सोडिलें. दिवा लावतां लावतांच वाऱ्यानें फुंकरावा तसें तिच्या कॉलेजांतील येण्याचें झालें आणि जिवाच्या प्रेमाचेंहि झालें. कॉलेजांत तिचा अंधार झाला आणि जिवाच्या प्रेमज्योतीचाहि झाला. ती गेली, जिवा राहिला. त्याचें आभाळ फाटलें. त्याचा विसांवा ढांसळला ! त्याला कांहीं दिसे ना, सुचे ना. सकाळ-संध्याकाळ तो त्या टेकडीवर भ्रमिष्टासारखा पायपीट करूं लागला. मळवट वातावरणांत दिशा गढूळ होतात, तसें त्याच्या आयुष्याचें झालें.

पोक्त्या-सवरत्यांनीं उपेक्षा करावी इतकी ही क्षुल्लक गोष्ट दिसते ! पण तारुण्यांत तिचें केवढें मोल असतें ! तारुण्यांत कितीकांचें असेंच कांहीं तरी होतें, म्हणतात. मग ते लवकर माणसांत येतात म्हणा अगर त्यांची तहान तितकी थोर नसते असें म्हणा. सगळेच कांहीं क्रांतिवीर झाल्याचें ऐकिवांत नाहीं.

जिवाचें मात्र तसें झालें नाहीं. तो एकदां बिथरला तो बिथरलाच. इतर तरुणांप्रमाणें प्राप्त परिस्थितीला मुरड घालण्याचें त्यानें साफ नाकारलें. जिकडून वारा आला तिकडे पाठ फिरविण्याचें त्यानें मानलें नाहीं. त्यानें तोंड फिरविलें आणि वाऱ्याचे आघात तो छाताडावर घेऊं लागला. नाकपुड्या वासून पिववेल तितका वारा प्याला. नजर रोखून डोळे ताठर होईपर्यंत त्यानें अवकाशाचा भेद केला. मुठी वळून आणि शरीराचा एक गोळा करून त्यानें भूमि उसासून टाकिली. आणि त्यानें खूणगांठ बांधिली कीं, जी मला जाचीत आहे ती व्यक्तीची आगळीक नसून सामाजिक विषमता आहे. प्रेमांकित वधूवरें एकत्र यावीं येवढी सुगमता समाज-रचनेंत नाहीं. यामुळें समाजांत वातडपणा निर्माण झाला आहे. आणि हा वातडपणा समाजाच्या सांदी-कोपऱ्यांत असंतोषाचें विष कालवीत आहे. हें विष अद्याप कोणीं पचविलें नाहीं, निपटलें नाहीं. उलट, या विषबाधेनें विगलित होऊन समाजांत अकर्तृकांचे पांजरपोळ निर्माण होत आहेत. आणि हें असें कर्तृत्वहीन समाजजीवन वर्षानुवर्षें, शतकानुशतकें चालत आलें आहे. या विषाला विष म्हणणारे देखील गळाले, नामोहरम झाले. तें पिऊन पचविणारा वृकोदर अद्याप निर्माण झाला नाहीं ! मग तें शोषून नामशेष करणारा महादेव कोठून अवतरणार !

एकादा अचूक मंत्र मिळाला कीं त्याची चलणूक बघण्याचा मोह होतो. जिवाला समाज--जीवनाचें निदान करतां आलें आणि मंत्रहि सांपडला, आणि मग तो त्या नव्या दृष्टीनें पाहूं लागला. त्याला काय आढळलें ?








" हें झाड कां मोहरत नाहीं ? हें जीर्ण–शीर्ण झालें आहे. हें वुंध्याच्या वारुळानें क्षयी बनलें आहे. हें डहाळ्यांफांद्यांच्या बेचक्यांतून पोसलेल्या बांडगुळांनीं आहारलें आहे. याचा उपयोग नाहीं. असून अडचण आणि नसून खोळंबा ! हें समूळ छेदून टाकिलें पाहिजे. याच्या खांद्या–फांद्या तोडून भागणार नाहीं, हें उन्मळूनच टाकिलें पाहिजे. इतकेंच नव्हे, तर याची स्मृति ठेवूनहि चालणार नाहीं. तें होतें कीं नव्हतें असें करून टाकिलें पाहिजे."

जिवा म्हणतो, क्रांति म्हणजे आणीक तें काय ? हाच तो मंत्र. या मंत्रानेंच जारण–मारण–उच्चाटनाचे प्रयोग करीत राहिलें पाहिजे. तरच क्रांतीचा थय-थयाट सुरू होईल.

मनाची येवढी निरगांठ बांधूनच जिवा थांबला नाहीं. फ्रेंच राज्यक्रांतीपासून रशियन राज्यक्रांती-पर्यंतच्या काळाचा इतिहास सांगणारे अनेक ग्रंथ त्यानें पाहिले. त्याच्या पूर्वीं होऊन गेलेल्या अनेक क्रांत्या त्यानें अभ्यासिल्या. ग्रीक व रोमन साम्राज्यांचे चढ–उतार त्यानें मनांत घोळविले. आणि तौलनिक अभ्यासानें असें ठरविलें कीं, हिंदुस्थानांतल्याइतका अन्य कोणत्याहि देशांत क्रांतीला वाव नसतांनाहि तेथें तेवढ्या क्रांत्या घडून आल्या आणि हिंदु-स्थान मात्र क्रांतिशून्य राहिला. याचा अर्थ काय ? याचें कारण क्रांति–कल्पनेचा अभाव, क्रांति-वाङ्मयाचा अभाव कीं क्रांति–वीरांचा अभाव ?

## ३. क्रांतीची वाटाघाट

क्रांतीची सुरुवात आज करूं, उद्यां करूं म्हणतां म्हणतां दिवसांमागून दिवस गुजरूं लागले. जिवाचा निश्चय होई ना, दिशा ठरे ना. भिवा-शिवांना तर आपण क्रांतीची केवळ भाषाच बोलत राहणार, क्रांति कांहींच करणार नाहीं, अशी मळमळ वाटूं लागली. ऊंस खाऊं म्हणणारांना चिपाडें तरी चघळावयाला मिळतात कीं नाहीं, अशी त्यांची गत झाली. बरें, जिवानें तरी पुढाईतपणाच्या खेशीनें क्रांतीची सुरुवात कशी व कधीं करणार आहों हें उघडून सांगावें कीं नाहीं ? पण तो कांहींच बोले ना. भरल्या पेवासारखा गच बसून राहिला. त्याची अदब राखण्यासाठीं भिवा–शिवा हे पेवांतल्या जोंधळ्यासारखे मुकाट राहिले. पण किती दिवस ? अंगांत रक्त सळसळत असलें आणि डोक्यांत विचार उसळत असले म्हणजे कायद्याची पोलादी कांब देखील माणूस रेवड्यां-सारखी उडवून देतो. मग भिवा--शिवा तर काय ? वारकरी-पंथाची सरळ मोक्षाला नेणारी साळसूद भक्ति सोडून शाक्तपंथीयांची जळजळीत निर्वाण--भक्ति पत्करलेले क्रांतीचे पाईक ! त्यांना दम खाव-यास सांगणें म्हणजेच त्यांचा दम उखडण्यासारखें !

याच वेळीं पुण्यांत व पुण्याच्या आसींपासीं सुरुंगा हल्ल्यांना ऊत आला होता ! निरुंद बोळाच्या तोंडाशीं कचऱ्याच्या पेटीच्या आडोशानें रस्त्यावरील दिव्यांची अंधेरझांक साधून झेंप टाकण्यासारखे भर शहरांतील प्रकार आणि गजबज टाळावी म्हणून एकान्त शोधण्यासाठीं लांबवर गेलेल्यांवर धाड घालण्यासारखे शहराबाहेरील प्रकार हमेश घडत होते. अशा बेबंद स्थितींत क्रांति करूं पाहणाऱ्यांना केवढी नामी संधि होती ! रानांत उभ्या पिकावर दिवसां-ढवळ्या भोरड्या तुटून पडतात. अथवा अवशीचा पहिला प्रहर उलटतांच रानडुकरांची रीघ पिकावर ताव मारते. सृष्टींत हमेश घडणाऱ्या या प्रकारांपासून माणसानें कांहींच बोध घेऊं नये काय ?

जिवाला येवढी साधी गोष्ट समजत नसेल असें कसें म्हणावें ? पण पुढाईत झाला तरी नेणतेपणानें केक वेळीं डोळेझांक होते. अनुयायांनीं त्याला हलवावें लागतें, अथवा तो जागा आहे कीं नाहीं हें शब्द टाकून पाहावें लागतें. भिवा–शिवांनीं साथीदारांच्या सलगीनें ही गोष्ट अखेर खरवडलीच म्हणा ना !

" चुकत आहां ! भिवा--शिवा, तुम्ही चुकत आहां !" अनुभवानें येणाऱ्या अधिकारी वाणीचा दाटून उपयोग करीत जिवा त्यांना म्हणाला, " हुल्लड उठलेली असली म्हणजे हात मारून मोकळें होणें सोपें असतें हें खरें. बोभाट होऊन अंगीं लागत नाहीं. सुरांत सूर मिळून जातो. पण

एकाद्या गोळीबंद कैरीवर नेमका दगड मारणें वेगळें आणि लत्रथवलेल्या कैऱ्यांवर दगड मारणें वेगळें. पहिल्या प्रकारांत एकच कैरी टपकेल आणि दुसऱ्यांत कैऱ्यांचा सडा पडेल. पण काय उपयोग ? आपल्याला गोळीबंद कैरी हवी आहे, पोचट कैऱ्या नकोत. शक्तीचा व्यय जोखून करील तो शहाणा, असा क्रांतीचा सिद्धांत आहे. आणि लक्षांत ठेवा, क्रांतिवीर म्हणजे भुरटा चोर नव्हे."

"तूं म्हणतोस तें गैरहिशेबी कसें असेल ? स्वारीची वाट बघत आणि म्हणूं तेंच भांडें घेऊं अशा बंदिस्तीनें दिवसभर टांगातळावर माशा मारीत बसण्यापेक्षां चार–दोन आणि मागेंपुढें करून टांगा चालता ठेवला तर काय बिघडलें, असा आमचा हिशेब ?"

"असा तुमचा हिशेब ! आणि प्राणांतिक घाईनें नडलेली स्वारी आली म्हणजे माशा मारीत बसण्याची सगळी कसर भरून निघते ती ? शिवाय आपण शाबूद, थोडें शाबूद ! काय म्हणतों मी ? क्रांतींत दम खाण्यासारखा पुरुषार्थ नाहीं रे."

"जिवा म्हणतो तें रास्त दिसतें. पण हें बघ जिवा, तुझें म्हणणें आतां इतकें स्पष्ट कळतें तर शिवानें आड घेतली नसती. पण आतां शंका हरली. तुझा अगाऊपणा आम्हांला मान्य आहे. तूं करशील तें बरोबरच करशील. यापुढें मात्र असें कर. तुझ्या डोक्यांतलें मनांत न ठेवतां वेळ–प्रसंग पाहून आम्हांला सांगत जा. म्हणजे होईल काय कीं, आम्हांला वेगळा विचार करावा लागणार नाहीं."

"नाहीं तरी आम्हांला विचार करण्याची हौस कां आहे ?"

"ठीक आहे ! माझ्यावरचा तुमचा विश्वास पाहून मार्कंडेयाच्या भक्तीनें महेश्वर संतुष्ट झाला तसा मी संतुष्ट झालों आहे. पण गड्यांनों, डोक्यांतल्या सर्वच गोष्टी नेहमीं सांगतां येत नाहींत. त्या तुमच्यावरील अविश्वासामुळें सांगतां येत नाहींत असें मात्र समजूं नका. पण सांगतां येत नाहींत खऱ्या. कारण, कित्येक बोलावयाच्या नसतात. वेळ येईल तेव्हांच तोंड उघडावयाचें असतें. दुसरें असें कीं, कांहीं गोष्टी बोलून दाखविण्यापूर्वीच तडकुबींत टाकाव्या लागतात, तर दुसऱ्या कांहीं न बोलतांच तारोतार अंमलांत आणाव्या लागतात. अशा स्थितींत काय करावें मीं ? सांगा बरें, तुम्हींच ? पण एक सांगतों. मी तुमच्या बाहेर नाहीं. आणि असेन कसा ? कारण अनुयायांवेगळें पुढाईतपण म्हणजे नाक्यावेगळी मोट आहे. पण त्याबरोबरच हेंहि बजावून ठेवतों कीं, तुम्हांला सुचेल तें व सुचेल तेव्हां बोलल्यावांचून राहूं नका. कुणी सांगावें ! पावसाळ्यांतील पावसानें होत नाहीं तें वळिवाच्या पावसानें कधींकधीं होऊन जातें."

"म्हणजे अजून थांबायला हवें असेंच कां म्हणेनास ?"

"त्याचा काय नेम ? अर्ध्या झोंपेंत अगर अर्ध्या जेवणावर ! वाफेनें थडथडणाऱ्या आगगाडीच्या एंजिनाप्रमाणें क्रांतिवीर सदा सज्ज पाहिजे."

## ४ क्रांतीची पहिली चुणूक

पर्वतीवर जाईपर्यंत पुढील बनाव कसा बनून येणार याची कोणालाच कल्पना नव्हती. निदान भिवा–शिवांना तरी नव्हती. जिवा मात्र कूट प्रश्न सोडविणाऱ्या तंद्रीच्या ऐटींत रमून गेला होता. कारण, सावज कुणीकडे झुकणार हें त्याच्यादेखील अजमावण्याच्या पलीकडचें होतें. पण त्यावरच तर पुढील उभारणीची सारी अडणी होती.

कार्तिकस्वामी व विष्णु यांच्या देवळांच्या मधल्या धारेवर मावळतीचा वारा भिरभिरत होता. तेथेंच कदाचित् त्यांनीं ठाव दिला तर ? मग मूळच्या योजनेला कशी कलाटणी द्यावी याचा विचार जिवा करीत होता. पण कार्तिकस्वामीच्या पिछाडीनें उतरून ते काळ्याची वाट धरणार हा अंदाज बांधून जिवानें भिवाला काळ्याच्या वाटेकडे तत्काळ पुढें पिटाळलें, शिवाला काळ्याशीं समांतर जाणाऱ्या विठ्ठलवाडीच्या रस्त्यानें धावडलें आणि तो स्वतः







त्यांचा मागोवा धरून दवत दवत निघाला.

पर्वतीच्या माथ्यावरील मोकाट वारा पायथ्यावरील झाडाझुडांच्या आडोशानें झुळकीचा झाला होता. कालव्याच्या दोतरफांचीं झाडेंझुडपें पाण्याच्या चिरंतन ओलाव्यामुळें माजून तजेलदार दिसत होतीं. कालव्याचें भरपेठ आठ फुटी मापांचें पाणी तट्ट फुगून चाललें होतें. प्रवाहांत सांपडलेलीं झुडपें आणि लवलेल्या झाडांच्या फांद्या वाऱ्याच्या हेलकाव्यानें केव्हां पाण्यांत बुचकळी मारीत होत्या, तर केव्हां तसें केल्याची नुसती हूल दाखवीत होत्या. मुठे खोऱ्याच्या पठारावर टेकावयास निघालेला लालबुंद सूर्य झाडांच्या अवकाशामधून वाट काढीत प्रवाहावर आपलीं किरणें झुलवीत होता. आणि कालव्यावरील पायवाटेची वांकण घेऊन दक्षिणेकडे झुकलेली सगळी बाजू किरणांच्या अभावामुळें एव्हांपासूनच गढूळ होत चालली होती.

पुढें चालून गेलेला भिवा, मागून मुरत मुरत जाणारा जिवा आणि रस्त्याच्या अंगानें पकड मिटत आणणारा शिवा तुटून पडावयाची वेळ येतें केव्हां याची जणूं स्मरणीच ओढीत होते. प्रेमिकांनीं गर्द छायेची जी जागा पसंत केली होती, तिच्या आवर्तीं भोंवतीं हे तिघेजण एकेका पावलानें समीप येत होते. त्या जागेपासून उगम घेणारा सिगरेटचा सुगंधी धूर वाऱ्याच्या हेलकाव्यानें वाहुळत होता, तो या तीन शिकाऱ्यांच्या नाकाला चाटून जात होता. मधून मधून हंसण्याची सुरेल नरमादी कानांवर आदळत होती. मस्करीचा एकादा इंग्लिश शब्दहि आडमोडीनें ऐकूं येत होता. क्वचित् बांगड्यांची झिणझिणहि ठेंचकळत येत होती ! बिचारे प्रेमिक ! हलक्या पावलांनीं येणाऱ्या अंधेराच्या कह्यांत जसे चालले होते तसे त्यांच्या प्रेमाचा अमृतकुंभ फोडूं पाहणाऱ्या दैत्यांच्याहि तावडींत निघाले होते. पुढें काय वाढून ठेवलें असेल याची काय कल्पना त्यांना !

कदाचित् आजचा प्रसंग त्यांनीं आगाऊच ठरवून ठेविला असेल. कदाचित् परस्परांच्या सान्निध्यामुळें निर्माण झालेल्या उमाळ्यापोटीं त्यांची एकान्तसुखाची भूक जागी झाली असेल. अथवा सभोंवारच्या प्रसन्न वातावरणामुळें त्यांच्या वृत्ती उत्तेजित झाल्या असतील. अथवा असेंहि असेल कीं कृत्रिम एकान्तापेक्षां सृष्टीच्या उघड्या अंगावर मिळालेल्या एकान्ताची चव अधिक चोखट झाली असेल. आणि मग त्यांतच दडी मारून बसण्याची अनिवार इच्छा बळावली असेल. पहावें, तर सभोंवारची अवघी सजीव सृष्टि सताड डोळ्यांनीं ववत आहे ! पहावें, तर उभयतांखेरीज कोणीच सजिव नाहीं ! प्रवाहाला गति आहे आणि झाडांना स्थिति आहे. त्याच गति–स्थितीचा एक मेळ परस्परांच्या बाहूंत नाहीं काय ? तोच एक मेळ लाडानें मुखावाटें बाहेर पडणाऱ्या गोड शब्दांत नाहीं काय ? किंवा केवळ अभुक्तपणानें राहिलें तरी परस्परांच्या समीपतेंत प्रेमाचें केवढें उमप सौंदर्य खचलें आहे ? जेथून परतणें नाहीं असें ज्या पदाचें संत रूप करतात, तें निर्मळ पद हेंच कीं काय, असा मोह रोप्याइतकें प्रेमाचें दाट धुकें उभें झालें आहे ! आणि त्यांत तें प्रेमी जोडपें व्यवहाराचा डोळसपणा नुरल्यामुळें अगतिक होऊन रुतून बसलें आहे !

"किती अवीट सुख आहे हें !"

"मग वसूं असेंच घडीभर."

"पण ती घडी प्रहरानेंहि संपणार नाहीं."

"पर्वा नाहीं. कशाला हें बंधन ?"

"बंधनानें चव पिकते."

"केवळ बंधनानें ?"

"मग ?"

वारा पडला होता. प्रवाह संथ झाला होता. झाडें स्तंभित झालीं होतीं. या सर्वांच्या मेळानें निपजलेल्या निवांतपणाची साथ करीत त्यांची प्रेमसमाधि निश्चळ झाली होती. पण इतक्यांत दोडग्यांनीं भुई आपटून निवांतपणा मोडला. प्रकाशाचा झोत पाडून अंधेर निपटला आणि प्रेमिकांच्या समाधीवर झडप घालून त्यांच्या एकांताचा भंग केला! एका क्षणांत त्यांच्या प्रेमदिवाळीचा शिमगा झाला.










## ५. क्रांतीची साध्य-साधन-मीमांसा

क्रांतिवीरांच्या अपेक्षेप्रमाणें वर्तमानपत्रांत बातमी तर ठळकून आली. पण ती कशी आली ? मसाल्या-विरहित केलेल्या कालवणाप्रमाणें आली. वास्तविक हा मनसुबा तडीस नेण्यासाठीं जिवा कैक दिवस मालमसाला घाटीत होता. टेहळणीनें मिळविलेली बारीकसारीक माहिती आयास आणीत होता. क्रांतिचे उडीद मंत्रून तो आपल्या अनुयायांना भारीत होता. या त्याच्या परिचाराप्रमाणें बातमी जराशी पाटावांत आली असती तर त्याच्या समाधानाला मोल नव्हतें. पण ती वर्तमानपत्री अवांतर बातमीसारखी सूडकें नेसून आली.

कोणा व्यक्तीच्या लौकिकाला बाध येऊं नये म्हणून हे वर्तमानपत्रवाले अथवा त्यांना बातम्या पुरविणारे भले लोक नांवगांव गुप्त राखीत असावे. मग हे बातमी देतात तरी कशाला ? नांव लपविल्या-नंतर व्यक्तीचें व्यक्तिमत्व राहिलें कोठें ? ज्यांनीं तें कृत्य केलें ते नांवानिशीं निसूट राहिले तर त्याला कांहीं अर्थ तरी आहे. कारण, त्यांना समाजाबाहेर राहून असलीं कृत्यें करावयाचीं असतात. पण जे समाजांतच नांदत असतात त्यांचें नांव बाहेर कां येऊं नये ? त्याच्यावर पांघरूण घालण्यांत स्वारस्य काय ?

जिवा नाराज झाला तो यामुळेंच. पण त्याचे अनुयायी 'कोल्हा काकडीला राजी' या न्यायानें छापून आलेल्या बातमीनें हरखले. त्यांना आपण गाजविलेल्या मर्दुमीचा होश आला. " अहो, वर्तमानपत्रांत छापून आलें होतें तें. त्यांतली ती बाई आमच्या समोरच्या वाड्यांत राहते. " किंवा, " त्या लफंग्याची मात्र कमाल आहे हं ! पाळतीशिवाय झालें नाहीं हें. " यांसारखी बोलणीं कोणी आपसांत बोलूं लागले म्हणजे तीं ऐकून भिवा-शिवा मनांतल्या मनांत चूर होत. " या बदमाषांना सैल सोडले तर उद्यां डोळ्यांदेखत भररस्त्यांत असले प्रकार होऊं लागतील. " असे उद्गार कोणी काढले म्हणजे भिवा-शिवा एक मतानें म्हणत, " अजून काय पाहिलें आहे ? हें नुसतें नमन आहे नमन ! खरा खेळ अजून रंगायचा आहे ! पाहाल. "

कांहीं दिवस लोटले. वर्तमानपत्रांनीं जें गिळून टाकिलें म्हणून जिवाला रुखरुख लागली होती, तें बंधाऱ्याच्या कांठाकुसानें फुटून पाझरणाऱ्या पाण्याप्रमाणें बाहेर पडल्याशिवाय राहिलें नाहीं. कारण, प्रवाद हा मोठा घट आहे. त्याला जसे अनेक कान आहेत, तशीं अनेक मुखेंहि आहेत. त्याला लौकिकाची चाड नाहीं कीं खऱ्याखोट्याची पर्वा नाहीं. गिरणींत हळकुंड भरडून निघतें आणि बाजरीही पिसून निघते. शिवाय, प्रवादाच्या पोटीं घडूं नये तें घडून येतें. आणि साक्षात घडलेलें शतरूपानें लोकांच्या मुखीं होऊन बसतें. काल्याबरील बातमी वर्तमानपत्रांनीं निनांवी ठेविली, तरी प्रवादानें नांवागांवानिशीं उजेडांत आणिली.

हा प्रवाद ऐकून भिवा-शिवांना किंचित वैषम्य वाटलें. विशेषतः त्या बाईच्या पूर्वचरित्राशीं जिवाचा संबंध कळून येतांच त्यांच्या मनांत जिवाबद्दल विकल्प दाटून आला. गोळीबंद कैरीचा दृष्टांत अधिक स्पष्ट झाला. स्वार्थ साधण्यासाठीं जिवानें आपला उपयोग करून घेतला, क्रांतिच्या नांवानें वैयक्तिक सूड उगवून घेतला असा त्यांचा ग्रह झाला.

भिवा-शिवांच्या मनांतली ही धुटमळ त्यांच्या धुम्या वृत्तींत उतरल्याचा कयास जिवानें अचूक बांधला आणि त्यांच्यावर आलेला संशयाचा धुरकटपणा उजळण्यासाठीं त्यानें फुंकर घातली.

" गड्यांनों, आपल्या क्रांतीचा पाहिला प्रयत्न तर कल्पनेबाहेर यशस्वी झाला ! "

जिवाचे शब्द ऐकतांच भिवा-शिवांनीं परस्परांकडे पाहत त्याची नजर चुकविली.

" कांहीं नाहीं म्हटलें तरी हजार दोन हजारांचा विषय आपल्या हातीं आला आहे. सुपारीचा गणपती पुजावयाचा झाला तरी सहज मूठभर तांदूळ बैठकीला लागतात. मग आपण तर काय समजून उमजून क्रांतीसाठीं फकिरी पत्करलेली. रोजच्या गुजराणीसाठीं काय लागत नाहीं ? आणि निदानपक्षीं तेवढी चंदी जवळ असल्याखेरीज क्रांतीची उठावणी कशी व्हावयाची ?

तुम्ही दोघे तूर्त कामधंद्यांत आहां, म्हणून ठीक आहे. पण उद्यां आपण सर्वांनीं क्रांतीसाठींच आयुष्य वाहून घेतलें, म्हणजे चरितार्थाची सोय काय ? त्यासाठीं ही पूर्वतयारी आहे. क्रांति तर अजून पुढेंच आहे. तिची ही केवळ ललकारी आहे. ''

भिवा–शिवांनीं पुनश्च परस्परांकडे पाहिलें आणि जिवाच्या नजरेशीं नजर भिडविण्याचें टाळलें.

त्यांची हालचाल जिवाच्या लक्षांत आली. त्यानें मान उंचावून त्यांच्याकडे पाहिलें आणि त्यांना डंवचून बोलते करण्याच्या हेतूनें म्हटलें,

'' अरे, तुम्ही असे लोणच्यासारखे मुरून काय बसलां ? मनांतून बोलावयाचें आहे, तें गिळतां कां ? घळघळून बोला. मी तुमचा पुढाईत म्हणून संकोच कसला ? चूकभूल असेल तर द्यावी आणि घ्यावी. ''

भिवा खाकरला. शिवा मांडी पालटून बसला.

'' हं. ''

भिवानें सुरुवात करावी म्हणून शिवानें त्याच्या बरगडींत कोंपर ढोसलें.

''हें बघ जिवा......''

'' काय ? ''

'' लोक बोलतात त्यावरून आम्ही कांहीं वेगळेंच ऐकतों. ''

'' पण काय तें बोला ना ? तर मला समजेल. काय बोलतात लोक ? काय ऐकलें तुम्हीं?''

'' खरें खोटें देव जाणे ! पण त्या बाईनें पूर्वी तुझा प्रेमभंग केला होता म्हणून तूं हा अतिप्रसंग आकसानें केलास ! ''

'' मग त्यांत काय बिघडलें ? ''

'' म्हणजे हें थोडसें वैयक्तिक वैर नाहीं कां उगवल्यासारखें होत ? क्रांति ही केवळ सामुदायिक वैराकरितां असते, असें आम्ही तुझ्या तोंडून ऐकिलें आहे.''

'' बरोबर आहे. पण वेळ अशी येते कीं वैयक्तिक वैर आणि सामुदायिक वैर दुभंगतां येत नाहीं. व्यक्ति हा समुदायाचा एक घटक आणि अनेक घटकांचा मिळून समुदाय. म्हणून एकाद्या व्यक्तीवर अन्याय झाला तर तो समुदायावरच झाल्यासारखा नव्हे काय ? पण ही कळ ओळखण्याइतका समुदाय जागरूक नसतो. तो उदासीन राहतो अथवा डोळेझांक करतो. ही उदासीन वृत्ति अथवा डोळेझांक अंगवळणीं पडली म्हणजे समुदायाची प्रतिकारशक्ति बोथट होते, क्षीण होते. अशा वेळीं क्रांतीची उठावणी करण्याचा प्रसंग येतो. तसा तो आतां आला आहे. तुम्ही ऐकिला तो प्रवाद खराच आहे. माझ्यासारख्या माणसावर प्रेमभंगाचा प्रसंग येतो याचें कारण समुदायांत भिनलेली विषमता. पोटासाठीं भाकरीचा प्रश्न जसा निकडीचा आहे तसा मनासाठीं प्रेमाचा म्हणजे प्रेमाच्या भाकरीचा प्रश्न तितकाच निकडीचा आहे. ''

जिवा एकामागून एक प्रमेयांची फैर झाडूं लागला, तसे भिवा—शिवा शस्त्रहीनांप्रमाणें बारगळूं लागले.

'' लोकप्रवादाप्रमाणें मी वैयक्तिक वैर साधलें असलें तरी त्यामुळें अंतीं सामुदायिक वैराचेंच परिमार्जन होणार आहे. त्यांतूनच सामुदायिक कल्याणाचा मार्ग निघणार आहे. आपणांस मिळालेल्या पैशाचा विनियोग असाच वैयक्तिक न होता तो सामुदायिक क्रांतीसाठीं व्हावयाचा आहे. मला त्या पैशाचा काय उपयोग आहे ? संभाळा हें ! क्रांतीसाठीं मीं नरोटी घेतली आहे. ''

जिवाच्या अयाचित वृत्तीनें भिवा भांबावून गेला. जिवाच्या म्हणण्याला फाटे कसे फोडावे याची शिवाला पंचाईत वाटूं लागली.

'' तुम्ही म्हणाल कीं क्रांति ही राजकीय हेतूसाठींच राबविली पाहिजे. मला तसें वाटत नाहीं. क्रांति कोणतेंहि एकच कारण ओळखित नाहीं. ती राजकीय, सामाजिक, आर्थिक, पारमार्थिक सगळ्या आघाड्यांवर सारखीच नाचविली पाहिजे. आतां आपली ही पहिली शिकार सामाजिक कारणासाठीं झाली याचें कारण आपली आर्थिक कोंडी. पण यापुढें आपलें दुसरें पाऊल राजकीय क्रांतीसाठींच पडावयाचें आहे आणि तें मी ठरविलेंहि आहे.''

पूर्वरंग संपून उत्तर रंगाला सुरुवात व्हावयाची







असली म्हणजे गहाळश्रोते डोळे चोळीत सरसावतात तसे भिवा–शिवा आतुर झाले.

"गड्यांनों, इंग्रजाचें राज्य येथें कां व कसें आलें ही हातावेगळी झालेली गोष्ट आहे. तें एक आपल्या पूर्वजांचें ऋण आहे म्हणा ना! पण आतां येथून इंग्रजाला गचांडी कशी द्यावयाची ही समस्या आपल्यापुढें आहे. अर्थात् त्यासाठींच आपण क्रांतीचे पाईक झालों आहों. इंग्रजाचें राज्य आपण निमूटपणें मानणें म्हणजे मेल्या आईचें दूध प्याल्यासारखें आहे वगैरे जळजळीत भाषणें आपण आजवर ऐकत आलों. पण त्याच वेळीं केवळ आमचें भले करण्यासाठींच इंग्रज येथें आला आहे असें परोपरीनें सांगणाराहि एक वर्ग आहे."

मग त्यांत काय गैर आहे? इंग्रजी राजवटीचे फायदे शाळांतून आम्ही पढलों ते काय खोटें, असे प्रश्न भिवा--शिवांच्या मुद्रेवर उमटलेले जिवानें हेरले.

"आपली सामाजिक विषमता कायम ठेवण्याचा प्रयत्न इंग्रजानें आजवर केला आहे. त्यानें आमच्या धर्माचा ऱ्हास केला आहे. त्यानें चातुर्वर्ण्याचें बंड मोडण्याचा घाट घातला आहे. त्यानें आमच्या संपत्तीचा झरा शोषून आम्हांस मोलकरी बनविलें आहे. त्यानें आमच्या क्षात्रवृत्तीचा बोजवारा उडविला आहे! कोठें आपले इंद्राच्या ऐरावताला गवसणी घालणारे पूर्वज आणि कोठें आम्ही साहेबाच्या खाकरण्यानें मुंगीच्या विळांत घुसणारे त्यांचे वंशज! ज्या आम्हां पूर्वजांचे घोडे एके काळीं सिंधूंत न्हाले, त्यांचेच वंशज आपण आणा—दोन आणे तासानें सायकली तावडीत आहों. हा कशाचा परिणाम? त्या इंग्रजी राजवटीचा! असें असूनहि ही निवळ राजवट चांगली म्हणून जे टाळ्या पिटतात, त्यांचा आपण नायनाट केला पाहिजे. त्यांना मोडून काढिलें पाहिजे."

म्हणजे काय करावयाचें, असा दुसरा प्रश्न भिवा—शिवांनीं कुळबुळ करुन सुचविला.

"इंग्रज चांगला म्हणून त्याला कोण कवटाळतो? त्याचे गुण एकतारीवर कोण गातो? डोळे उघडून पाहा। कान देऊन ऐका। त्या टेकडीवर तुम्ही कधीं गेलां आहां काय? तेथें काय आहे हें डोळे उघडून पाहिलें आहे काय? तें कशाचें द्योतक आहे याचा कधीं विचार केला आहे काय? नसेल तर विचार करा. डोळे उघडून पाहा. त्या टेकडीवर जा. म्हणजे तेथें तुम्हाला दिसेल कीं इंग्रज चांगला असें म्हणणाऱ्या एका गृहस्थापुढें त्याच्या तिघां अनुयायांनीं शपथा घेतल्याचें एक स्मारक उभें केलें आहे. त्या स्मारक–शिळेवर शपथ घेतल्याचा काळ '१२ जून १९०५' असा नमूद केला आहे. त्या दिवशीं, त्या ठिकाणीं, त्यांच्या देशसेवेचा शपथविधि झाला."

मग देशसेवेची शपथ बरी कीं वाईट, अशी साशंकता भिवा–शिवांमध्यें निर्माण झाली.

"हा शपथविधि सोज्वळ दिसेल. पण त्यांच्या देशसेवेची जात कोणती याचा विचार केला तर काय उत्तर मिळेल? आपण जातीचा विचार प्रथम केला पाहिजे. त्या विचारांतीं त्यांची देशसेवा म्हणजे इंग्रजांचें राज्य येथें स्थायिक करण्याचा तो एक पध्दतशीर कट आहे असें कळून येईल. आपण तो कट हाणून पाडला पाहिजे."

कट असेल तर तो हाणून पाडलाच पाहिजे, याबद्दल भिवा–शिवांचें एकमत झालें.

"तो हाणून पाडावयाचा म्हणजे त्या स्मारकाचा उच्छेद करावयाचा. शिवाजीनें असाच म्लेच्छांचा उच्छेद केला. आम्ही त्याचे वंशज. आम्ही असले खोडसाळ शपथविधि मानीत नाहीं. आपलेंच उदाहरण घ्या. आपण क्रांतीचे पाईक झालों म्हणून कधीं शपथा घेतल्या आहेत? एका विचाराच्या मंडळींना शपथेची जरुरी काय?"

शपथेखेरीज आपण किती एक दिलानें काम करीत आहों याचें कौतुक भिवा–शिवांच्या मुद्रांवर झळकूं लागलें.

"माझ्या मतें हें स्मारक उभें राहूं देणें म्हणजे आपली शरम चवाठ्यावर मांडण्यासारखें आहे. म्हणून तें नष्ट केलें पाहिजे. विचार करा. यःकश्चित् फाटका माणूससुद्धां शरम झांकण्यासाठीं केवढा आटापीट करतो. भीक मागतो, प्रसंगीं चोरी करतो, पण शरम उघडी करुन दाखवीत नाहीं. तें या देशसेवक








मंडळींनीं केलें आहे. आणि आपण तसें करीत असल्याचें जाहीर करण्यासाठीं स्मारकाचा खटाटोप करून, उन्हातान्हांत मजुरांना राबवून त्यांची पिळणूक केली आहे. हें कोण सहन करील ? काय ? या विचारानें तुमच्चीं डोकीं भडकून जात नाहींत काय?''

पण डोकें भडकण्यासाठीं विचार तर करावयाला हवा? आणि तो तर आम्हीं अनुयायांच्या नात्यानें केव्हांच डोक्यावाहेर टाकला आहे, असा उपरणें झटकल्याचा निर्लेपपणा भिवा—शिवांनीं उघड करून दाखविला.

"या स्मारकाला आपण धक्का लाविला तर आपल्या कृत्याचा उदोउदो होईल. आजवर पुतळ्यांची मोडतोड केल्यावरून अथवा नुसतें डांबर ओतल्यावरून कैकजण कायमचे देशभक्त होऊन बसले आहेत ! मग आपण कां नाहीं होणार ? स्मारकाचा उच्छेद करणारांवर वर्तमानपत्रांतून झोड उठेल ! लोक घरोंदारीं हा एकच विषय बोलूं लागतील ! सरकारहि जागें होऊन तपासाचा घंटानाद घुमवील कदाचित् मोठें बक्षीसही जाहीर होईल. मग आपल्या मागें ससेमिरा लागेल. तो टाळण्यासाठीं आपणांस झुकांड्या द्याव्या लागतील. क्रांतीची डांबरबत्ती पेटेल. आपल्याला लपूनछपून राहावें लागेल. नांवें बदलावीं लागतील. वेष पालटावे लागतील. क्रांतीचा थयथयाट सुरू होईल ! क्रांतीचा जयजयकार असो ! क्रांति चिरायु होवो ! ''

'हेंचि दान दे गा देवा !' होतांच मृदंगांची टिपरघाई होऊन आख्यान संपतें तसें जिवानें क्रांतीच्या जयजयकारांत आपलें प्रभावी भाषण संपविलें. त्याची रोखलेली नजर, पसरलेले हात आणि 'बोला काय तें' अशा अर्थाची मुद्रेवरील निकड भिवा—शिवांना ठरूं देई ना. त्यांना परस्परांकडे पाहण्याची चोरी झाली.

"ठीक आहे. तुमच्यासारखे अनुयायी लाभले याबद्दल मला धन्यता वाटते. ठरला बेत. उद्यां आपला मोर्चा त्या टेकडीवर ! जय क्रांति !''

भिवा—शिवाला एका अक्षराचाही रिघाव न देतां जिवानें बेत ठरवून टाकिला. आणि ते दोघे पेंढीच्या गुरांप्रमाणें त्याला अनुसरले.

## ६. पहिली राजकीय क्रांति

त्या तीन क्रांतिवीरांनीं अगाऊ ठरविल्याप्रमाणें टेकडीकडे मोर्चा वळविला. पहार, टिकाव, टॉर्च इत्यादि बारीक मोठीं साधनें बरोबर घेतलीं. रेसिडेन्सीला डावें घातलें. वैदुवाडीला बगल दिली. आणि पांडवांच्या लेण्याच्या रोखानें ते धीरे धीरे चढूं लागले. वास्तविक पलीकडच्या खोपाडांतून चढ घेणें अधिक सोयीचें होतें. पण तेथें मिलिटरीच्या बराकी ठाणें मांडून बसल्या होत्या. म्हणून त्यांना हें आडवळण घेणें भाग पडलें. पण तें घेण्यांतही आपण साक्षात् गोळी वाजविणाऱ्या सैनिकांच्या नाकावर टिचून केवढें साहस करणार आहों याबद्दल अहंकार निर्माण झाला होता. आणि तो त्यांच्या हालचालींत वाऱ्यावरील परिमळाप्रमाणें नाचत होता.

चढण संपली. स्मारकाच्या टेपाडावर क्षणभर उभें राहून त्यांनीं सभोवार दृष्टी फिरविली. अर्ध वर्तुलाकार दिव्यांच्या लुकलुकाटांत अवघें पुणें शहर गाढ पसरलें होतें. स्टेशनच्या बाजूचेच काय ते भगभगीत दिवे रेल्वेची पाहणी करीत होते. शंटिंग करणाऱ्या एंजिनाचा ध्वनि भक् भक् करीत अधूनमधून ऐकूं येत होता. डाव्या अंगाच्या वैदुवाडींतील कुत्रीं कारण नसतां भुंकं टाकीत होतीं. मात्र उजव्या अंगाच्या मिलिटरी बराकींतून सजीवपणाची निशा उमगून येत होती.

हा सजीवपणा आपल्याला नडेल कीं काय हें पहाण्यासाठीं जिवा टोंगाच्या बाजूला चार पावलें चालून गेला. भिवाशिवांनीं हत्यारें खालीं ठेविलीं. जिवानें वर्णन केलेलें स्मारक एकदां अखेरचें बघून घ्यावें म्हणून शिवानें टॉर्च काढला. प्रकाशाचा झोत फिरत फिरत शिलालेखावर ठरला. तेव्हां त्याला इतर मजकुराबरोबर 'नलु', 'सिंधू' अशीं नांवेंहि कोरलेलीं आढळलीं !

"आं ? नलू ? ''

"कोण नलू ? ''

"अरे ती कालव्यावरची नलू कीं काय ? ''








इतक्यांत जिवा वाघासारखा चवताळून आला आणि त्यानें फटकारून टॉर्च काढून घेतला.

" मूर्खा, घात करशील एखादा. साधा चोर देखील टॉर्चचा उपयोग करीत नाहीं. आणि तूं क्रांतिवीर! असला गहाळपणा करतोस? आपण टेकाडावर आहों हें विसरलास?"

पण शिवाच्या त्या मिनिट दोन मिनिटांच्या प्रकाशानें घेत नासणार कीं काय असा रंग दिसूं लागला. खालच्या वराकींत कुजबूज चालल्याचें ऐकूं येऊं लागलें.

" गाढवपणा केलास! प्रकाशाच्या रोखानें गोळी आली तर शिकार होईल आपली! चला आटपा आतां. तो स्तंभ खालीं येईल कीं नाहीं शंका आहे आतां. वाच ऐकून त्यांचा संशय दुणावेल. आणि त्यांच्या बंदुकांखालीं कुत्र्याच्या मरणानें मरावें लागेल. आपल्याला इतक्यांत मरावयाचें नाहीं; जगावयाचें आहे. क्रांतीसाठीं!"

मग त्या तीन क्रांतिवीरांनीं करवेल तेवढी नासधूस आरंभिली. कठड्याचे नळ फेंदारून टाकिले. सिमेंट–कॉंक्रीटचे तीन गरदे उखडले आणि विदारून टाकिले.

इतक्यांत जिवाचा संशय बळावण्याइतकी हालचाल बराकींत दिसूं लागली. म्हणून ते तिघे क्रांतिवीर झालें गेलें तेवढेंच खूप समजून आल्या वाटेकडे धांवले.

पहांटे टेकडीवर आलेल्या पहिल्या मंडळींना पायवाटेवर पडलेल्या एका गरद्याला अडखळून जावें लागलें. फटफटीत उजाडल्यानंतर त्यांपैकीं काहीं माघारीं फिरले तेव्हां त्यांना स्मारकाचा कठडा दुखवल्याचें दिसून आलें. कठडा आंखबंद ठेवणारे तीन गरदे तीन ठिकाणीं विदारून पडले होते.

" कुणीं तरी चावटपणा केलेला दिसतो आहे. पाहिलें कां त्रिंबकराव, काय झालें आहे हें? कालच्या रात्रीचा प्रकार दिसतो आहे. काय चावट लोक तरी?"

चावटपणा आणि चावट लोक! क्रांतिवीरांच्या क्रांतीची ही पहिली राजकीय चुणूक केवळ या दोनच शेलक्या शब्दांनीं आहेरली गेली. त्यानंतर त्याबद्दल कोठें गाजावाजा नाहीं, बोलबाला नाहीं, कांहीं नाहीं. वर्तमानपत्रीं निर्देश तर मुळींच नाहीं.

जिवा निरुत्साहानें कपाळाला हात लावून म्हणतो, " च्र् च्र्! दुसऱ्या कोणी दखल घेतली नाहीं तर नाहीं. पण निदान 'ज्ञानप्रकाश'नें तरी आमची उपेक्षा करावयाला नको होती."

---

## साहित्यांतील यजमानगिरी!

जॉन्सन् हा इंग्रजीचा पहिला एकहाती शब्दकोशकार. आपल्या कामांत मदत करण्यासाठीं त्यानें लॉर्ड चेस्टरफील्डला मिनतवारीनें लिहिलें. त्या वेळीं ते राजश्री आपल्याच घमेंडींत होते. नंतर डॉ० जॉन्सननें आपल्या एकट्याच्या बळावर तो शब्दकोश पुरा केला. तें प्रचंड कार्य पुरें होत आल्याची वार्ता कानांवर आल्यावर लाटसाहेब जागे झाले व त्या कोशाची अर्पणपत्रिका मात्र आपल्या नांवाची व्हावी या हेतूनें त्याची आस्थापूर्वक तारीफ करूं लागले. त्या वेळीं डॉ० जॉन्सननें जें स्वाभिमानपूर्वक उत्तर दिलें त्या उत्तरानें या पेट्रनशाहीची, साहित्यांतील यजमानगिरीची, अखेर केली व तेथून इंग्रजी साहित्यांत 'Common Reader' हा एक लेखकांचा फार प्रिय प्राणी होऊन बसला. हा साधारण वाचकांचा वर्ग हाच साहित्याचा एकमेव यजमान बनला.

—सौ० कुसुमावती देशपांडे

[ता. १२ जानेवारी १९४८ रोजीं 'मराठी वाङ्मय-परिषद्, बडोदें, अधिवेशन १३वें, या प्रसंगीं दिलेल्या अध्यक्षीय भाषणांतून.

—' अभिरुचि '–फेब्रुवारी ' १९४८






# इंग्रजी भाषेची व्युत्पत्ति

प्रा. ना. पां. गुणे

ह्या लेखांत भाषाशास्त्र-दृष्ट्या इंग्रजी भाषेची उत्पत्ति, व्युत्पत्ति व तिचें हिंदी व मराठी भाषांशीं असलेलें नातें यांचा विचार करण्याचें ठरविलें आहे. इंग्रजांचें साम्राज्य संपलें असल्यानें इंग्रजी भाषेचाहि आमच्या बुद्धीवर आजवर असलेला अम्मल संपला; आतां स्वतंत्रपणें त्या भाषेविषयीं व तिच्या समृद्ध वाङ्मयाविषयीं विचार मांडण्यास अगदींच हरकत नाहीं. इंग्रजीचें वर्चस्व, इंग्रजांचें राजकीय वर्चस्व कमी झाल्यामुळें, नाहींसें झालें पाहिजे असें कित्येकांस स्वाभाविकच वाटतें. पण स्वतंत्रपणें त्या भाषेविषयीं अभ्यास करून तिचें स्वरूप, तिचा इतिहास व तिच्या वाढीचीं कारणें शोधून काढण्यास हरकत नाहीं. उलट, तसें करून त्यापासून आपल्या देशभाषांशीं तुलनात्मक अभ्यास केल्यास तो अनेक दृष्टींनीं उपकारक ठरणार आहे. आतां 'वाघिणीचें दूध' म्हणून तिचा उदो उदो करण्याची जरूरी नाहीं; पण जगांतील एक मोठी भाषा ह्या दृष्टीनें शास्त्रीय दृष्ट्या तिचें ज्ञान करून घेणें व विद्यार्थ्यांस तें देणें मात्र अवश्य राहील. जगांतील नामवंत भाषा व वाङ्मयें यांचा समतोलपणें अभ्यास करण्याविषयीचें आमचें कुतूहल जागृत न राहिलें तर बौद्धिक दृष्ट्या तरी आमच्यांत कांहीं तरी उणीव राहील. शास्त्रजिज्ञासा कायम ठेवणें म्हणजेच मानसिक तारुण्य अखण्ड राखणें होय.

इंग्रजी भाषा श्रीमंत आहे. तिचा शब्दार्णव अफाट आहे. पृथ्वीवरील बरीच भूमि तिनें व्यापली आहे. परंतु तिची ही श्रीमंती नुसती विस्तारानेंच मोठी नसून तिची अंतरींचीहि श्रीमंती मोठी आहे. हें सर्व त्या भाषेला कसें करतां आलें? त्याला केवळ राजकीय कारणेंच आहेत कीं दुसरींहि कांहीं कारणें आहेत? याचा पूर्वग्रह सोडून समतोलपणें विचार केल्यास त्यापासून देशी भाषा समृद्ध करण्याचे मार्ग आपणांस सांपडूं शकले तर तो लाभ कांहीं लहान नाहीं असें दिसून येईल.

## जागतिक अगर आंतरराष्ट्रीय भाषा

आज इंग्रजी भाषा विश्वव्यापी होऊन बसलेली आहे यांत वाद नाहीं. असें दिसून आलें आहे कीं युद्धपूर्व जगांतील जागतिक पोष्टाचे द्वारा होणाऱ्या पत्रव्यवहारांत शेंकडा पन्नास पत्रें इंग्रजींत लिहिलीं जातात. राहिलेल्या पन्नासांत इतर भाषांच्या वांट्याला प्रत्येकीं काय येईल याची कल्पनाच करणें बरें. यावरून जगाच्या व्यापारांत व राजकारणांत इंग्रजी भाषेचें स्थान काय आहे याचा अंदाज करतां येईल. इंग्रजी भाषा आतां केवळ इंग्रजांचीच राहिलेली नाहीं असाच याचा अर्थ नाहीं काय?

जगांत अनेक प्रभावी भाषा असतात. त्यांपैकीं कांहीं नशिबानें आंतरराष्ट्रीय उपयोगाच्या भाषा बनतात. इतिहासांतून अशा अनेक भाषांचीं नांवें सांगतां येतील. अतिप्राचीन काळीं सुमेरियन भाषा अशीच जागतिक भाषा बनली होती. लष्करी व्यवहार, व्यापार व राजकारण त्या काळीं त्या भाषेंत चालत असत. फार काय, त्या भाषेची चित्रलिपि आपल्या आर्य लोकांसहि तेव्हां वापरावी लागली, ह्यासंबंधीं आज आपल्याला पुरावा सांपडला आहे. मध्यपूर्वेला **बो घा स की** येथें जे ऐतिहासिक महत्त्वाचे कागदपत्र सांपडले आहेत त्यांवरूनहि हेंच








दिसतें. त्या वेळचे हिट्टाइट नांवाचे आर्य लोक व त्यांचे राज्य प्रस्थापित करण्याचे प्रयत्न ही एक मोठी घटना होय. त्या लोकांनीं प्रथम रानटी घोड्याला तालीम देऊन त्याचा लष्करासाठीं कसा उपयोग करावा ह्याविषयीं शास्त्र तयार केलें, तेंच पुढें अश्वविद्या म्हणून इतिहासांत पुढें आलें. हें शास्त्र आर्य-भाषेंत पण सुमेरियन लिपींत लिहिलेलें आज उपलब्ध झालें आहे. सुमेरीनंतर रोमन लोकांची लॅटिन भाषा निदान युरोपपुरती तरी आंतरराष्ट्रीय राजकारणाची भाषा बनली. ती अनेक शतकें राज्यकर्ते वापरीत. मध्ययुगांत व्यावहारिक भाषा म्हणून लॅटिन भाषेची कन्या फ्रेंच भाषा पुढें येऊं लागली. फ्रेंच भाषेमध्यें एक प्रकारचा टोंकदारपणा आहे. त्यामुळें विचार स्पष्ट व निःसंदिग्धपणें मांडण्यास तिचा जसा उपयोग होतो तसा दुसऱ्या भाषेचा होत नाहीं. म्हणून कायदेकानू, राज्यघटना व व्यवस्था, तहनामे, विविध राष्ट्रांच्या सरकारांनीं पाळण्याच्या अटी, संकेत वगैरे फ्रेंच भाषेंत होऊं लागलें. ही स्थिति एकोणिसाव्या शतकाच्या अंतापर्यंत टिकून राहिली. 'इंग्रजांचें राष्ट्र हें बनियांचें राष्ट्र, त्यांची संस्कृति कमी कणखर व कमी दर्जाची, त्यांची भाषा ही त्याच्या संस्कृतीप्रमाणें बोथट ', असें फ्रेंच टीकाकार म्हणूं लागले. नेपोलियन बोनापार्ट इंग्रजांना ' दुकानदारांचें राष्ट्र ' असें म्हणून तोऱ्यानें फ्रान्स-पेक्षां कमी लेखीत असे हें सर्वांस माहीत आहेच. विसाव्या शतकांतील दोन युद्धांनंतर ही परिस्थिति पार पालटून गेली ! इंग्रजी व फ्रेंच भाषांची चुरस सुरू होऊन जगाच्या बाजारांत फ्रेंच भाषा मागें पडूं लागली व इंग्रजी पुढें सरसावूं लागली.

युरोपांत बऱ्याच भाषा आहेत. प्रत्येक भाषेला तिचे स्वतःचे असे कांहीं विशेष गुणधर्म आहेत; सर्वच भाषा सर्वच विषयांना सारख्याच उपयोगी पडत नाहींत. पुष्कळ भाषा शिकलेल्या माणसास, त्या त्या भाषांचे गुणधर्म वेगवेगळे आहेत, हें सहज आढळून येतें. उदाहरणार्थ, इटॅलियन भाषा संगीत व कला यांचा संसार मोठ्या थाटानें करते असें त्यास दिसून येतें; तत्त्वज्ञान, शास्त्रसंशोधन वगैरे जर्मन भाषेंत अधिक सुलभ झालें आहे असें कळून येतें व मानस–शास्त्र, टीका–शास्त्र, तर्कशास्त्र वगैरे-साठीं फ्रेंच भाषा उपयुक्त वाटते. फ्रेंच भाषेमध्यें व्यंजनें मृदु व आवाज लयबद्ध असतो. त्यामुळें मानवी बुद्धि नाचेल तशी ती भाषा नाचूं शकते. उलट जर्मन भाषा स्थूल, तिचीं व्यंजनें कठोर व कर्कश, यामुळें तत्त्वज्ञान व युद्धशास्त्र ह्यांना ती भाषा जास्त उप-योगीं पडते. इंग्रजी भाषेंत इटॅलियन भाषेचें स्वर-माधुर्य नाहीं, फ्रेंच भाषेचें मृदु व्यंजनांचें लालित्य नाहीं, संस्कृत अगर ग्रीक भाषेसारख्या अभिजात वाणींत आढळणारा माधुर्य आणि लालित्य यांचा संगमहि नाहीं. ग्रीक आणि संस्कृत या इह-पर--लोकींच्या भाषा वाटतात. इंग्रजी त्या मानानें ओबडधोबड व ऐहिक व्यवहाराला उपयोगी; तिच्यांत जडत्व फार. तिचे स्वर मिश्र जातीचे, व्यंजनें तीव्र अगर कठोर, तिच्यांत '' स ''कार फार. 'स'चा सुळसुळाट तर इंग्रजींत इतका प्रचंड आहे कीं त्यामुळें ती बोलतांना सापाच्या फूत्कारा-प्रमाणें वाटते अशी तक्रारहि तिच्याबद्दल झाली आहे ! ह्या 'स'मुळेंच तिच्यांतील गोडी कमी झाली आहे. पण इंग्रजी बोलतांना ताल चढणारा असल्यामुळें तिच्यांत एक प्रकारचा भारदस्तपणा येतो. स्पॅनिश भाषेचें तसें नाहीं. तिचे ताल उतरते व स्वर ऱ्हस्व व तीव्र; त्यामुळें ती भाषा कानांतील पडद्यांस ग्रॅमोफोनच्या पिनप्रमाणें बोचते असें वाटतें. भाषेंत खरखरीतपणा नसावा. उर्दू भाषेंतील 'ख'चा उच्चार फारसा लोकप्रिय होणार नाहीं. कारण तोहि असाच बोचक उच्चार वाटतो. चिनी भाषेंत प्रत्येक शब्द व्याकरणदृष्ट्या व उच्चारदृष्ट्या स्वतंत्र असतो. दोन 'चिन्यां'चें परस्परांतील संभाषण चिमण्यांच्या किलबिलाटासारखें वाटतें, अगर पिंग–पाँगचा चेंडू लावलेल्या सतारीच्या तारेवर उडतांत असल्याचा भास होतो. ग्रीक आणि संस्कृत भाषांतून अनुभवास येणारा संगीताचा आत्मा मात्र कोठल्याहि विद्यमान भाषेंत अनुभवास येत नाहीं. अनेक भाषांशीं संबंध येऊन त्यांच्यांतील अनेक गोष्टींचा स्वीकार करण्याची संवय लावून घेतल्यामुळें भाषा या दृष्टीनेंहि इंग्र-जीचा नंबर बराच वरती लागेल असें भाषाशास्त्र-ज्ञांचें मत आहे.

आज जवळजवळ सर्व जगांत इंग्रजी भाषा उप-योगीं पडते. ती जगाच्या रंगभूमीवर नव्यानेंच







आली आहे. शास्त्रीय दृष्ट्या तिचें पृथक्करण केलें तर ती एकसंधी, एकजिनसी अशी स्वयंभू भाषा नाहीं हें ध्यानांत येतें. ती भाषा परपुष्ट आहे. तिनें उसनवारी करून आपला संसार समृद्ध केला आहे. सर्वभक्षकपणाबद्दल तर तिची फार ख्याति ! विनोदानें असेंहि म्हणतां येईल कीं इंग्रजी भाषा ही इंग्रजांची नसून जर्मनांची आहे. पण हा विनोद नसून तें एक ऐतिहासिक सत्य आहे !

'इंग्रजी भाषा'रूपी महानदीचें मूळ शोधण्याचा अव्यापारेषु व्यापार केला तर तें मूळ ऋषींच्या कुळांतच सांपडावयाचें ! रूपकाची भाषा सोडून सरळ भाषेंत व स्पष्ट शब्दांत सांगावयाचें म्हणजे इंग्रजी भाषेचें मूळ आर्यन भाषेच्या युरोपीय शाखोपशाखांपैकीं महत्त्व पावलेल्या जर्मन अगर जुन्या जर्मन भाषेंत सांपडतें ! आर्यन भाषेशीं इंग्रजी भाषेचा जवळचा संबंध आहे, हें समजण्यास मोठमोठे ग्रंथ पाहावयास नकोत. नुसती ऑक्सफर्ड डिक्शनरी केवळ मजेखातर चाळली तरी मी म्हणतों तें पटेल. इंग्रजी Free ( फ्री ) ह्या शब्दाची व्युत्पत्ति आर्यन ' प्री ' अशी दिली आहे. ह्यांत एक फार मोठें तत्त्वहि आपणांस सांपडेल ! आर्यन ' प्री ' हा धातु संस्कृत ' प्रेमन् ' ह्या शब्दास जन्म देतो व इंग्रजी Freedom म्हणजेहि व्युत्पत्ति दृष्ट्या ' प्रेमन् 'च ! समाजांत प्रत्येक व्यक्तीनें दुसऱ्याशीं प्रेमानें, गुण्यागोविंदानें वागणें म्हणजेच एकमेकांबरोबर प्रेमानें व्यवहार करून अभ्युदय व निःश्रेयस साधणें ! आर्यन संस्कृतीनें एका शब्दांत जगाला येवढी मोठी देणगी दिली आहे; मात्र तें आज आपणांस इंग्रजींतून सांगण्यांत येत आहे.

## थोडासा इतिहास

हिंदुस्थानवरच परक्यांच्या स्वाऱ्या झाल्या, इंग्लंडवर कधींच झाल्या नाहींत असें आपणांस गेलीं दोनशें वर्षें सांगण्यांत आलें; पण तें खरें नाहीं. इंग्लंडवर पांचसहाशें वर्षें सारख्या स्वाऱ्या होत होत्या. त्यांत एका आर्यन जमातीच्या अनेक टोळीवाल्यांनीं भाग घेतला होता व ते सर्व टोळीवाले यशस्वीहि झाले ! आणि ह्या टोळ्या जर्मनींत वस्ती करून राहिलेल्या आर्य लोकांच्या होत्या. त्यांनीं तेथील आदिवासी लोकांस एका कोपऱ्यांत कोंडून खूप चोप दिला व इंग्लंड जिंकून तेथें वसाहती केल्या.

हे टोळीवाले आक्रमक लोक ट्यूटॉनिक जातीचे होते. त्यांची भाषा ट्यूटॉनिक. ह्या भाषेनें त्या वेळीं उत्तर समुद्राला जणूं विळखाच घातला होता ! व ह्या भाषेंतूनच पुढें जर्मन, डच, फ्रिजियन व इंग्लिश या भाषा उत्पन्न झाल्या. ट्यूटॉनिक लोकांची जात व भाषा आर्यन असल्याबद्दल विद्वानाचें मताधिक्य आहे. आर्यन, ट्यूटॉनिक व जर्मन आणि इंग्रजी यांच्या तुलनेचा तक्ता असा आहे:—

( १ ) ह्या भाषांतील वर्णमाला ( स्वर आणि व्यंजनें ) योग्य ते अपवाद वगळल्यास एकमेकांशीं जुळत्या आहेत. त्या अरबी अगर इतर सेमेटिक भाषांशीं जुळत्या नाहींत.

( २ ) ह्या भाषांत षष्ठीचे प्रत्यय सारखे आहेत; उ० संस्कृत अस् , स्य; ट्युटॉनिक व इंग्रजी s, es, 's.

( ३ ) क्रियापदांचे द्वितीय पुरुषीं एकवचन सारखें आहे; संस्कृत स्थ; ट्यूटॉनिक व इंग्रजी St : to Sing गाणें, Sing+est तूं गातोस.

( ४ ) भूतकालवाचक धातुसाधिताचे प्रत्यय सारखे आहेत. संस्कृत आन; ट्युटॉनिक, इंग्रजी en ( beat, beaten )

( ५ ) पुष्कळच शब्द सारखे सांपडतात :

| संस्कृत | इंग्रजी | संस्कृत | इंग्रजी |
|---|---|---|---|
| चक्र | Cycle | धा | do |
| प्री | free | कन्या | hen |
| पशु | pecuniary | मृत | murder |
| नभस् | nebulous | दाघ | daeg=day |
| लुभ् | love | जुष् | choose |
| ऊर्ण, ऊर्णवाभि | wool, web | | |
| दुहितृ | daughter | बंध् | bind |
| मधु | meed | सद् | sit |
| विद् | wit, witan | पूर्ण | full. |
| भर | barn | | |

ही यादी केवळ उदाहरणादाखल दिली आहे. असे शब्द अगणित आहेत.







वरील गोष्टी व यांचा ध्यानांत धरल्यास संस्कृत व इंग्रजी यांचें काय नातें आहे व तें कोणत्या कारणामुळें जमून आलें, तें कळेल. ट्युटॉनिक भाषा हा त्या दोघींना जोडणारा दुवा आहे.

जे टयुटॉनिक लोक सहाव्या शतकांत इंग्लंडमध्यें वस्ती करून राहिले, ते सूर्य, चन्द्र, थॉर व वोडेन ( बुध ) या देवांचे उपासक होते. ते शूर, दर्यावर्दी व लढवय्ये लोक होते. त्यांना समुद्रपर्यटनाचा मोठा षोक असे. ते शरीरानें उंच, मोठे धिप्पाड व गौर-वर्ण असून त्यांच्या मनाची ठेवण मोठी धीरोदात्त व वीरोचित असे. त्यांच्यांत वीरत्व हाच एक मोठा गुण ( Virtue ) समजला जात असे. त्यामुळें त्यांच्या स्वर्गाच्या कल्पनाहि वीरांस साजेशाच आहेत. त्यांत प्रेमाचें ( Freedomचें ) राज्य असून शृंगाराचें अवडंबर माजविलेलें नाहीं. पराभव पाव-लेल्या शत्रूच्या कवटीचें सुधा-चषक ( chalice ) अगर कलश करून धारातीर्थी पतन पावलेले त्यांचे वीर ( wiros ) अमृततुल्य मदिराप्राशन करीत आहेत असें त्यांनीं स्वर्गाचें चित्र रेखाटलें आहे. थॉर हा त्यांचा इन्द्र असून तो शेतकऱ्यांचा देव आहे. थर्सडे हा त्यांचा दिवस, मेघगर्जना हें त्याचें शस्त्र. ' वोडेन 'चा दिवस म्हणजे वोडेन्स डे म्हणजे वेन्स्डे ( बुधवार ).

पण येवढ्यानेंच इंग्लंडवरील परचक्राचा इति-हास संपत नाहीं. तो देश ज्यूलियस सीझरनें आक्र-मून रोमन साम्राज्याच्या अंमलाखालीं आणला ही गोष्ट सर्वांस माहीत आहे. शेवटची स्वारी विजय-शाली विल्यमची. ह्या दोन्ही स्वाऱ्यांमुळें फ्रेंच व लॅटिन शब्द इंग्रजी भाषेंत आले.

अभ्यासकांच्या सोयीसाठीं ह्या इतिहासाचे कालखंड पाडावे लागतात. एका कालखंडाला पुराण्या इंग्र-जीचा काल व दुसऱ्या कालखंडास आधुनिक इंग्र-जीचा काल असें मानण्यांत येतें. पुराणी इंग्रजी भाषा ( Anglo-Saxon ) शुद्ध, स्वयंभू, सुश्लिष्ट व प्रत्ययांचा उपयोग करणारी आहे. ह्या भाषेंत समासहि असून तिचें स्वरूप संस्कृतसारखें आहे. आधुनिक इंग्रजी भाषेनें प्रत्यय टाकून दिले असून ती विश्लिष्ट व सुटी भाषा झाली आहे. आधुनिक इंग्रजी भाषेचा एक विशेष गुण म्हणजे ती भाषा सर्वभक्षक आहे. स्पंज जसा पाण्यांत बुडविला म्हणजे आपल्या सर्व छिद्रांतून पाणी शोषून घेतो, त्याप्रमाणें शब्दांचे समूहच्या समूह ह्या भाषेनें आत्मसात् करून आपली शब्दसंपत्ति वाढविली आहे. जगांत अशी एकहि भाषा नसेल कीं तिच्यापासून इंग्रजीनें एकादा-दुसरा शब्द उसना घेतलेला नाहीं. तसेंच मानवी जीवनाची एकहि शाखा तिनें सोडली नाहीं. ह्यामुळें इंग्रजी भाषेची लांबी, रुंदी, खोली व उंची गेल्या तीन शतकांत उत्तरोत्तर वाढतच गेल्या आहेत. लहान व हलक्या विषयांबाबत हलकी व खेळकर तर विशाल व गंभीर विषयांसाठीं गंभीर व उदात्त अशी हरून-अल्-रशीदच्या जादूच्या तंबूसारखी ही भाषा होऊं शकते.

उसनवारी करतांना समर्पक शब्द कुठल्याहि भाषें-तून घेतलेला चालतो. उदाहरणादाखल 'चॉकोलेट' शब्द घेतां येईल. ती बायकांना अत्यंत प्रिय असलेली एक मिठाई आहे. पण तिचा वाचक जो 'चॉकोलेट्' शब्द तो मेक्सिकोमधील आदिवासींच्या विलासि-नींच्या भाषेंतला आहे. चर्चिलसाहेबांच्या तोंडांत सतत वसत असणारा चिरूट-वाचक शब्द तामीळ भाषें-तील शुरूट्टू शब्दाचा इंग्रजी अवतार आहे. त्याचा अर्थ 'वळकटी' 'गुंडाळी'. चिरूट=तमाखूच्या पानाची वळकटी. ह्याप्रमाणें इंग्रजी भाषेची शब्द-संपत्ति वाढविली गेली. असें असूनहि इंग्रजांचें स्वभाषेवर फार प्रेम आहे. त्यांच्याकडील मोठमोठ्या लेखकांचा, ती भाषा शुद्ध ठेवण्याकडे विशेष कल असतो. शुद्ध इंग्रजी भाषेंत ॲंग्लो-सॅक्सन भाषा व तिच्यांतील शब्द यांचाच उपयोग करण्यांत येतो. सूक्ष्म विचार केला असतां असें दिसून येईल कीं इंग्रजींतलि बहुतेक सर्व सर्वनामें शुद्ध आहेत. उपसर्ग, शब्दयोगी अव्ययें, कालदर्शकें, क्रियापदें व अपश्रुतीच्या नियमानुसार होणारी विशेषणें शुद्ध इंग्रजी आहेत. नांवें व कांहीं क्रिया-पदें परकीय—फ्रेंच, जर्मन, इटॅलियन, लॅटिन, ग्रीक- -भाषांतून घेतलीं असलीं तरी नित्यनैमित्तिक व आवश्यक असणाऱ्या गोष्टी, सामान्य पदार्थ आणि शेतीस उपयोगी असलेले प्राणी व आउतें यांचे वाचक शब्द इंग्रजींतीलच आहेत. शुद्ध इंग्रजी








शब्द तावडतोब ओळखण्याची खूण म्हणून असें सांगतां येईल कीं जे शब्द एक स्वराचे व उच्चारायला सोपे ते शुद्ध; जे अनेक स्वरांचे व जे उच्चारतांना एकाहून अधिक मात्रा लागतात, ते परकीय.

इंग्रजी भाषेवर लॅटिन भाषेचाहि परिणाम झाला. त्या परिणामाचे दोन कालखंड पडतात. रोमन साम्राज्यांत लॅटिनपासून इंग्रजांनीं राजकारण, लष्कर, व कायदा ह्या संस्थांस उपयोगीं पडणारे शब्द आत्मसात् केले; दुसऱ्या कालखंडांत धर्मकारण, भक्तिमार्ग व अध्यात्म ह्यांसाठीं लागणारे लॅटिन शब्द आपलेसे केले. एक कालखंड सीझरचा व दुसरा सेंट ऑगस्टाइनचा. ऑगस्टाइनला ख्रिश्चन धर्माचा ब्रिटनमध्यें प्रचार करावयाचा होता. त्यानें राजा एथेल्बर्ट याला बाप्तिस्मा दिला. ह्या वेळीं सेंट ( Saint-L. Sanctus ), चॅलीस (chalice, L. calix सं. कलश ) व 'ख्रिस्तमस्'मधील मस् [mas ( Lat. ) missal = ग्रं०] ह्या शब्दांसारखे शब्द इंग्रजींत आले.

## जित आणि जेते

इंग्रजी भाषेंतील सामान्य पशूंचीं नांवें ॲंग्लो-सॅक्सन भाषेंतील आहेत. उदा०, बुल्, काउ (गो) डीअर ( deer ), ऑक्स ( उक्षन् ); पण पशूंच्या मांसापासून बनवलेले मसालेदार गरम रुचकर खाद्य-पदार्थ व पक्वान्नें दर्शविणारे शब्द नॉर्मन्-फ्रेंच भाषेंतील आहेतः—

बुल् O.E. ( Bull ) बीफ् N. F. ( Beef )
डीअर ( Deer ) वेनिझन ( Venizon )
स्वाइन् ( Swine ) पोर्क ( Pork )

ह्यावरून नॉर्मन् अमदानींत जित प्रजाजन जे सॅक्सन् लोक त्यांच्याकडे कृषिपाशुपाल्याचे धंदे येऊन ऐषआरामद्योतक श्रीमंतीचीं पक्वान्नें जेत्यांच्या वांट्यास कशीं येत तें कळतें. सपर, डिनर, लंच, फीस्ट ( supper, dinner, lunch, feast ) हे शब्द शुद्ध नॉर्मन-फ्रेंच उत्पत्तीचे आहेत. तर फास्ट्, ब्रेकफास्ट् हे शब्द शुद्ध इंग्रजी ! त्या वेळीं प्रजा अर्धपोटी असल्यामुळें तिला परिचित अशा 'अर्धाशन' परिस्थितीचा वाचक break--fast हा त्यांचा शब्द इंग्रजी भाषेंत आला !! त्या गुलामगिरीच्या काळांत " सब घरमें उजिआरा है, मेरे घरमें अंधेरा ! " अशा अर्थाचे उद्गार कित्येक सॅक्सन खेडुतांचे तोंडून निघाले असतील !

नॉर्मन लोकांनीं राजकीय व सामाजिक जीवनांत आमूलाग्र बदल केला. सॅक्सन भाषा मागें पडली. सॅक्सन भाषेंतील राजा व राणी यांचे वाचक शब्द ( King, Queen ) तेवढे राहिले. पण लष्कर, सैन्य, राजकारण व धर्मकारण ह्यांना लागणारे शब्द नॉर्मन भाषेंतून घेतले गेले. थिऑड = लोक, हा सॅक्सन शब्द जाऊन त्याचे जागीं पीपूल् शब्द आला ( theod = people ). तसेंच गुथ (Aryan युध् )जाऊन वॉर शब्द आला. न्याय, कायदा व न्यायालयें यांत उपयोगीं पडणारे शब्द फ्रेंच आहेतः—जज्ज, जस्टिस्; ज्यूरी, असाईझ् (Aryan सद्-सीद्);मॅरेज-विवाह,सॅक्सन वेड्, वेडिंग( cf. Aryan वधूः); 'बस् ' हें आधुनिक दळणवळणाचें सर्वोपयोगी साधन खरें; पण तो शब्द म्हणजे " भ्यस् " ह्या संस्कृत चतुर्थीच्या बहुवचनाच्या प्रत्ययाचा साहेबी अवतार आहे ! ! सर्वेभ्यः = Omnibus. तसेंच व्हर्जिनिबस् Virgini + bus. =कुमारींना.

फळें आणि फुलें नॉर्मन लोकांच्या मालकीचीं बनलीं, तर सॅक्सन लोकांना तृणधान्यें व काटेरी झुडुपें मात्र राहिलीं ! फिग् ( फल्गु ), पेअर, लिलि, हे लॅटिनपासून घेतलेले शब्द आहेत. बेरी, गूझबेरी, स्ट्रॉबेरी हे मात्र पुराण्या इंग्रजींतील आहेत. ऑरेंज हा अरबी-फारशी शब्द आहे; अमरकोशांत त्यास ' नागरङ्गः ' म्हटलें आहे; अरबी नारंज, पर्शियन नारिंग.

प्लेझर, डिलाइट् ईज, जॉय् हे नॉर्मन् लोकांचे शब्द; बिचाऱ्या सॅक्सन् लोकांजवळ फक्त होप् ( hope ) आशा तेवढी राहिली !

## भाषेचीं मुळें

क्षुधा, भावना व विचार अशा तीन पातळ्यांचा घनत्रिकोण कल्पून त्याच्या अनुरोधानें इंग्रजींतील शब्दसंपत्तीचा तोंडचा हिशेब केला तर आपल्यास असें स्पष्ट दिसून येईल कीं, शारीरिक इच्छा, आकांक्षा, क्षुधा, तृष्णा व एकंदर देहकर्मानुसारी







चित्तवृत्ती व क्रिया यांचा निर्देश, तसेंच जड वस्तुजाताचा निर्देश व त्यांचें वर्णन करण्यास शुद्ध अँग्लो–सॅक्सन शब्द व क्रियापदें वापरण्यांत येतात; आतिरिक्त धर्मभावना हिब्रू शब्दांनीं आविष्कृत होतात; संस्कृति व विचार किंबहुना बौद्धिक जीवनाला आवश्यक असणारी शब्दसंपत्ति ग्रीक भाषेंतून घ्यावी लागते, तर कायदेकानू व फॅशन यांना उपयोगी असलेले शब्द लॅटिन व फ्रेंच भाषांपासून मिळालेले आहेत. इंग्रजांच्या जेवणांत भाकरी व अंडीं यांना जें स्थान तेंच स्थान त्यांच्या रोजच्या भाषेंत मूळच्या स्कॅंडिनेवियन–जर्मन शब्दांना आहे. ' इंग्रज भरभराटीस येतो ती स्कॅंडिनेवियन शब्दांत ( thrive ); आजारी पडतो तोहि त्या भाषेंतील शब्दांतच (ill) व मरतो तोहि त्याच भाषेंतील शब्दांत ( die )!' ऑट्टो येस्परसन नांवाचा इंग्रजीचा व्याकरणकार पंडितहि डॅनिश आहे !

रुबाबदार पेहेरावाचे वाचक सर्व शब्द नॉर्मन आहेत. संस्कृतमध्यें 'वस्त्र' आणि 'कर्पट' यांमध्यें जो भेद आहे तोच भेद इंग्रजींत Costume आणि Drapery व Clothing यांमध्यें दिसून येतो. चॉसर–( चौदावें शतक )मध्यें आलेले पेहेरावाचे सर्व शब्द नॉर्मन–फ्रेंच आहेत. शेतकरी, मेंढपाळ व गुलामांचा वर्ग (Thrall, Vellein ) यांचे कपडे सॅक्सन शब्दांत वर्णितां येतात. उच्च कला व विद्या यांचे वाचक शब्द नॉर्मन–फ्रेंच आहेत. उदा०,आर्ट,कलर, ऑर्नमेंन्ट, ब्यूटी; ( इमारतीची ) कमान, खांब Arch, Pillar; निरनिराळ्या प्रयोजनांसाठीं बांधलेल्या इमारतींचीं नांवें दर्शविणारे palace, caster cloister, हे शब्दहि परकीयच. घरगुती कला,हलवाई, लोहार, चांभार, धनगर, कोळी यांना पुराणे इंग्रजी शब्द आहेत; पण ज्या कारागिरांचा संबंध राज्यकर्त्यांशीं येई त्यांना फ्रेंच नामाभिधानें मिळत: ( baker, miller, shoe—maker, shepherd : : tailor, butcher, mason. )

नॉर्मन व फ्रेंच भाषा अशा तऱ्हेनें जरी इंग्रजी व ट्युटॉनिक भाषांना उपकारक ठरल्या तरी त्यांचें इंग्रजीशीं दलालीचें नातें आहे. मूळची ग्रीक व लॅटिन शब्दसंपत्ति ह्या भाषांच्या मध्यस्थीनें इंग्रजी भाषेला मिळाली व ती तिनें आपल्या प्रत्ययादि उपकरणांचे साह्यानें आपल्यास परिचित असलेल्या रूपांत आत्मसात केली. युरोपीय पोषाख व त्याचीं पृथक् उपभूषणें पुण्याच्या शिंप्यांनीं शिवल्यावर जसें त्यांचें रूप थोडें बदलून तो पोषाख करणारा '' साहेब '' जसा '' गांवठी साहेब '' म्हणून ओळखला जातो, तसेंच आपणांस ग्रीक शब्दांचें रूप इंग्रजीकरणानें बदलून गेलेलें दिसेल व हें भाषेच्या देवघेवीमुळें नेहमींच होत असतें. वाक्–प्रचार सुद्धां असेंच बदलतांना दिसतात. उदा०, संस्कृतांतील ' हस्तामलक ' याचा मराठी ' हातचा मळ ' हा अवतार पाहा.

## संश्लिष्ट व विश्लिष्ट भाषा

चिनी भाषेशीं इंग्रजी भाषेचें साम्य एका बाबतींत दाखविलें जातें. तें समजण्यासाठीं भाषांचे दोन प्रकार काय आहेत हें समजलें पाहिजे. मेजवानी असली म्हणजे आपल्याकडे दोन प्रकारचे लाडू करतात:—डिंकाचे लाडू नाना प्रकारचे मसालेदार पदार्थ घालून केलेले खरे, पण त्यांतील कण एकमेकांपासून सुटे राहत नसून त्यांचा डिंकामुळें एकजीव होऊन गेलेला असतो. याच्या उलट बुंदीचे लाडू जरी चेंडूसारखे एकसंधी व गोल दिसले तरी प्रत्येक कळी स्वतंत्र, सुटी व फुटीर असते. खातांना तोंडास चिकटा येत नाहीं व पोटहि चांगलें भरतें. भाषांमध्येंहि दोन प्रकारच्या भाषा दिसतात:—ॲग्ल्युटिनेटिव्ह् व ॲनॅलिटिकल्; अर्थात् संश्लिष्ट व विश्लिष्ट. चिनी भाषेप्रमाणें इंग्रजी भाषा विश्लिष्ट आहे. येस्परसन यांनीं तीन डोलकाठ्या असलेल्या आगबोटीचें एका चिनी मनुष्यानें इंग्रजींत केलेलें वर्णन उदाहरण म्हणून आपल्या पुस्तकांत दिलें आहे तें असें: 'थ्री पीस बाम्बू, टू पीस पफ् पफ्; वॉक् अलॉंग इन्साइड, नो कॅन् सी.'

हें वर्णन मराठी भाषेंत मांडून पाहा, म्हणजे या दोन प्रकारांतील फरक ध्यानांत येईल.

' तीन तुकडा बाम्बू; दोन भाग भप् भप्; चाल आंत बाजू, न शकणें पाहा. '

विभक्तिप्रत्यय, क्रियापदांचे प्रत्यय, वचनें वगैरे व त्यामुळें होणारीं सामान्य रूपें ह्यांना एकदम रजा

देऊन सुद्धां चिनी भाषेंत अर्थव्यक्ति होते. दुसरें उदाहरण मला मुंबईस अपोलो बंदरावर फिरत असतांना ताजमहाल हॉटेलच्या जवळपास फिरणाऱ्या व सापाची क्रीडा दाखवून पोट भरणाऱ्या एका गारुड्याजवळ मिळालें. तो गारुडी साप आणि मुंगूस यांचा खेळ साहेब लोकांस दाखवीत होता. झटापटींत सापाच्या शरीरावर बरेच व्रण होऊन तो जायबंदी झाला. ताजमहालच्या तिसऱ्या मजल्यावरुन गोऱ्या मडमिणींनी उत्तेजनार्थ नाणीं फेंकलीं. त्यांना सलाम करुन आपलें इंग्रजीचें ज्ञान दाखविण्यासाठीं तो गारुडी म्हणतो—

'अच्छा साब, थँक् यू. स्नेक पुट वॉटर ?'

( सापाला पाण्यांत फेंकून देऊं काय ? )

### भविष्यकालच्या भाषा

भाषा व्याकरण--शुद्ध असावी. पण व्याकरणाच्या नियमांचा जुलूम भाषेवर होऊं नये. तिचा प्रवाह अडवून ठिकठिकाणीं नुसते निर्जीव डोह करुन ठेवण्यांत अर्थ नाहीं. " भाषा वापरतांना व्याकरण व निव्वळ तर्कशुद्धता यांजमध्यें संदेह उत्पन्न झाल्यास तर्कशुद्धता अधिक प्रमाण मानून 'व्याकरणाकरितां व्याकरणा'चें स्तोम माजवूं नये " अशा तऱ्हेचे विचार येस्परसन यांनीं यासंबंधांत मांडले आहेत. आज प्रभावी असलेल्या भाषांच्या उत्क्रांतीवरुन हे विचार पटण्यासारखे नाहींत असें नाहीं. व्याकरणासाठीं भाषेचा जन्म होत नसून व्याकरणाचा जन्म भाषेकरितां आहे. भाषा व व्याकरण दोन्ही, विचारांचे सेवक आहेत. प्रवाही भाषेंत प्रवाही विचार मांडतां येतात. विचार--प्रवाहांत खंड पाडणारें व्याकरण त्याज्यच होय. क्लिष्टता, अनियमित शब्दनिर्मिति व गिचमीड टाळून जगांतील भाषांचा ओघ सुलभता व तर्कशुद्धता यांजकडे जोरानें चालला आहे.

साबणाचें पाणी नळींतून फुंकण्याचा लहान मुलांचा खेळ ज्यांनीं पाहिला आहे त्यांना त्या खेळांत दोन पायऱ्या आहेत असें दिसून आलें असेल. पाण्यांत नळी बुडवून त्यावर फुंकर घालून एकमेकांशीं चिकटलेले अगणित बुडबुडे उत्पन्न करतां येतात; त्यांचे आकार निरनिराळ्या तऱ्हेचे असतात. हे बुडबुडे गतिमान् नसतात. मूल थोडें मोठें झाल्यावर नळीच्या वर्तुळाकार टोंकांत पाण्याचे थेंब घेऊन, नळी बाजूला काढून घेऊन व मंद मंद फुंकर घालून त्या थेंबांतून निरनिराळ्या रंगांचे पृथक् पृथक् अनेक गोळे निर्माण करतें, असें दिसून येतें.

आधुनिक जगांत भाषा व शब्द अगर वाक्य--रचना यांचें परिवर्तन असेंच होत असून भाषेस सुटसुटीतपणा येत आहे. ज्या गद्यवाङ्मयाची गुंफण गिचमिडीची व क्लिष्ट आहे व जें बोलतांना गुडदाणी खाल्ल्यानंतर तोंडास जसा चिकटपणा येतो तसाच चिकटपणा येतो, अशा गद्यवाङ्मयास फारसा उज्ज्वल भविष्यकाल नाहीं. लांबलांब वाक्यें व समास--प्राचुर्य या दोन दुर्गुणांमुळें संस्कृत गद्य--वाङ्मयाची कशी दुर्दशा झाली याचा इतिहास आजची मॅट्रिकच्या परीक्षेला बसणारी मुलगी सुद्धां सांगूं शकेल. भविष्यकाळीं मानवी भाषा अधिकाधिक सुटसुटीत व विश्लिष्ट होतील. त्यांची गति मन्दाक्रान्ता नसून द्रुतविलंबित असेल. सोपे, सहज समजण्यासारखे शब्द व आंखूड, एका श्वासोच्छ्वासांत उच्चारतां येण्याजोगीं वाक्यें अधिक उपयोजिलीं जातील. सोपे, एकेरी, एकस्वरी शब्द जनतेला प्रिय असल्यामुळें लोकशाहींत त्यांचाच उपयोग ज्ञान-प्रसारासाठीं केला जाईल असें भविष्य करण्यास हरकत दिसत नाहीं.

---







# महात्म्याचें निर्वाण

नित्यक्रम संपविला, श्रांतसा उतरला क्षितिजावर
थबकला कांहीं क्षण, अन् गेला मग भास्कर
खालीं कुठें तरी दूर

रोजरोजचा तो संध्येचा तांबुस मोहक रागरंग
आला, ओसरला, विरला... खिन्न शांत काळोखरंग
नभाचें व्यापी अंगोपांग

पर्वत– ढीग, सागर–डबकीं, अन् खुराडीं नर–वस्तींचीं
झालीं अरूप सारीं नामरूपें धरणीगोलावरचीं
दृढ तम उरे एकलाची

धरणीचा शिंपला, त्यावर रात्रि–नभाचा जुळा शिंपला
निद्रित वस्तुजात शिंप–डब्यांत, तोहि टेकला तळाला
शांत तम–सागराच्या

* * *

त्या रोजच्याच अंधारांत नवल आज एक सामावलें
तें पहा ! पहा ! अपुल्या हृदयाची उघडा नेत्रकमलें
पहा रक्ताचीं पावलें !

शरीर, देहवस्त्र, व्यासपीठ, सारें शहर राजधानीचें
सारा देश भरतखंड, मानव–हृदय पांचीं खंडांचें
रक्ताश्रूंनीं भिजलेलें

होता तो संध्या–क्षण निशाचराचा, निशा आजची मानवाची
जशी होती ती महारात्रि एकोणिस–अठ्ठेचाळिस वर्षांपूर्वीची
येशूच्या क्रूस–विसाव्याची

* * *

दुसऱ्या दिवशीं—

रोजचीच आनंदी प्रभा, जास्वंदी रंग उधळी क्षितिजाकाशांत
रोजचाच अंगार–गोल उगवला चढला निळसर नभांत
त्याला कशाचें काय ?

कोणीतरी फिकट ओठांनीं पुटपुटलें गद्गद खिन्नसें
" गेला महात्मा ! अमर तो ! मर्त्य आम्ही मूढ पापी माणसें
युगांतरीं राहूं, " असें.

" पृथ्वीवर द्विपाद–जंतू लक्षलक्ष कोटिकोटि आम्ही
जगतों, मरतों अपुल्या मरणानें किंवा वधितों आम्ही
विनायास परस्परांतें

अणुध्वंसानें किंवा क्षुद्र शिशाच्या गोळीनें खुनाचा खेळ
संस्कृति–सूक्तांतून किंवा विष–हुंकारांतून हत्येचे बोल
मनुवंशाचा हा इतिहास ! "










## महात्म्याचें निर्वाण

कवि म्हणाला उदासीनाला, “ आंवर आंसू ! सांवर मन !
पहा आपुलें मानव–जीवन केवढें उज्ज्वल महान्
त्याचें हें होतसे मापन !

महात्मा येशूचें, बापूजींचें क्रूस–मरण दाखवी अपार
अथांग जीवन आपुलें, अमर तसेंच अपरंपार
मृत्यूला अनिवार

महान् अन् मानव ते ! गंभीर अंतःस्वर त्यांचा होता असुचा
कोटि मानव–आशांचा मूक शब्द ! आवेग कोटि आत्म्यांचा
उद्‌गार कोटि मनांचा

नेत्याच्या रक्तबिंदूंत आम्हां गवसलें एका भीषण क्षणांत
हिंदवासींच्या, मानवतेच्या, अंधारलेल्या डोळ्यांतील अश्रूंत
जीवनाचें शोक–मापन ”

* * *

उठते निळसर हिरवी लाटेची अजस्र नागफणी सागरांतून
आपटते, विरते सागर–हृदयीं, तसें विशाल मानवता–मनांतून
उठे असामान्य–मन

उठतां—विरतां लाट, हेलावतें सिंधूचें अथांग जल
तसा आज उठला आर्त मानव–हृदयीं शोक–कोलाहल
हेलावलीं नगरें देशोदेश

देशोदेशींच्या, संस्कृति–युगांच्या, वर्गस्वार्थांच्या सीमांत
उभे मानव सारे, कोट्यवधि सान, कोणी महान्, प्रवाहांत
संस्कृतिच्या रक्तस्नात

* * *

सीमांच्या बेड्या पायीं पण हृदयीं असीमता मानवाच्या
येशू बापूही मानव ! सांगती, “ बंधूंनो ! आपुल्या पायींच्या
बेड्या ढिसूळ मातीच्या ! ”

“ बेड्या पायींच्या तोडा ” सांगतो एक, उठती लक्षकोट
साम्राज्यांच्या तोफांपुढें छातीठोक उभा हृदयांचा कोट !
खुली मुक्तिची वाट !

विकट वाटवहिवाट परी मुक्तिची, जरी बेड्या मातीच्या
तुटतां तुटतां, तुकड्यांतुकड्यांतुन मातीच्या कणअणूंतून त्यांच्या
जन्मल्या फौजा हिंसकांच्या

हिंसकही मानव, आपण सारे मानव, महात्मेहि मानव
सारें मानवांचें रामायण ! राम मानव ! वानर, रावणही मानव
नसे कोणी येथ अमानुष !

* * *

पहा ! पेटलें आतां कुरुक्षेत्रीं पुन्हां धर्मयुद्ध महाघोर
आरंभ वधानें महात्म्याच्या, रणक्षेत्रीं सांगतांना संदेश थोर
युग–गीतेचा, बंधुत्वाचा !








# नवभारत

पानीपत हें हिंदच्या सुवर्ण–सिंहासनासाठीं दानव घेती प्राण गांधींचा !
उठले मानवही वाली सत्यधर्माचे! गर्जती, " करूं जय आम्ही अमृताचा,
नाश करूं हलाहलाचा "

हिंसक आहे मानव ! ( नव्हता का वर्णश्रेष्ठ रावणहि ? )
याच्या हातीं राक्षसी माया अन् सोन्याच्या लंकाहि
मानी तुच्छ नरवानरांना

*   *   *

पण नर होईल आतां विजयी, मुक्त ! उगवेल प्रभात !
आजच्या संधिप्रकाशाची ज्योत ( बापूजींचें अमर–चित् )
पावेल पूर्ण प्रकाश

महात्मा–हृदय–रक्ताणूंच्या ध्वंसांतून उठला जीवन–झंझावात
मृत्युंजय हा प्रभातवायु ! जीवन–स्वप्न साकार जिवंत
होईल युगायुगींचें नराचें

*   *   *

बापूंचा अचेतन देह, रक्षा–कणकण, अस्थीहि विरल्या
हिंदभूमीच्या महानद्यांत, महातीर्थांत, पंचमहाभूतीं निमाल्या,
जेथून जन्मलें तें सारें !

होतें जें जें चेतन, प्रकाशरूप, प्रेमरूप विरलें तें रक्तांत
आर्त, दुःखी, स्वप्नशील मानव–महाभूताच्या हृदयतीर्थांत
जेथून जन्मलें तें सारें !

कशाला स्मारक–फत्तरांत थिजवावी क्षीणाकृति महात्म्याची ?
कशाला धुवावीं अश्रूंनीं धरणीवरचीं रक्त पावलें त्यांचीं ?
राहूं देत्र जळतीं, जागतीं !

*   *   *

" मानवांमानवांतील सारीं नातीं आजचीं अमानुष
हीच हिंसा महान् ! साऱ्या साऱ्या हिंसांची हीच कूस ! "
सांगतो युग–पुरुष

" मानवांमानवांतील सारीं नातीं आजचीं अमानुष
हेंच असत्य महान् ! साऱ्या साऱ्या असत्यांची हीच कूस ! "
सांगतो युग–पुरुष

ऐका अन् पुढें चला ! सारे खंदे पाईक सत्यधर्माचे
ऐका अन् पुढें चला ! सारे खंदे पाईक अहिंसाधर्माचे
पुढें चला सच्चा दिलांचे !

*   *   *

ज्योतीचें स्मारक प्रकाश ! वीरात्म्याचें स्मारक युद्ध !
मानव–बंधुत्वासाठीं वीर–गतीला गेला या युगाचा बुद्ध
जय हेंच त्याचें निर्वाण !

ता. २१ फेब्रुवारी १९४८.

दि. के. बेडेकर.



अनुक्रमणिका

# जातिद्वेष

श्री. ना. गो. चापेकर

· गांधींच्या वधामुळें अगर वधानंतर जी जाळपोळ झाली तिच्यामुळें जातिद्वेषाचा प्रश्न प्रामुख्यानें जनतेसमोर आला आहे. ह्या जाळपोळींत क्वचित् विशेषतः ब्राह्मणांच्याच बळी घेण्यांत आला असला तरी त्यांच्या घरांदारांचा, चीजवस्तूंचा सर्वस्वीं होम करण्यांत आला ही गोष्ट आंकड्यांनिशीं सिद्ध करितां येण्यासारखी आहे. ह्या अघोर प्रकारांची मीमांसा होत आहे व कांहीं दिवस होत राहीलहि आणि असें होणें स्वाभाविकच नव्हे तर इष्ट व आवश्यकहि आहे. हा अभूतपूर्व संहार गांधीप्रेमाचा परिणाम कीं ब्रह्मद्वेषाचा ? ह्याचा निर्णय प्रथम झाला पाहिजे आणि प्रेम व द्वेष या दोनहि कारणांचा प्रभाव असल्यास त्यांचें परस्पर–प्रमाणहि निश्चित होणें अवश्य आहे.

प्रेमापासून क्रोध उद्भवतो. गांधींवर लोकांचें प्रेम नसतें तर त्यांच्या वधानें कोणीहि प्रक्षुब्ध झाला नसता; आणि प्रक्षोभाच्या अभावीं संहार होण्याला कारणच मिळालें नसतें. देशांत दरदिनीं कांहींतरी खून होतच असतात; पण त्यामुळें कोणाचेंहि रक्त उसळत नाहीं. तेव्हां ह्या भडकलेल्या कोपाग्नीचें कारण गांधींवरील जनतेचें प्रेम असें म्हणतां येईल. परंतु हा स्वाहाकार झाला तो फक्त महाराष्ट्रांत, विशेषतः सातारा जिल्ह्यांत ( संस्थानें धरून ) झाला. गांधींवर प्रेम करणारे लोक सर्व देशभर होते; महाराष्ट्रांतच होते असें नाहीं. परंतु खुनी माणसाच्या जातीच्या लोकांचा खून करण्याची कल्पना इतरत्र कोणाच्याहि मनांत आली नाहीं. ह्याला फक्त नागपुर शहर अपवाद आहे. परंतु ह्या घटनेमुळें नागपुर हें महाराष्ट्राचाच भाग आहे हें अनपेक्षित रीतीनें सिद्ध झालें !

## महाराष्ट्रांतील गांधीद्वेष

गांधींच्या मृत्यूनें आपली हानि झाली असें मानणाऱ्या लोकांत हानि करणाराविषयीं सूडाची भावना उत्पन्न होणें साहजिक आहे; परंतु ज्यानें गांधींना मारलें त्या गोडशाला पकडून त्याला पारिपत्य करण्याच्या योजनेंत सरकार लक्ष घालीत आहे व त्याला योग्य तें शासन होईलच. हानीची कल्पना असल्याशिवाय सूडाची कल्पना उद्भवणार नाहीं. म्हणून गोडशाशिवाय त्याच्याच विचाराचे जे कोणी असतील ते सर्व आपल्या हानीला जबाबदार आहेत अशी समजूत असली पाहिजे. अशा समजुतीचें अस्तित्व अनुमानानें ठरवावें लागेल. म्हणजे अनुमान काढण्यास योग्य कारण असेल तर तें अनुमान बरोबर आहे असें म्हणतां येईल.

महाराष्ट्रांतील दक्षिणी ब्राह्मण—विशेषतः पुण्याचे आणि पुण्याशीं संबद्ध असलेले दक्षिणी ब्राह्मण आणि त्यांतहि मुख्यत्वेंकरून चित्पावन ब्राह्मण—गांधींचा द्वेष करीत हें सप्रमाण सिद्ध करतां येईल. ह्या कांहीं सांगावांगीच्या गोष्टी नाहींत. " गांधी देशबुडवे; कारण ते मुसलमानधार्जिणे; हिंदुस्थान हिंदूंचा, हिंद्वेतरांचें हित म्हणजे हिंदूंचें अहित, " अशी त्यांची विचारसरणी आज कित्येक वर्षें अव्याहतपणें महाराष्ट्रीय जनतेला परिचित करून देण्यांत येत होती. गांधीजींनीं देशाचें वाटोळें केलें असा गोमगाला पद्धतशीर रीतीनें करण्यांत येत होता.










अर्थात् असा देशद्रोही मनुष्य मरण्यानें देशाचें कल्याण होणार आहे अशी वासना होणें अटळ आहे. ह्यांत अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. अशा प्रकारची विचारसरणि सनातन आहे. टिळकांच्या वेळींहि टिळक मेले तर फार बरें होईल असें म्हणणारे नेमस्त पक्षांतील जहाल विद्वान् मला प्रत्यक्ष माहीत आहेत. टिळक तुरुंगांत पडल्यावर कित्येक गणिन्यांनीं पेढे खाल्ल्याच्या अफवा तेव्हांहि पुष्कळांच्या कानांवर आल्या होत्या ! आतां तर गांधी आपसुख मेले नाहींत, सैनिकाच्या शस्त्रानें—अग्न्यस्त्रानें त्यांना एका वीरानें गोळी घालून गठविलें, ह्या मर्दुमकीच्या विक्रमानें हुरळून जाऊन पेढे वांटण्यास एकादा उद्युक्त झाला असला तर त्यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. गांधींना, "गप्प बसा, राजकारणांत तोंड उघडूं नका," असें बजावण्यांत येत होतेंच ना ? परंतु गांधी आपला हेकटपणा सोडीतना. उघडच आहे ! मूर्खपणाला मर्यादा कोठें असते ? तेव्हां एका मर्दानें गांधींना कायमचें गप्प बसवलें ह्यांत गैरशिस्त काय झालें समजत नाहीं. जींना मरावें असें कोणी म्हणत नव्हतें; पण मोठ्यांकडून ज्यांना शिकवण मिळाली अशीं सामान्य माणसें गांधींचें मरण म्हणजे देशोद्धार असें उघडपणें बोलतांना पुष्कळांनीं ऐकलें आहे. गांधी मुसलमानी बीजाचे असावे असें उद्गारण्यापर्यंत सामान्य माणसांच्या मनस्तापाची मजल गेलेली होती. येवढ्या बाबतींत गांधीद्रोही हिंदू व मुसलमान ह्यांच्यांत तादात्म्य झालें होतें. कारण बहुजन मुसलमान सुद्धां गांधींना शत्रूच समजत होते. विरोधभक्तीनें रावणाला रामलोक कसा मिळूं शकला हें यावरून समजण्यासारखें आहे. माझ्या जीवनकथेंत कै० विनायक हरि डोंगऱ्यांचें गांधीविषयींचें मत प्रसिद्ध केलें आहे तें पाहावें. डोंगरे हे गांधी–दुष्मनांचे यथार्थ प्रतिनिधि होत. कावून कदरून ते लिहितात, "वेळ प्रसंग आला तर जीव देईन म्हणतो. तो (गांधी) कालत्रयीं जीव देणार नाहीं." जीव घेण्याची कल्पना वरील भावनेचें अटळ फळ होय. सारांश, गांधी नाहींसे होण्यांत देशाचें कल्याण आहे हें मत महाराष्ट्रांत फैलावलें होतें हें नाकबूल करण्यासारखें नाहीं आणि हे मतधारी जरी कांहीं अब्राह्मण असले तरी प्रामुख्यानें ब्राह्मण होते ह्या विधानाला कोणी आक्षेप घेईल असें वाटत नाहीं. ह्यावरून गोडशाचे जातभाई आपल्या हानीला कारणीभूत आहेत अशी गांधीभक्तांची समजूत होण्यास पुरेसें कारण होतें असें म्हणावें लागेल.

आतां, गांधीप्रेमी लोकांचा रोष उफाळण्याला अनुकूल भूमि लाभली असली तरी ह्या अमानुष हुल्लडीचें गांधीप्रेम हें खरें कारण होतें कीं तें केवळ निमित्त होतें ह्याचा विचार केला पाहिजे. गांधींच्या वधाची संधि साधून कित्येकांनीं जातिद्वेष उगवून घेतला असणें असंभवनीय नाहीं.

## जातिद्वेषाचें–विशेषतः ब्राह्मणद्वेषाचें कारण

आतां गांधीद्वेषाप्रमाणें महाराष्ट्रांत जातिद्वेषहि घर करून राहिला आहे ह्यांत मुळींच संशय नाहीं. जातिद्वेषाची उलट बाजू म्हणजे जात्यभिमान. सध्यां अभिमानांना ऊत आला आहे ! देशाभिमान, प्रांताभिमान, भाषाभिमान, जात्यभिमान आणि स्वाभिमान ! आणि हे इतके अभिमान अपुरे आहेत म्हणूनच कीं काय, त्यांच्या गळाठ्यांत आणखी एका अभिमानाची भर पडत आहे, तो लिंगाभिमान होय ! अभिमानाची ज्योत प्रथम पेटविणाऱ्यांच्या लक्षांतहि आलें नसेल कीं, पुढें हे अभिमान इतकें विकृत स्वरूप धारण करतील ! हें युग अभिमानांचें दिसतें. अभिमानांबरोबर विद्या व विवेक हीं असलीं तरच त्या अभिमानाला गोड फळें धरतात; परंतु विद्या सरकारच्या(त्या वेळच्या) हातांत ! आणि अभिमानाची वात पुढाऱ्यांच्या हातांत ! अभिमान साहजिक पाहिजे; तो बुद्ध्या उत्पन्न केलेला नसावा. असो. आपणांस येथें जात्यभिमानाचा, विशेषतः त्याचें विक्राळ स्वरूप जो जातिद्वेष त्याचा विचार कर्तव्य आहे.

जाती महाराष्ट्रांतच आहेत असें नाहीं. सर्व देश जातींनीं व्यापलेला आहे. तेथें येथल्याप्रमाणेंच जातिद्वेष माजला आहे काय ? तसेंच, जाती आजच उत्पन्न झालेल्या नाहींत; अनादि कालापासून त्या



अनुक्रमणिका






आहेत. शें–दीडशें वर्षांपूर्वीपर्यंत सर्व जाती गुण्यागोविंदानें देशांत नांदत होत्या. हें जर खरें असेल तर जातिभेदावर जातिद्वेषाचें खापर फोडणें योग्य होणार नाहीं. जातिभेद असतांनाच शिवाजीनें मुसलमानांना हुसकून लावून स्वतःचें राज्य स्थापन केलें. असंख्य जाती हजारों वर्षें सलोख्यानें कशा राहिल्या ह्याचा अभ्यास कोणींहि केलेला नाहीं. डोंगरी मुलखांतील खेड्यांत एकाददुसरें ब्राह्मणी कुटुंब शेंकडों वर्षें कसें स्थाईक होऊन राहूं शकलें ह्याचा विचार केला पाहिजे. बरें, जातिद्वेष हें जातिभेदाचें अटळ पर्यवसान असेल तर ह्या देशांतील अगणित जाती आपआपसांतील यादवीनें केव्हांच रसातळास गेल्या असत्या! पण प्रत्येक जात दुसऱ्या जातीचा द्वेष करते असें म्हणण्यास यत्किंचित्हि आधार मिळण्यासारखा नाहीं. जातिद्वेषाचा इतिहास न्याहाळून पाहिला तर तो ब्राह्मणांपुरताच आहे, अलीकडचा आहे, तसेंच त्याची व्याप्ति महाराष्ट्रीय व मद्रासी ब्राह्मणांपुरतीच आहे असें आढळून येईल. इतर प्रांतांतहि ब्राह्मण आहेत, पण तेथें ब्रह्मद्वेषाचें रोपटें उगवलें नाहीं. ह्यास्तव ब्राह्मणांचा द्वेष कोण करतो व कां केला जातो ह्याची चिकित्सा करणें प्राप्त आहे.

ब्राह्मणांचा द्वेष सामान्यतः मराठे व तत्सम जाती करतात. हा द्वेष स्पर्धामूलक असतो. आर्थिक कारणांत त्याच्या उत्पत्तीचें मूळ शोधलें पाहिजे. चातुर्वर्ण्यांत क्षत्रिय व वैश्य शूद्रवत् झाले व बौद्धिक कार्याचा बोजा एकट्या ब्राह्मण वर्णावर पडला, त्यामुळें त्याच्या बुद्धिमत्तेवर इतरांच्याप्रमाणें गंज चढला नाहीं. बुद्धि असलेला मनुष्य समाजांत केव्हांहि चमकणारच. ब्रिटिश अंमलाच्या सुरुवातीस शिक्षणाचा फायदा साहजिकच प्रथम ब्राह्मणांनीं घेतला. त्याचा एक परिणाम म्हणजे सरकारी नोकरी हा ब्राह्मण जातीचा मुख्य धंदा होऊन बसला. उपाध्येपणाचा धंदा तर केव्हांच गेला होता, त्या कारणानें दुसरा धंदा ब्राह्मणांना पाहिजेच होता; तो त्यांना आयता मिळाला. ब्राह्मणांमध्यें सुद्धां रत्नागिरी जिल्ह्यांतील दरिद्री ब्राह्मण पोरांनीं इंग्रजी विद्या सर्वांच्या अगोदर पटकाविली! ब्राह्मणांत, चित्पावनांविषयीं प्रखर द्वेष अनुभवास येतो ह्याचें कारण हेंच. इंग्रजी विद्या संपादन केलेल्या ह्या ब्राह्मणांना भराभर सरकारी नोकऱ्या मिळाल्या— जिकडे जावें तिकडे खालपासून वरपर्यंत ब्राह्मणच ब्राह्मण! त्यांच्या हातीं अधिकार आणि अधिकार म्हणजे लोकांना नाडून हात मारण्याची संधि! सद्गुणांचें स्मरण पुसट असतें; दुर्गुण मात्र हृदयांत घुसून बसतात. ब्राह्मणांचा द्वेष करण्याला हें एक कारण आहे; पण हें कारण मोठें प्रभावी आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं; कारण ठाणें जिल्ह्यांत ब्राह्मणांच्या बरोबरीनें कायस्थहि हुद्द्यांच्या जागांवर असतात. तथापि ब्राह्मणांचा जितका द्वेष करण्यांत येतो तितका कायस्थांचा होतोसें दिसत नाहीं. ब्राह्मण व कायस्थ ह्यांच्यांतहि भांडणें धुमसत नव्हतीं असें नाहीं; पण तीं नोकऱ्यांवरून होतीं. आतां ब्राह्मण व कायस्थ दोघेहि नोकऱ्यांना मुकले आहेत व त्याबरोबर ह्या दोन जातींतील वैमनस्यहि स्थिरावलें आहे.

पूर्वी जातींचे धंदे ठरलेले होते, त्याकारणानें स्पर्धेला जागाच नव्हती. इंग्लिश सरकारनें येथें आल्यावर उलथापालथ करून टाकिली. विलायती मालानें सर्व धंदे बसवले! बुटांनीं चांभारांना मारलें, ॲल्युमिनमच्या भांड्यांनीं कुंभार खराबींत आले. शिक्षण सर्वत्र व सार्वजनिक झालें; आणि शिकलेल्यांना नोकऱ्या मिळूं लागल्या. अर्थात् नोकरी हा सर्वजातीय धंदा झाला. येथें स्पर्धेला वाव मिळाला. न्हावी आपला पिढीजाद हजामतीचा धंदा सोडून तलाठी वा मास्तर बनला; शेतकऱ्याच्या हातांत नांगराऐवजीं लेखणी आली. तात्पर्य, एका नवीन धंद्याच्या मागें सर्व जाती धांवूं लागल्या. ह्या स्पर्धेचा परिणाम प्रत्यक्ष रीतीनें विशेष जाणवला नाहीं. तथापि जात आणि धंदा ह्यांची अनेक वर्षांची सांगड एकाएकीं तुटून गेली व समाज विस्कळित झाला. ही फार प्रचंड क्रांति होती. शिवाय नोकरीच्या एकाच आसनावर बसलेल्या निरनिराळ्या जातींच्या माणसांत समानतेची जाणीव उत्पन्न झाली येवढेंच नव्हे, तर समानता कचेऱ्यांत तरी प्रत्यक्ष आचरणांत आलेली दिसूं लागली. परंतु कचेरीच्या बाहेर व प्रसंगीं कचेरींत सुद्धां सामाजिक विषमता तसाच तुटकपणा पूर्ववत्







कायम राहिला. खाण्यापिण्याचे निर्बंध ब्राह्मणेतरांना डसूं लागले. विषमतेचें उघडें नागडें स्वरूप प्रकट झालें. पूर्वीचा समाज ज्या वैचारिक पायावर उभारला गेला होता त्या पायाचे दगड खिळखिळे झाले! जातिद्वेषाची मीमांसा करितांना ही घडामोड विचारांत घेतल्यावांचून गत्यंतर नाहीं.

पेशवाईंत चित्पावनांनीं राज्योपभोग घेतला. मराठ्यांचें राज्य ब्राह्मणांकडे आलें, त्यामुळें मराठ्यांच्या डोळ्यांत चित्पावन खुपूं लागले. पळपुट्या बाजीरावापासून इंग्रजांनीं राज्य मिळविलें तें आपणांला कां घेतां आलें नाहीं ह्याचा विचार मराठ्यांनीं कधींच केला नाहीं.

पेशव्यांच्या हातीं राज्यसत्ता असतांना जातिविषयक बाबतींत जे न्यायनिवाडे झाले त्यांमुळेंहि कित्येक प्रतिष्ठित ब्राह्मणेतर जातींचा रोष पेशव्यांवर म्हणजे ब्राह्मणांवर झाला होता. तेव्हां पेटलेला रोषाग्नि अजूनहि धुमसत आहे. पूर्वी वादाचा निर्णय वहिवाटीप्रमाणें होत असे. ह्या कामीं पेशव्यांनीं जाणूनबुजून अन्याय केला असें म्हणणारा मी नाहीं. कोणतीहि जात बुद्धीनें, पराक्रमानें, पैशानें पुढें आली कीं आपल्या मागसलेल्या स्थितींतील चालीरीती सुधारलेल्या वरिष्ठ जातींतील चालीरीतींप्रमाणें असाव्या असें तिला वाटणें हें अगदीं स्वाभाविकच आहे. परंतु त्याप्रमाणें एकाद्यानें केलें म्हणजे वर्णसंकराचें भय वरिष्ठ जातींना वाटून त्या त्या आचाराविरुद्ध पुंडावा करीत. अशा स्थितींत सरकारी निर्णय सुधारलेल्या आचाराविरुद्ध होई. ह्यामध्यें वस्तुतः पेशव्यांना पक्षपात केल्य.चा दोष लावणें अनुचित होय. खरा दोष हा कीं, प्रत्येक जातीला आपली सुधारणा करून घेण्याचा हक्क आहे ही गोष्ट पेशव्यांच्या लक्षांत आली नाहीं. पंरतु त्या कालीं इतकी आकलनशक्ति दुसऱ्या कोणांत तरी होती का? सर्वांचें अज्ञान सारखेंच होतें! कोणत्याहि जातीनें आम्ही आमची पुरातन घाणेरडी चाल मोडून निर्दोष व सुसंस्कृत रूढि पाडीत आहों असा दावा मांडला नाहीं. नवीन रूढि पाडण्याचा हक्क इतर जाती अमान्य करीत इतकेंच नव्हे तर जातींचे लोकहि आडवे येत. इंग्रजी अंमलांत दुसऱ्याला उपद्रव होणार नाहीं अशा रीतीनें कोणालाहि वागण्याला मुभा मिळाली. वायकांनीं अंगांत चोळया घालाव्या अगर घालूं नये, वरात घोड्यावरून न्यावी, नाहीं तर गाढवावरून न्यावी, कोणालाहि त्याच्याविरुद्ध तक्रार करितां येईनाशी झाली. पूर्वी अशा चालींना धर्माचें स्वरूप होतें व धर्म म्हणजे कायदा ह्या दृष्टीनें कोणतीहि रूढ असलेली चाल सक्तीनें पाळविली जात होती. ब्रिटिश सरकारनें आम्ही धर्मामध्यें हात घालणार नाहीं म्हणतां म्हणतां मोठी धार्मिक स्वरूपाची सामाजिक क्रांति केली. जातींच्या धंद्यांची जी स्थिति झाली तीच आचारांची झाली. रूढींचीं बंधनें ढिलीं पडलीं. पण ही समाजांत चालू असलेली कालवाकालव ज्ञात्यांच्याहि लक्षांत आली नांहीं. आजची परिस्थिति हें त्या कालवाकालवीमुळें अवश्य घडून येणारें असें कार्य आहे. जातिबंधनें तुटलीं तरी जातिभेदाची भावना मात्र बिलकुल सुटली नाहीं.

## 'हिंदु' या आगंतुक शब्दानें खोटी ऐक्यभावना

जातीचें मुख्य लक्षण रोटी–बेटी–बंदी हें होय. पारशी, ख्रिस्ती, ज्यू इत्यादि धर्मांचे लोक हिंदुस्थानांत कैक वर्षें आहेत. त्यांच्याशींहि हिंदूंचा रोटी–बेटी–व्यवहार होत नाहीं. तेव्हां त्याहि एका प्रकारें जातीच आहेत. असें असूनहि ते हिंदूंचा द्वेष करितात असें दिसत नाहीं. त्यांना पंक्तीला घेतलें नाहीं, तर हिंदूंनीं आपणांस दुखविलें असें त्यांना वाटत नाहीं. आपणांसंबंधीं माणुसकीखेरीज कसलीच अपेक्षा ते करीत नाहींत. ह्याच्या उलट त्याच विषमतेच्या वागवणुकीमुळें ब्राह्मणेतर हिंदूंचीं मनें मात्र दुखविलीं जातात, ह्याचें कारण आपण त्यांना आपले म्हणतों आणि तरीहि दूर ठेवतों हें होय. कुटुंबांतील एकादा श्रीमंत झाला तर त्यानें आपणांस द्रव्य--साह्य करावें अशी इच्छा कुटुंबांतील दुसरीं माणसें करितात आणि तें साह्य मिळालें नाहीं म्हणजे त्याच्या श्रीमंतीचा तीं माणसें हेवा करूं लागतात, कुटुंबांत असंतोष माजतो, कलह सुरू होतो, उलट, इतर लोक धनाढ्य झाले तरी त्यांच्यामुळें आपलें मनःस्वास्थ्य बिघडत नाहीं. कारण त्यांच्यासंबंधानें आपल्या कोणत्याहि अपेक्षा नस-








तात. मग ह्याला उपाय आपलेपणा सोडणें हा होय असें कोणीहि म्हणेल. हिंदु शब्दानें आपलेपणा निर्माण केला आहे. ब्राम्हण व कैकाडी ह्या दोन जातींच्या संस्कृतींत थोडेंसेंहि साम्य सांपडणार नाहीं. परंतु हिंदु ह्या आगंतुक शब्दानें खोटी ऐक्याची भावना अस्तित्वांत आली. वस्तुतः प्रत्येक जात स्वतंत्र आहे. उच्चत्व वा नीचत्व असणें शक्य नाहीं. जाती दर्व्हर्शी स्वयंभु आहेत; उच्चत्व, नीचत्व मानीव असतें. उच्चत्व कोणीहि मान्य करील; पण नीचत्व मात्र कोणी पतकरणार नाहीं. म्हणून 'जन्मतः उच्चनीचत्व' हे शब्द अर्थहीन आहेत. उच्चनीचपणा मानीव असतो. उच्चत्व—मोठेपणा दुसऱ्यांनीं द्यावयाचा असतो; तो आपल्याकरतां स्वतःच घेतां येत नाहीं. तुकारामानें ब्राम्हणांना श्रेष्ठ म्हणावें. ब्राह्मण जेव्हां आपला श्रेष्ठपणा स्वतः प्रस्थापित करूं लागले तेव्हांच त्यांच्या ऱ्हासाला आरंभ झाला. बुद्धिमत्तेच्या तोऱ्यांत ब्राह्मणांची विवेकशक्ति लयाला गेली हें ह्यावरुन उघड होतें.

ह्या बाबतींत ब्राह्मणच घसरले असें नाहीं तर उच्चनीचत्वाच्या ह्या मायावी जाळ्यांत प्रत्येक जात सांपडली. ह्या दृष्टीनें प्रत्येक जात ब्राह्मण आहे; मात्र ब्राम्हणेतरांच्या हें लक्षांत येत नाहीं; कारण ते विचारच करीत नाहींत. ब्राह्मणांना शिव्याशाप देण्याचा अधिकार खरोखर जर कोणाला असेल तर तो अगदीं खालची जी जात असेल तिला. मात्र ही जात कोणती तें मला अद्यापि समजलेलें नाहीं.

सर्व जातींना एका सूत्रांत आणण्याचा प्रयत्न वर्णाश्रमधर्मानें प्रथम केला; पण तो फसला. आज वर्ण नाहींत, आश्रमहि नाहींत! अशा स्थितींत हिंदुधर्म अस्तित्वांत आहे असा हेका अविवेकी मनुष्यच करूं शकेल. ब्राह्मणांनीं शूद्रकर्म (सेवा) करावयाचें आणि ब्राह्मण्य–रक्षणाची वकवक करावयाची हा कमालीचा मूर्खपणा होय! स्मृतिकारांनीं जातिधर्म सांगितलेच नाहींत आणि वर्णाश्रमांच्या लोपाबरोबर वर्णाश्रमधर्माचाहि लोप झाला. त्यामुळेंच सध्यां धर्माच्या बाबतींत अराजक माजलें आहे! एका परिस्थितींतील धर्म दुसऱ्याच परिस्थितींत लागू असावे असा आग्रह आम्ही धरतों. ही बेबंदशाही बंद करावयाची असली तर प्रत्येक जातीला आपआपले धर्माचार निश्चित करण्याची मोकळीक द्यावी. ह्याचा अर्थ जितक्या जाती तितके धर्म असा होईल खराच; परंतु त्यामुळें कांहीं बिघडेल अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

हिंदु शब्दाची हकालपट्टी झाल्यास हिंदुस्थान शब्दहि राहणार नाहीं, हें सांगावयास नकोच. त्यासाठीं भरतखंड शब्दाचें पुनरुज्जीवन करण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें हिंदु शब्दाऐवजीं भारतीय शब्द प्रचारांत आल्यास हिंदु शब्दाभोंवतीं जमलेलीं जळमटें झाडलीं जातील व धर्मैक्याच्या ऐवजीं राज्यैक्य साधेल. धर्मैक्याचा हजारों वर्षांचा प्रयोग पुरा होण्यापूर्वींच इंग्रजी राजनीतीनें आमच्या समाजाला भगदाडें पाडिलीं! हा काळ सामाजिक पुनर्घटनेचा आहे इकडे अद्यापि कोणाचें लक्ष गेलेलें नाहीं. जाळपोळीच्या निमित्तानें समिति नेमली जाऊन जाळपोळीच्या कारणांची मीमांसा झाल्यास हिंदुसमाज खरोखर एकजीव आहे कीं नाहीं ह्या प्रश्नाचा बराच उलगडा होईल.

हिंदु शब्दाप्रमाणेंच बांडगुळासारखे असलेले ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र ह्या वर्णवाचक शब्दांची तरी जरूरी काय? तेहि शब्द कोशांतून काढून टाकण्यानें फायदाच होईल. शब्दानें ज्या वस्तूचा बोध होणार ती वस्तूच अस्तित्वांत नसतांना शब्दाचा व्यवहार चालू ठेवण्यामुळें अपकार नाहीं, तर दुसरें काय होणार?

मुंबई प्रांतांत तरी ब्राह्मणांचा द्वेष महत्त्वाकांक्षी मराठे व लिंगायत हेच विशेषतः करतात; पण ब्राह्मणांचा द्वेष म्हणजे विद्येचा द्वेष हें मात्र ते विसरतात. ब्राह्मणांचा उपयोग करुन घेण्याइतकी पल्लेदार बुद्धीहि नाहीं, संस्कृतिजन्य सौजन्याहि नाहीं, ह्यामुळें हा द्वेष म्हणजे कमकुवतपणामुळें हार खाल्ल्याचा कबुली–जबाब देणेंच होय. शिवाय हेंहि विसरतां कामा नये कीं, आज मराठ्यांना ब्राह्मण नको असले तरी ब्राह्मणांची जागा पटकावून तेथें मराठे कायमचे रोवले जातील असें कधींच होणार नाहीं. शिक्षणाचा फैलाव होईल त्या प्रमाणांत दुसऱ्या जातीहि डोकें वर काढतील आणि मराठ्यांना मागें सारतील. महाराष्ट्रीय मराठ्यांचा आपणांसच ब्राह्‌








णांचें स्थान लाभेल हा समज चुकीचा आहे. देशांत जाती राहिल्या तर कोणतीच जात बहुसंख्य असूं शकणार नाहीं, ह्या दृष्टीनेंहि हिंदु शब्द गेल्यानें मोठा फायदा होणार आहे. अल्पसंख्याक जमातींचा हा देश होईल व देशहिताच्या भूमीवर एकात्मतेचें बीज रुजेल.

## ब्रह्मद्वेषाचीं कारणें आर्थिक तशींच सामाजिक

ह्या अफाट देशांत शंभरांत दहांना सुद्धां लिहितां वाचतां येत नाहीं ! इतकें हें प्रचंड अज्ञान ! ! आणि इकडे वयांत आलेल्या प्रत्येक इसमाला मतदानाचा अधिकार !!! हा जगाच्या इतिहासांत देखील कदाचित् अपूर्व प्रयोग ठरेल. अशा स्थितींत चार शहाण्या माणसांना पुढें करून व बाकीच्यांनीं त्यांना हातभार लावून राज्ययंत्र सुरळीत कसें चालू ठेवितां येईल ह्याची चिंता प्रत्येकानें वाहिली पाहिजे. परंतु मनुष्य-स्वभाव इतका चांगला असेल तेव्हां ना ? अल्पज्ञ व सौजन्यहीन माणसें अधिकारलोलुप असतात. "आपल्या हातांत अधिकार घेऊन आपलें व स्वकीयांचें कल्याण करून घेण्याची संधि ज्यांत मिळूं शकते तें स्वराज्य" हाच स्वराज्याचा अर्थ ते समजतात. राज्यशास्त्राच्या अध्ययनाच्या दृष्टीनें पाहिल्यास ते नुसते ओरखडलेले असतात इतकेंच फार फार तर म्हणतां येईल. विद्या नसली तरी विद्येचा आभास ते चांगला उत्पन्न करूं शकतात व त्याच्या बळावर आणि उदीमधंद्यांत मिळालेल्या पैशाच्या जोरावर देशांत विघातक चळवळ करण्यास ते कचरत नाहींत. अधिकारी-वर्गावर तोंडसुख घेणें हा त्यांचा नित्याचा क्रम असतो. भरदिवसां अनपकारी लोकांचीं घरें लुटलीं-जाळलीं तरी सरकारनें मध्यें पडूं नये असें जेथें सरकारला बजावलें जातें, तेथें राज्यशास्त्राचा कित्ता लोकांनीं अद्यापि गिरवला नाहीं हेंच प्रत्ययास येत नाहीं काय ? आपण निवडून दिलेल्या मंत्र्यांचा वेळीं अवेळीं तुच्छतात्मक उपहास करणें हेंहि राज्यशासन--विषयक अज्ञानाचें द्योतक आहे. अशा वरळण्यानें झोटिंगशाही माजते आणि सरकारचा वचक कमी करण्याचा प्रयत्न बुद्धिपुरःसर केला गेल्यामुळें राष्ट्राची हानि होते ह्याचा विचार कोणी करीत नाहीं. अन्तःकलहानें विदीर्ण झालेलें राष्ट्र शत्रूच्या भक्ष्यस्थानीं पडण्यास विलंब लागत नाहीं. तात्पर्य ब्रम्हद्वेषाचीं कारणें आर्थिक आहेत तशींच सामाजिकहि आहेत. सामाजिक कारणें बलवत्तर आहेत असें कित्येकजण प्रतिपादितात. परंतु हें जर सर्वस्वीं खरें असतें तर मराठे सत्तारूढ असतांना ब्राम्हणांचा छळ करण्याची सुसंधि त्यांना मिळाली असूनहि, इतिहास सांगतो कीं, ब्राम्हणांच्या केसालाहि धक्का लावण्याचें कोणाच्या मनांत आलें नाहीं; उलट, ब्राम्हणांची भरभराटच झाली. तेव्हां आजच ब्रम्ह-द्वेषाचा बागबा पेटण्यास विशेष कोणतें कारण झालें याचा तपास लावणें अगत्याचें आहे. शिवाजीच्या पूर्वींहि ब्राम्हणेतर राजे असत; पण त्याकाळींसुद्धां जाति-मत्सराची वावटळ उठली नाहीं. ब्राम्हणेतर राज्यकर्त्यांनीं ब्राम्हणांच्या बुद्धीचा उपयोगच करून घेतला. आज ब्राम्हणांना गाडीला जुंपावें अशी इच्छा कित्येक जाती करीत आहेत. आजपर्यंत ब्राम्हणांकडून इतर जातींची उपेक्षाच झाली. परिणामतः आज इतर जमाती ब्राम्हणांचा समूळ उच्छेद करूं पाहत आहेत.

विचारपद्धति पालटली हें असंतोषाचें आणखी एक कारण आहे. ब्राम्हण मद्यप्राशन व मांसाहार करीत नसत व ह्या त्यांच्या संयमामुळें बाकीच्या सर्व जातींना त्यांच्याबद्दल आदर वाटे. परंतु इंग्रजांची सत्ता येथें स्थापित झाल्यानंतर त्यांचा हा गुणच अवगुण ठरला ! मद्यपान व मांसाहार ह्यांच्याकडे श्रेष्ठत्व झुकलें आणि आजपर्यंत संयमी अतएव पवित्र व श्रेष्ठ मानला गेलेला ब्राम्हण तुच्छ लेखला जाऊं लागला. ही वैचारिक क्रांतीहि विचारांत घेणें अवश्य आहे.

गेल्या जाळपोळींत दिसून येणारी मनोवृत्ति ही सत्यशोधकी समाजाच्या चळवळीच्या मनोवृत्तिचें विस्तार पावलेलें स्वरूप होय. तिला मध्यल्या १९४२च्या चळवळीचें इंधन मिळालें. यापुढची पायरी म्हणजे मुंबई प्रांतापुरतें तरी राज्यशासन डळमळीत करणें ही होय. पण समाधानाची गोष्ट इतकीच कीं, महाराष्ट्र म्हणजे हिंदुस्थान नव्हे. मध्यवर्ती सरकार खंबीर असेल तर महाराष्ट्रांतील










घडामोडी महाराष्ट्रालाच बाधतील. १९४२ सालच्या चळवळीचें अभिनंदन गांधींनीं केलें नाहीं म्हणून बोटें मोडणाऱ्या लोकांना गांधींचा शहाणपणा आतां तरी पटला असेल असें वाटतें.

कांहीं झालें तरी सामाजिक दृष्ट्या व राजकारण-दृष्ट्या ही बाब इतकी महत्त्वाची आहे कीं, सरकारनें एक वजनदार कमिशन नेमून ह्या जाळपोळीची कारणें शोधून काढावीं. नाहीं तर ही यादवी महाराष्ट्राचा घात केल्यावांचून राहणार नाहीं. संयुक्त-महाराष्ट्राच्या पुरस्कर्त्यांनींहि सावधान होऊनच पुढें पाऊल टाकावें.

---

## गांधीजींचे मार्क्सवाद वगैरेबद्दल कांहीं विचार

"माझें आणि मार्क्सचें ध्येय एकच आहे. शासनसंस्था ही शेवटीं मुकून गेली पाहिजे. परंतु शासन-संस्थेचा वा दंडसंस्थेचा विलय होणें हें जें अभीष्ट तें मार्क्सच्या विरोधविकासवादानें होईल असें मात्र मला वाटत नाहीं. उलट पक्षीं अहिंसेचें आणि आपल्या मनोदेवतेच्या आज्ञांचें पालन जर केलें गेलें तर दंडसंस्था आपोआप अपरिहार्यपणें मुकून जाईल.

एकाद्या समाजाच्या संस्कृतीचें मूल्यमापन करावयाचें असलें तर तें, त्या समाजानें निसर्ग--शक्तींवर किती प्रमाणांत प्रभुत्व मिळविलें आहे किंवा त्या समाजांतील वाङ्मय आणि कला या किती सामर्थ्य-शाली आहेत, या गोष्टींवरून ठरवूं नये. त्या समाजांतील घटक इतर प्राणिमात्रांशीं किती प्रमाणांत सौजन्यानें आणि दयाळूपणें वागतात यावरून त्या समाजाची संस्कृति ठरवावी.

क्रोपाट्किनच्या विचारसरणीप्रमाणें आदि-मानवाला रक्तपात आणि निर्दयपणा आवडत नव्हते. हें जर खरें असेल तर मग असत्--प्रवृत्तींची वाढ होत गेली असें ओघानेंच येतें.

प्राचीन काळीं दक्षिण अमेरिकेमध्यें नरमेधाची चाल होती. त्या नरमेधांत ज्या पुरुषाचा बळी जात असे, त्या पुरुषाला त्याबद्दल अभिमान वाटे व तो बळी जावयाला आनंदानें कबूल होई.

हल्लींच्या काळीं कायद्याच्या सक्तीनें भरती झालेल्या सैनिकांचीं सैन्यें द्वेष आणि असत्य यांच्या पद्धतशीर प्रचारानें वेडावून जाऊन प्रचंड प्रमाणावर जनसमूहांचा जो खून करतात त्यापेक्षां वरील दक्षिण अमेरिकेंतील प्राचीन प्रथा कमी अनीतिमान् आहे.

प्रेम आणि सहिष्णुता यांच्या पायांवर खराखुरा सुसंस्कृत समाज संघटित करावयाचा असेल तर त्याला प्रेरक शक्ति कोणती ? 'परलोक-प्रतीति' ही ती शक्ति असावी असें मला सुचवावयाचें नाहीं. आपल्या मनोदेवतेच्या उच्चतम प्रेरणा पाळावयाचें जर मनुष्यानें ठरविलें तर विश्वयोजनेंतील आपलें कर्तव्य केल्याची त्यास कृतार्थता लाभेल."

—महात्मा गांधी.

(ना. आगाखान यांनीं १९४६ सालीं भेट घेतली असतां त्यावेळीं गांधींनीं हीं आपलीं मतें व्यक्त केलीं तीं ना. आगाखान यांनीं नुकतींच जाहीर केलीं.)










# शूद्र हे मूळचे कोण ?

## ग्रंथपरिचय*

'शूद्र हे मूळचे क्षत्रिय होत. ब्राह्मणांशीं त्यांचें नित्याचें वैर. ब्राह्मणांनीं द्वेपबुद्धीनें या क्षत्रियांचा उपनयन–संस्कार करायचें नाकारलें. त्यामुळें हे क्षत्रिय सामाजिक दृष्टीनें अधःपतित होऊन त्यांचा शूद्रवर्ण बनला.' अशा प्रकारचें चालू समजुतीस धक्का देणारें अभिनव मत डॉ॰ आंबेडकरांनीं आपल्या ' Who were the Shudras ? ' या ग्रंथांत साधार मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

डॉ॰ आंबेडकर हे एक राज्यशास्त्रज्ञ, अर्थशास्त्रज्ञ व कायदेपंडित म्हणून सुप्रसिद्ध आहेत. " Who were the Shudras ? " हा ग्रंथ लिहून त्यांनीं प्राच्यविद्यापंडित या नात्यानें आपल्या विद्वत्तेचा नवीन पैलू प्रकट केला आहे. सुमारें सव्वा तपाच्या व्यासंगानंतर व परिश्रमानंतर आपण आपलें मत बनविलें आहे असें त्यांनीं या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हटलें असून तें मत त्यांनीं आपल्या नेहमींच्या तडफदार युक्तिवादानें मांडलें आहे. आपलें संशोधन अपूर्व आहे व या संशोधनानें प्रचलित एतद्विपयक समजुतींना धक्के बसतील, याची लेखकाला तीव्र जाणीव असून या संशोधनपर ग्रंथाच्या मांडणींतून एक प्रकारचा भावनावेश व हिरीरी दिसून येतात. आपल्या ग्रंथांतील मतप्रतिपादनानें पुराणमतवादी मंडळींचा आपल्यावर कोप होईल याची जाणीव लेखकाला असून त्यानें भवभूतीच्या " कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी " या वचनाची ढाल पुढें केली आहे. आपण बनविलेल्या मताविपयीं त्यांची निःशंक बेडर वृत्ति व त्यांचा आत्मविश्वास त्यांनींच उद्धृत केलेल्या डॉ॰ जॉनसनच्या खालील वचनावरुन दिसून येतातः— " I am not going to be deterred from catching a cheat by the menaces of a ruffian ( एकाद्या गुंडाच्या धमकावणीनें भामट्याला पकडावयाला मी कचरणार नाहीं. ) वर उल्लेखिलेल्या शूद्रांविपयींच्या सिद्धान्ताचें प्रतिपादन डॉ॰ आंबेडकरांनीं जीं प्रमाणें व जे आधार देऊन युक्तिवादानें केलें आहे, त्या प्रमाणांचा व युक्तिवादाचा सारांश शक्य तों मुळाला धरून खालीं दिला आहे. या परिचयानंतर त्यांतील मुख्य मुद्द्यांचें डॉ॰ दप्तरी यांनीं केलेलें परीक्षण पुढें याच अंकांत दिलें आहे.

शूद्रवर्णाच्या उत्पत्तीची उपपत्ति वैदिक वाङ्मयांत शोधूं गेल्यास संशोधकाला एक कोडेंच पडतें. शूद्रवर्णाच्या उत्पत्तीविपयीं सर्वांत जुना उल्लेख ऋग्वेदांतील पुरुपसूक्तांत आहे. ज्याच्यापासून विश्वोत्पत्ति झाली असा जो विराट् पुरुप त्याच्यापासून चार वर्ण उत्पन्न झाले. ( " ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्, बाहू राजन्यः कृतः, ऊरू तदस्य यद्वैश्यः, पद्भ्यां शूद्रोऽजायत " ) या सूक्तकारानें समाजांतील या चार वर्गांविपयींच्या उत्पत्तीविपयीं जें अलंकारिक वर्णन केलें आहे, त्यांत शूद्राला ' तो पायांपासून झाला ' असें म्हणून हीन स्थान कां दिलें ? शूद्रवर्गाविपयीं येवढी अढी किंवा येवढा हेवादावा असण्याचें कारण काय ? हेव्यादाव्याच्या भावनेमुळेंच असें रूपकात्मक वर्णन करून शूद्राला क्षुद्र व पददलितच ठेविण्याचा कटाक्ष केलेला दिसतो. नाहीं तर हरिवंशांत यज्ञांतील सतरा ब्राह्मण ऋत्विजांचें वर्णन करितांना " कांहीं ऋत्विज् भगवानांच्या मुखापासून उत्पन्न झाले, कांहीं पोटापासून, कांहीं हातांपासून " असें वर्णन केलें असून " पायांपासून " कोणी ऋत्विज् उत्पन्न झाल्याचें मात्र वर्णन नाहीं.

*Who were the Shudras ? by Dr. B. R. Ambedkar. Thacker & Co. Pages 259.








## शूद्र हे मूळचे कोण ?

कारण, हे ऋत्विज् ब्राह्मण वर्गांतले ना ? हरिवंशांतील या आलंकारिक वर्णनाची पुरुषसूक्तांतील तशाच प्रकारच्या वर्णनाशीं तुलना करितां ' पद्भ्यां शूद्रोऽजायत ' असें म्हणण्यांत शूद्रांविषयीं इतकी दुष्ट बुद्धि व इतका मत्सर या वृत्ती कां दिसून याव्या ? तसेंच द्विज, त्रैवर्णिक, सवर्ण, अवर्ण या शब्दांचा विचार केला असतां शूद्रांची उत्पत्ति व स्थिति याविषयीं अधिकच गूढ पडूं लागतें. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे त्रैवर्णिक उपनयन संस्कारामुळें 'द्विज' मानले जात व या त्रैवर्णिक वर्णव्यवस्थेंत शूद्राला स्थान नसे; पण मग शूद्र हा ' सवर्ण 'हि मानला जातो, तो कां ? अतिशूद्र किंवा अस्पृश्य हा ' अवर्ण ' मानला गेला, पण शूद्र मात्र ' अवर्ण ' मानला गेला नाहीं, हें असें कां ? त्रैवर्णिकांच्या बाहेर राहूनहि हा ' सवर्ण ' कसा राहिला आणि ' अवर्ण ' कां नव्हे ?

वैदिक व स्मार्त वाङ्मयांतील ब्राह्मणवर्गीय श्रुतिस्मृतिकारांनीं इतर वर्णांच्या मानानें शूद्राला सामाजिक बाबतींत जें हीन स्थान दिलें आहे, तें पाहून हा इतका हेवादावा कां असावा याचा विस्मय वाटल्याशिवाय रहत नाहीं. ' शूद्र हा जन्माचाच दास, त्यानें दास्यांतच कायमचें राहिलें पाहिजे, त्याला शिक्षण देणें म्हणजे गुन्हा आहे, त्यानें निर्धनच राहिलें पाहिजे, त्याचें जीवित म्हणजे कः पदार्थ, त्यानें उच्चवर्णीय स्त्रीला स्पर्श जरी केला तरी तो भयंकर शिक्षेस पात्र होईल ! ' इतका गहजब शूद्रांवर झालेला दिसून येतो. अशा प्रकारें जगांत दुसरीकडे कोठेंहि समाजांतलि एकाद्या वर्गास इतकें हीन लेखण्यांत आलें नसेल ! उदाहरणच द्यावयाचें झाल्यास जुन्या रोमन समाजांत उच्चनीच भाव होता. तथापि रोमन कायद्याची ब्राह्मण धर्मशास्त्राशीं तुलना करतां, रोमन समाजांतील हीन गणलेल्या लोकांना राजकीय व मुलकी बाबतींत हक्क नसतील, परंतु फौजदारी गुन्ह्यांच्या बाबतींत रोमन कायद्यानें उच्चनीच भाव ठेवलेला दिसून येत नाहीं. गुन्हा कोणीहि करो, त्याला शिक्षा सारखीच होत असे. तसेंच रोमन समाजांत ही हीनता माणसाला कायमची चिकटलेली नसे. त्याला उच्चवर्णीयांबरोबर समानता मिळविण्याचा मार्ग ब्राह्मणधर्मशास्त्रांतल्याप्रमाणें कायमचा बंद नव्हता.

शूद्रवर्णाच्या उत्पत्तीची बुद्धिवादी दृष्टीनें उपपत्ति लावण्याचा प्रयत्न पाश्चात्य प्राच्यविद्यापंडितांनीं केला आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, वैदिक वाङ्मयाचे निर्माते हे आर्यवंशीय. त्यांनीं हिंदुस्थानवर स्वारी करुन एतद्देशीयांना जिंकिलें. ते एतद्देशीयांना दास आणि दस्यू म्हणत असत, या दासदस्यूंना जिंकून त्यांनीं या दासदस्यूंचाच शूद्रवर्ण बनविला.

पाश्चात्य पंडितांचें वरील मत पटण्यासारखें नाहीं. तें केवळ गृहीत गोष्टींवर आधारलेलें असून लेचेंपेचें आहे, असें आधुनिक समाजशास्त्रीय विचारसरणीची कसोटी लावतां दिसून येईल. प्रथमतः आर्यवंश ही काय चीज आहे ? तिचें वैशिष्ट्यदर्शक लक्षण कोणतें ? दोन मतें यासंबंधीं उपलब्ध आहेत. शरीररचनेच्या दृष्टीनें प्रो० रिपलेसारखे समाजशास्त्रज्ञ आर्यवंशीयांचें लक्षण " लांबट डोकें, साधारण उभट प्रमाणशीर चेहरा, सरळ रेखीव नाक, ठसठशीत तोंडवळा " असें समजतात. पण अशीं लक्षणें ट्युटॉनिक आणि मेडिटरेनिअन अशा दोन्हीहि वंशांमध्यें दिसून येतात. म्हणून हें आर्यविशिष्ट लक्षण होऊं शकत नाहीं. दुसरें मत प्रो० मॅक्समुलर यांचें. ते म्हणतात कीं आर्य ही संज्ञा वंशविशिष्ट नाहीं, भाषाविशिष्ट आहे. आर्य वंश, आर्य डोळे, आर्य नाककान असें वर्णन करणें म्हणजे 'dolichocephalic dictionary or brachycephalic grammar' असें, म्हणजेच एकादा शब्दकोश उभट चेहऱ्याचा वा एकादें व्याकरण रुंद चेहरेपट्टीचें आहे, असें म्हणण्याइतकेंच हास्यास्पद आहे. खुद्द ऋग्वेदांत आर्य हा शब्द एकतीस वेळां आला आहे. अर्य हा अठ्याऐंशीं वेळां आला आहे. पण कोठेंही त्याचा आर्यवंशीय हा अर्थ लागू पडत नाहीं. बरें, आर्य लोक बाहेरुन आले म्हणतात. पण त्यांचें मूलस्थान कोणतें याबाबत तज्ज्ञांतहि अजून एकवाक्यता नाहीं. टिळकांच्या मतें, ऋग्वेदांतील लांब रात्री व पहाट यांचें वर्णन लक्षांत घेतां आर्यांचें मूळ वसतिस्थान उत्तरध्रुव होतें. परंतु ऋग्वेदांत मुख्यतः घोडा हा आवडता प्राणी आहे ही गोष्ट जर








विचारांत घेतली तर घोडा हा प्राणी उत्तर ध्रुवाकडे कोठून आढळणार ? म्हणून उत्तरध्रुव हें आर्यांचें वसतिस्थान ही उपपत्ति आधाराभावीं लटकत राहते. तसेंच ज्या दासांना किंवा दस्यूंना आर्यांनीं जिंकून घेतलें असें गृहीत धरलें आहे ते दास आणि दस्यू तरी कोण ? आर्य आणि दास किंवा दस्यू यांच्यामधील तुरळक चकमकी सोडून दिल्या तर ऋग्वेदांतील इतर उल्लेखांवरून आर्य आणि दास ह्यांनीं आपणां दोघांच्या समान शत्रूविरुद्ध संयुक्त फळी बनविली असल्याचें दिसून येतें. दस्यूंना 'मृध्रवाचः', 'अनसः' व दासांना 'कृष्णयोनि' किंवा 'कृष्णवर्ण' असें म्हटलें आहे. 'मृध्रवाचः' म्हणजे असंस्कृत ओबडधोबड भाषा बोलणारे. 'अनसाः' याचाहि अर्थ सायनाचार्यांनीं तसाच केला आहे. ओबडधोबड भाषेवरून लोक भिन्न वंशाचे आहेत असें अनुमान काढणें धाष्टर्याचेंच होय. दासांना 'कृष्णयोनि' म्हटलें आहे त्याचा अर्थ लाक्षणिक नसेल कशावरून ? बरें, वेदकालीन आर्य (इंडो–आर्यन) हे गोरे होते याला तरी काय पुरावा आहे ? उलट पक्षीं आर्यवंशीय राम आणि कृष्ण हे श्यामलवर्णच होते ना ? कण्व-महर्षींच्या ऋग्वेदांतील वर्णनावरून (X, 31, 11.) ते काळे असावे असें दिसतें. बरें 'दासवर्ण' यांतील वर्ण या शब्दाचा अर्थ रंगच कशावरून ? वर्णापासूनच रूपांतरित झालेल्या, झेंडअवेस्तांतल्या 'वरेण' शब्दाचा अर्थ बघतां, वर्ण याचा अर्थ 'धर्म किंवा श्रध्दा' असाहि असावा. शिवाय ऋग्वेद रचणारे ज्यांना आर्य म्हणतात, त्यांचे शत्रू दास किंवा दस्यूच कशावरून ? ऋग्वेदांत किती तरी ऋचा अशा दाखवून देतां येतील कीं त्यांत आर्यांनीं आपल्या आर्य शत्रू-विरुद्ध देवतांना आवाहन केलें आहे. यावरून परस्परांशीं बद्धवैर अशा दोन आर्य जमाती होत्या असें अनुमान निघतें. या दोन आर्य समूहांच्या दोन भिन्न विचारसरणी दिसून येतात. ऋग्वेदांत धार्मिक किंवा उपाध्यायप्रधान विचारसरणी दिसून येते, तर अथर्ववेदांत, तदुत्तर ब्राह्मणग्रंथांत व पुराणांत सामान्य जनांच्या प्रचलित समजुती-सारखी लौकिक विचारसरणि दिसून येते. पहिल्या विचारसरणींत चातुर्वर्ण्य–व्यवस्था परमेश्वर–निर्मित म्हणून मानली गेली, तर दुसऱ्या विचारसरणींत ती एक मानवी घटना म्हणून मानली गेली. असे दोन आर्यसमूह हिंदुस्थानांत होते याला मानववंश-शास्त्राचाहि आधार देतां येतो. मानववंशशास्त्रदृष्ट्या हिंदुस्थानांत दोन प्रकारचे मानववंश आहेतः—(१) लांबट डोक्याचे मेडिटरेनियन वंशाचे लोक. यांची भाषा आर्य होती. हे हिंदुस्थानच्या आंतील भागांत आहेत. (२) वाटोळ्या चेहऱ्याचे अल्पा-इन लोक. हे हिमालयांत होते. यांची भाषाहि आर्यच होती. हे हिंदुस्थानच्या कडेकडेनें सांपडतात. यांपैकीं कोणते आर्य हिंदुस्थानांत पहिल्या प्रथम आले याचा जरी निर्णय होऊं शकला नाहीं, तरी खुद्द हिंदुस्थानांत आर्यांचेच दोन पक्ष होते हें सिद्ध होतें. एवंच वरील प्रमाणांवरून विचार करितां, पाश्चात्य प्राच्यविद्यापंडितांचें आर्यविषयींचें प्रति-पादन किती अविवेकाचें व डळमळीत आहे हें दिसून येईल.

दस्यू हे अनार्य होते यालाहि निर्णायक पुरावा नाहीं. आर्यांचा धर्म ते पाळीत नसावे. उदाहरणार्थ,

दृश्यन्ते मानुषे लोके सर्ववर्णेषु दस्यवः ।
लिंगान्तरे वर्तमाना आश्रमेषु चतुर्ष्वपि ॥

—महाभारत, शांतिपर्व, ६५, २३.

दास आणि दस्यू रानटी होते असें त्यांच्या ऋग्वेदांतील वर्णनावरून दिसत नाहीं. दस्यू शंभर दरवाजे असलेल्या शहरांत किल्ल्यांमध्यें राहत असत, त्यांचे रथ असत व आर्यांच्यांसारखींच शस्त्रास्त्रें त्यांच्याही जवळ असत.

आर्यांनीं जिंकून दास बनविलेले दास किंवा दस्यू हेच शूद्र होत यालाहि कांहीं निर्णायक प्रमाण नाहीं. उलट पक्षीं शूद्र हें एका लढाऊ जातीचें वा संघाचें नांव होतें असें म्हणावयाला जागा आहे. शिकंदरानें हिंदुस्थानवरील आपल्या स्वारींत ज्या जमाती जिंकल्या त्यांत 'सोदरि' (शूद्र) नांवाची एक जमात होती. शूद्र हे अनार्य असावे असें धर्म-सूत्रें व तदुत्तर ग्रंथ यांतील कांहीं वचनांवरून दिसतें खरें; परंतु त्यांना किती किंमत द्यावी हा प्रश्नच आहे. धर्मसूत्रादि ग्रंथ शूद्रांच्या वैऱ्यांनीं लिहिलेले आहेत असें दिसतें. धर्मसूत्रांच्या दृष्टीनें








शूद्राला उपनयनाचा अधिकार नाहीं, वेदाध्ययनाचा नाहीं, यजन करण्याचा नाहीं, सोमपानाचाहि नाहीं. याउलट 'संस्कार–गणपति' नांवाच्या ग्रंथांत शूद्राला उपनयनाचा अधिकार आहे असें स्पष्ट विधान आहे. छांदोग्योपनिषदांतील कथेवरून जानश्रुति नांवाच्या शूद्र राजाला रैक्व नांवाच्या ज्ञान्यानें संवर्गविद्या शिकविली, असें स्पष्ट दिसतें. ऋग्वेदांतील अनेक सूक्तें रचणारा कवष ऐलूष हा शूद्र होता. शूद्राला यज्ञ करण्याचा अधिकार होता असें बादरि नांवाच्या आचार्यांचें मत होतें, असा उल्लेख जैमिनींनें केला आहे. 'सुकन्या-च्यवन' कथेवरूनहि शूद्रांना देखील सोमपानाचा अधिकार असावा असें दिसतें. कौटिल्यानें तर शूद्र हा जन्मानें आर्य आहे असा स्पष्ट उल्लेख केला आहे. शूद्राला मानाचें स्थान होतें असें कांहीं गोष्टींवरून दिसून येतें. उदाहरणार्थ, राजाला राज्यपद लोकांकडून मिळत असे. त्या लोकांचे जे प्रतिनिधि त्यांना 'रत्नि' असें म्हणत. कारण राज्याधिकाराचें खरें रत्न मूळ त्यांच्याजवळ असे. हे 'रत्नि' राजाला राज्याधिकार देत असत. या रत्नींकडून राज्याधिकार मिळाल्यावर राजा या रत्नींना घरोघर भेट देत असे. या रत्नींमध्यें नेहमींच एक शूद्र असे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. राजाच्या प्रधानमंडळांत शूद्रांना स्थान होतें येवढेंच नव्हे तर तें ब्राह्मणांच्या बरोबरीनें होतें हें महाभारतांत भीष्मानें केलेल्या उपदेशावरूनहि स्पष्ट दिसतें.

अशा प्रकारें शूद्रांना समान दर्जा व मानाचें स्थान देणारे उल्लेख सांपडत असतां शूद्रांना हीन लेखणारे उल्लेख तत्पूर्वी दिले आहेत त्यांची संगति कशी लावावयाची ? शूद्रांच्या बाबतींतील ही कूट–समस्या कशी उलगडावयाची ?

ही समस्या एकाच उपपत्तीनें सुटूं शकते. ती ही कीं, शूद्र हे आर्य क्षत्रिय होते. त्यांच्यापैकीं कांहीं जण तर बलाढ्य असे राजेहि होते. ही उपपत्ति सकृद्दर्शनीं आश्चर्यकारक वाटेल; पण तिला मिळणारी प्रमाणें बघून आश्चर्याचा धक्का कमी होईल. याला मुख्य प्रमाण म्हणजे महाभारतांतील खालील श्लोक होय :—

तस्मात् शूद्रः पाकयज्ञैर्यजेताव्रतवान् स्वयम् ।
पूर्णपात्रमयीं आहु : पाकयज्ञस्य दक्षिणाम् ॥३८॥
शूद्रः पैजवनो नाम सहस्राणां शतं ददौ ।
ऐन्द्राग्नेन विधानेन दक्षिणामिति नः श्रुतम् ॥३९॥

—शांतिपर्व, अध्याय साठावा.

'पूर्वी पैजवन नांवाचा शूद्र होऊन गेला. त्यानें ऐन्द्राग्नि विधीनें यज्ञांत लाख पूर्णपात्रांची दक्षिणा दिली.' हा पैजवन कोण ? याचा पत्ता "पिजवनाचा मुलगा जो सुदास्; त्याचे पुरोहित विश्वामित्र ऋषि होते" (निरुक्त, २, २४.) या यास्काचार्यांच्या वचनावरून लागेल. अर्थातच महाभारतांत उल्लेखिलेला पैजवन म्हणजे सुदास् असें दिसतें. आतां हा सुदास् तरी कोण ? याबद्दल संशोधन करतां ऋग्वेद आणि विष्णुपुराण यांवरून सुदास् तीन होऊन गेले असें आढळून येतें. परंतु त्या तिघांहिविषयींच्या उल्लेखांवरून मिळणाऱ्या माहितींची तुलना केली असतां, ऋग्वेदांतला सुदास् हाच महाभारतांतील उपरिनिर्दिष्ट शूद्र पैजवन होय याबद्दल खात्री पटूं शकेल. प्रो० वेबर यांनींहि हाच सिद्धान्त काढला आहे. ऋग्वेदांतील सुदास्विषयीं विखुरलेल्या अनेक उल्लेखांवरून त्याच्या व्यक्तिमत्त्वाची थोडी कल्पना येऊं शकते. सुदास्चे शत्रू आर्य आणि दास असे दोघेहि दिसतात. त्याच्या वडिलांचें नांव दिवोदास होतें. त्याच्या पत्नीचें नांव सुदेवी. तो क्षत्रिय राजा असून त्याला राज्याभिषेक खुद्द ब्रह्मर्षि वसिष्ठ यांनीं केला होता. ऋग्वेदकालीन समाजांत ज्या दाशराज्ञ युद्धानें खळबळ उत्पन्न केली त्या दाशराज्ञ युद्धांतील प्रधान वीरपुरुष सुदास् हा होय. सुदास्नें अश्वमेधयज्ञ केला, त्यानें स्वतः वैदिक सूक्तें रचिलीं. तो इतका उदार आणि दानशूर होता कीं त्याला 'अतिथिग्व' (आतिथियपरम) म्हणत असत. त्याचा पिता दिवोदास हा भरत नांवाच्या जमातींपैकीं होता. ज्यांच्या नांवानें हिंदुस्थानास 'भरतवर्ष' हें नांव पडलें ते हे भरत होत हें लक्षांत घेतल्यास दिवोदास आणि त्याचा पुत्र सुदास् (म्हणजेच महाभारतानें उल्लेखिलेला शूद्र सुदास्) हें किती महानुभाव असे राजे होऊन गेले ह्याची कल्पना येईल.







ज्या शूद्र नांवाच्या क्षत्रियांच्या जमातींत सुदास्-सारखा पराक्रमी व वैभवशाली राजा होऊन गेला, ते शूद्र क्षत्रिय होत असें म्हटलें कीं, प्राचीन काळीं शूद्र नांवाचा हीन असा चवथा वर्ण नव्हता असें म्हणणें प्राप्तच होतें आणि या म्हणण्यास पुष्टिहि मिळते. ऐन ऋग्वेदकाळीं तीनच वर्णांचा उल्लेख आहे. शतपथ ब्राह्मणांत ( २, १, ४, ११. ) आणि तैत्तिरीय ब्राह्मणांतहि तीनच वर्ण उत्पन्न झाल्याचें वर्णन आहे. मग चातुर्वर्ण्योत्पत्तीचा वैदिक आधार असें जें पुरुषसूक्त त्याची वाट काय ? तें मागाहून ऋग्वेदांत घुसडलें गेलें असें प्राच्यविद्या-पंडितांचें मत आहे. पुरुषसूक्ताच्या भाषेवरून, त्यांतील कल्पनांवरून व इतर वेदांत दिसून येणाऱ्या त्यांतील ऋचांच्या संख्याभिन्नतेवरून, पुरुषसूक्त हीं ऐन ऋग्वेदकालीन मौलिक रचना नसून तें मागाहून ऋग्वेदसंहितेंत प्रक्षिप्त केलें गेलें आहे हें उघड होतें. ह्मणून पुरुषसूक्तामधील विधानास मौलिक महत्त्व नाहीं.

शूद्र हे मूळचे क्षत्रिय. मग त्यांना मागाहून हीन, अपमानास्पद असें कां गणण्यांत आलें ? त्यांना उच्च पदावरून खालीं ओढून त्यांचा हीन असा चतुर्थ वर्ण कां बनविण्यांत आला ? या प्रश्नाचें उत्तर हेंच कीं, याला कारण शूद्र क्षत्रियांचें ब्राह्मणवर्गाशीं आलेलें भयंकर वितुष्ट. याला पुरावेहि भरपूर सांपडतात. वसिष्ठ आणि विश्वामित्र यांचें वैर तर अनादिकालापासून प्रसिद्ध आहे. वसिष्ठ हा ब्रह्मर्षि, तर विश्वामित्र हा राजर्षि होता. हा राजर्षि विश्वामित्र मंत्रद्रष्टा असून सुप्रसिद्ध 'गायत्री' मंत्राचें ' दर्शन ' यालाच झालें. तो भरत नांवाच्या क्षत्रियकुलांपैकीं होता. ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्या-मध्यें मुख्यतः तीन अधिकारांबद्दल भांडण चालू होतें असें दिसतें. (१) प्रतिग्रहाचा ( दान—स्वीकार करावयाचा ) अधिकार, ( २ ) अध्यापनाचा म्हणजे वेदविद्या शिकवावयाचा अधिकार आणि ( ३ ) याजनाचा म्हणजे यज्ञांत पौरोहित्य कर-ण्याचा अधिकार. ब्राह्मणांचा कटाक्ष हे सर्व अधि-कार—विशेषतः तिसरा याजनाचा अधिकार आपणांलाच आहे यावर होता. वसिष्ठ आणि विश्वामित्र यांमधील वैराचें बीज या अधिकारग्रहणा-बद्दलच दिसून येतें. पूर्वोक्त शूद्र राजा सुदास् याचें या प्रकरणीं महत्त्वाचें अंग असलेलें दिसतें. त्याचे पुरोहित प्रथम वसिष्ठच होते. पण त्यांना काढून टाकून त्यानें विश्वामित्राला पुरोहित नेमलें. एवढेंच नव्हे तर, वासिष्ठाचा मुलगा जो शक्ति त्याला त्यानें जिवंत जाळलें. कारण काय, तर या शक्तीनें विश्वामित्राला यज्ञमंडपांत सार्वजनिक वादविवाद होत असतां अगदीं निरुत्तर केलें होतें. यामुळें वसिष्ठ आणि सुदास्सारखे शूद्र क्षत्रिय यांच्यामधील वैरभाव सारखा वाढतच गेला. ब्राह्मण—क्षत्रिय—संघर्षाचीं उदाहरणें म्हणून वेन, पुरूरवस्, नहुष आणि निमि या प्राचीन काळच्या राजांच्या कथांचा उल्लेख करतां येईल. हे राजे शूद्र जमातींतलि आर्य क्षत्रिय असून पराक्रमी व तेजस्वी होते. त्यांना ब्राह्मणांचा अनियंत्रित एकतंत्रीपणा सहन न झाल्यामुळें त्यांनीं त्यांना कसून विरोध केला. अशा प्रकारें वैरभाव विकोपास गेल्यामुळें ब्राह्मणांनीं या भांडखोर क्षत्रि-यांचा नक्षा उतरविण्याचा चंग बांधला व त्यांचा सामाजिक ' अधःपात ' करावयाचें ठरवून त्यांचा शूद्र वर्ण बनविला.

क्षत्रियांचें हें ' अधःपतन ' घडवून आणण्यासाठीं ब्राह्मणांनीं कोणतें तंत्र अवलंबिलें ? या शूद्र क्षत्रियांचा उपनयनाचा अधिकारच त्यांनीं काढून घेतला. उप-नयनाचें मुख्य कार्य म्हणजे वेदाभ्यासास सुरुवात करणें. वास्तविक पाहतां उपनयन—संस्कार मूलतः सर्वां-नाच, फार काय, पण बहिरे, मुके, क्लीब यांना देखील होता. व्रात्य म्हणजे आर्यांचा धर्म न पाळणारे. पण यांचें देखील उपनयन, व्रात्यस्तोमानंतर कां होईना, पण होत असे. स्त्रियांचेंहि उपनयन होत असे, अशीं देखील प्रमाणवचनें सांपडतात. 'संस्कारगणपति' या ग्रंथांतील वचनावरून शूद्रांचेंहि उपनयन होत असे, हें स्पष्ट आहे. सुदास् ह्या शूद्र राजाला राज्याभिषेक खुद्द वसिष्ठानें केला. सुदास्नें यज्ञहि केला, तेव्हां त्याचेंहि उपनयन झालें असलेंच पाहिजे. स्त्रियांचा उपनयनाचा अधिकार हिरावला गेला याला कारण असें देतां येईल कीं, त्यांचा विवाहसंस्कार आठव्या वर्षीं बालवयांत होऊं लागल्यानंतर बालवयांतच होणारा स्वतंत्र असा उपनयन संस्कार त्यांच्या-करितां ठेविला नाहीं. पण शूद्रांचा मात्र उपनयन-



अनुक्रमणिका






संस्कार हिरावून घेतला गेला ! ब्राह्मणवर्गानेंच सूड-बुद्धीनें कट करून शूद्रांना सामाजिक दर्जावरून खालीं ओढण्याकरितां त्यांचा उपनयनसंस्काराधिकार काढून घेतला असावा असें म्हणणें प्राप्त आहे.

शूद्रांचा उपनयनसंस्कार हिरावून घेतल्यावर सामाजिक हीनतेचा शिक्का त्यांच्यावर बसला असल्यास नवल नाहीं. उपनयनसंस्काराभावीं शूद्रांचा धनावरील व मालमत्तेवरील अधिकारहि गेला. उपनयन नाहीं म्हणजे वेदाध्ययन नाहीं, वेदाध्ययन नाहीं म्हणजे यज्ञ करावयाचा अधिकार नाहीं, यज्ञ करावयाचा अधिकार नाहीं म्हणजे धन मिळवावयाचा वा मालमत्ता करावयाचाहि अधिकार नाहीं, अशी ही कारणपरंपरा होती. उपनयन नाहीं म्हणजे ज्ञान आणि धन मिळवावयाचाहि अधिकार नाहीं. त्यामुळें माणसांचा एक कायमचा अज्ञानी, दास्यमग्न आणि निर्धन असा वर्ग निर्माण झाला असल्यास नवल नाहीं. अशा प्रकारें शूद्रांचा उपनयन—संस्कारच बंद करून ब्राह्मणांनीं त्यांना खची करून टाकलें व त्यांच्या जविनाचें अगदीं स्मशान करून टाकलें !

ब्राह्मणांना अशा प्रकारें एकाद्याचा उपनयन-संस्कार करावयाचा हक्क नाकारण्याचें कर्तुमकर्तुम् असें सामर्थ्य होतें हें पुढें इतिहासांत दिसणाऱ्या उदाहरणांवरून सिद्ध होतें. ब्राह्मणाच्या पौरोहित्याशिवाय उपनयनसंस्कार होऊंच शकत नसे. जर ब्राह्मणांनीं एकाद्याचें उपनयन करावयाचें नाकारलें तर तो द्विजत्वाला कायमचाच मुकत असे, असें न्यायालयाच्या कांहीं निवाड्यांवरून दिसतें. प्रत्यक्ष छत्रपति शिवाजी महाराज व कोल्हापूरचे शाहू छत्रपति यांच्या उदाहरणांवरूनहि हें निर्विवादपणें सिद्ध होतें. छत्रपति शिवाजी महाराज यांचें उदाहरण या दृष्टीनें फार उद्बोधक आहे. शिवाजी महाराजांनीं स्वराज्य-संस्थापनेनंतर राज्याभिषेक करून घ्यावयाचें ठरविलें. राज्याभिषेकाचा हेतु साध्य व्हावयाचा म्हणजे तो वैदिक पद्धतीनेंच व्हावयास पाहिजे होता. तो वैदिक पद्धतीनें करावयाचा म्हणजे त्याचें पौरोहित्य करावयाला ब्राह्मणच पाहिजे होता. येवढे मोठे स्वराज्य-संस्थापक पराक्रमी छत्रपति शिवाजी महाराज, पण त्यांना देखील ही परंपरागत रूढि बाजूला सारून ब्राह्मणेतराकडून पौरोहित्य करविणें शक्य नव्हतें. ब्राह्मण पुरोहित तर त्यांना मिळेना. कारण, ब्राह्मणांच्या मताप्रमाणें शिवाजी महाराज क्षत्रिय नव्हते; कां कीं, कलियुगांत क्षत्रियांचा लोप झालेला आहे ! म्हणून शिवाजी महाराजांना वैदिक विधीनें राज्याभिषेक करून घ्यावयाचा अधिकार ब्राह्मणांच्या मतें नव्हता ! समजा जरी ते क्षत्रिय ठरते तरी ठराविक वयांत उपनयन न झाल्यामुळें ते राज्याभिषेकास पात्र ठरले नसते ! ते शूद्र असल्याकारणानें फार फार तर त्यांना पौराणिक विधीनें राज्याभिषेक होऊं शकला असता ! अशी विकट परिस्थिति होती. शिवाजी महाराजांना राज्याभिषेक करून घ्यावयासाठीं किती जंग जंग पछाडावे लागले, त्यासाठीं आपण क्षत्रिय आहों हें कसें सिद्ध करून द्यावें लागलें व गागा-भट्टांसारखा ब्राह्मण किती शर्थीनें मिळवावा लागला ! बरें, शेवटीं इतक्या यातायातीनें पण थाटांत राज्याभिषेक झाल्यावरहि विरोधी पक्षानें हा राज्याभिषेक शास्त्रसंमत नाहीं, अपशकुनी, अमंगल आहे म्हणून कशी ओरड केली, काकतालीय न्यायानें कांहीं अपघात, मृत्यु घडून आला तेव्हां शिवाजी महाराजांनीं त्या अमंगलाचें निराकरण करण्याकरितां पुनः पौराणिक विधीनें राज्याभिषेक कसा करून घेतला, इत्यादि गोष्टी इतिहासांत विश्रुत आहेत. त्या लक्षांत घेतां ब्राह्मणांना उपनयनाधिकारद्वारा निग्रहानुग्रहाचे किती अनियंत्रित अधिकार होते हें सिद्ध होईल. हा सर्वंकष अधिकार त्यांनीं शूद्रांविरुद्ध वापरल्यावर शूद्रांना समाजांत नीच स्थान आलें असल्यास त्यांत मुळींच आश्चर्य नाहीं.

ज्या शूद्र क्षत्रियांवर ब्राह्मणांनीं आग पाखडून त्यांचे उपनयनाचे अधिकार हिरावून घेतले व समाजांत त्यांना हीन स्थान देऊन त्यांचा चतुर्थ वर्ण बनविला, ते शूद्र क्षत्रिय प्रथम अल्पसंख्य होते. मागाहून हिंदुसमाजांत जो बहुसंख्य शूद्रवर्ग निर्माण झाला तो व हे मूळ शूद्र क्षत्रिय एक नव्हत. त्या विचाऱ्यांवर मात्र शूद्रक्षत्रियांप्रमाणेंच अत्यंत अपमानास्पद असें जिणें लादलें गेलें ही दुःखाची गोष्ट होय.












ग्रंथसमीक्षण*

# शूद्र व क्षत्रिय भिन्न होते

डॉ. के. ल. दप्तरी

डॉ० आंबेडकर ह्यांनीं " Who were the Shudras ? " ह्या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे आणि त्यांत त्यांनीं असा सिद्धांत स्थापन केला आहे कीं " शूद्र हे पूर्वी क्षत्रियच होते, शूद्र राजे व ब्राह्मण ह्यांमध्यें एकसारखीं भांडणें होत, त्यांत शूद्र राजांनीं ब्राह्मणांचा पुष्कळ छळ केला. त्यामुळें उलट ब्राह्मणांनींहि शूद्रांचें उपनयन करण्याचा इनकार केला. परिणामतः शूद्र अवनत होऊन सांप्रत ज्यांना सच्छूद्र किंवा स्पृश्य शूद्र म्हणतात ते झाले व त्यांचा चवथा वर्ण बनला. त्यापूर्वी तीनच वर्ण होते. " ( पृष्ठ २३९ व पृष्ठें २३५ ते २३६. ) ह्या सिध्दांताच्या सिद्धीकरितां त्यांनीं जीं प्रमाणें दिलीं आहेत त्या प्रमाणांवरून हा सिद्धान्त सिद्ध होतो किंवा नाहीं ह्याचा विचार करून खरा सिद्धान्त कोणता ठरतो ह्याचाहि विचार करण्याकरितां हा लेख लिहीत आहें.

डॉ० आंबेडकर ह्यांनीं ज्या प्रश्नाचा ऊहापोह केला आहे, तो प्रश्न ऐतिहासिक आहे हें त्यांनींच मान्य केलें आहे व इतिहास–संशोधकाच्या ठिकाणीं कोणते गुण असावे याचेंहि वर्णन त्यांनीं केलें आहे ( प्रस्तावना पृष्ठें x, xii. xiii ) व त्या गुणांनुरूप मी वागेन अशी त्यांनीं प्रतिज्ञाहि केली आहे ( प्रस्तावना पृष्ठ xiii ). हें सर्व चांगलेंच आहे आणि ह्यामुळेंच हा लेख लिहिण्याचा मला उत्साह वाटतो.

पण एका महत्त्वाच्या गोष्टीकडे डॉ० आंबेडकरांनीं द्यावें तसें लक्ष दिलेलें नाहीं. " ऋग्वेद हा धर्मग्रंथ आहे; महाभारतासारख्या इतिहास–ग्रंथांत जसें वर्णन असतें तसें ऋग्वेदांत असूं शकत नाहीं. " असें स्वमतावरील आक्षेपाचें खंडन करतांना ते म्हणतात ( पृष्ठ २४१ ); पण त्याचा परिणाम काय होईल ह्याचा मात्र त्यांनीं विचार केला नाहीं. इतिहास–ग्रंथ व धर्मग्रंथ ह्यांमध्यें जर भेद आहे तर त्याचा परिणाम काय ? आपणांपुढील प्रश्न समाज–व्यवस्थेच्या इतिहासाचा आहे. समाज–व्यवस्थेचे किंवा इतिहासाचेच ग्रंथ त्या प्रश्नाविषयीं प्रमाण होत. ज्या ग्रंथाचा जो विषय असतो, त्या विषयाबाबतच त्या ग्रंथाचें प्रामाण्य असतें हें मान्य केलें तर स्वसिद्धान्तस्थापनार्थ डॉक्टरांनीं ऋग्वेद व ब्राह्मणें ह्या धर्मग्रंथांतील वचनांचा उपयोग कां केला हा प्रश्न उपस्थित होतो. इतिहासाचे व समाजव्यवस्थेचे ग्रंथ डॉक्टरांना सांपडलेच नाहींत काय ? ऋग्वेदासारख्या धर्मग्रंथांतूनच इतिहास काढण्याची पाश्चात्य पंडितांची अन्याय्य पद्धतीच डॉक्टरसाहेबांनीं कां स्वीकारली ?

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि ब्राह्मणें ह्यांचा विषय यज्ञ व यज्ञांत म्हणावयाच्या देवांच्या प्रार्थना हा होय. ह्यामुळें ह्या ग्रंथांतील भाषा काव्यांतील भाषेसारखी अलंकारिक असते, कल्पनाप्रचुर असते आणि तींत भरमसाट स्तुतिहि असते. म्हणून त्या भाषेंतून इतिहास काढणें अन्याय्य आहे, हें न्यायप्रिय डॉक्टरांनीं लक्षांत घ्यावयास पाहिजे होतें. अशा धर्मग्रंथांत ऐतिहासिक गोष्टींचा केवळ अस्पष्ट असा निर्देश असेल तो घेऊन त्यावरून कोणताहि सिद्धांत ठरविणें धोक्याचें होय. अशा धर्मग्रंथांत

* ' Who were the Shudras ? ' by Dr. B. R. Ambedkar, Thacker & Co, Pages 259.








भरमसाट स्तुतिहि असते असें जैमिनीय धर्मसूत्रें १. २. १ ते ३० ह्यांत उत्तम रीतीनें सिद्ध केलेलें आहे. त्या स्तुतीवरुनहि इतिहास काढणें धोक्याचेंच होय.

परंतु १४७ व्या पृष्ठावर डॉक्टर म्हणतात, "ऋग्वेदांतील पुरुषसूक्त व ब्राह्मणग्रंथ ह्यांमध्यें जो विरोध आहे (?) त्या विरोधाचा निर्णय मीमांसेच्या नियमांनीं करतां येत नाहीं, ऐतिहासिक परीक्षणाच्या नियमांनींच केला पाहिजे." ऋग्वेद आणि ब्राह्मणें धर्मग्रंथ आहेत हे डॉक्टरांना मान्यच आहे. मग अशा धर्मग्रंथांना ऐतिहासिक परीक्षणाचे नियम लावणें ही जबरदस्ती ठरते हें डॉक्टरांच्या कसें लक्षांत आलें नाहीं ? त्यांनीं इकडे लक्ष द्यावयास नको होतें काय ?

कोणत्याहि सिद्धांताला पशु मानलें तर त्याला स्थिरपणें उभें राहण्यास चार पाय पाहिजेत; पण डॉक्टरांच्या "मूळ वर्ण तीनच होते" या सिद्धांतास तीनच पाय आहेतः एक पुरुषसूक्त, दुसरा शतपथ ब्राह्मणांतील वचन आणि तिसरा तैत्तिरीय-ब्राह्मणांतील वचन (पृष्ठ १४७). आणि हे तीन पायहि लंगडेच आहेत. कारण, (१) हीं वचनें ऐतिहासिक ग्रंथांतील नसून धर्म-ग्रंथांतील आहेत, (२) पहिलें वचन तर डॉक्टरांच्या ह्या सिद्धांताविरुद्धच आहे हें त्यांनाहि मान्यच आहे, (३) आणि दुसरीं दोन वचनें त्यांचा सिद्धांत सिद्ध करूं शकत नाहींत. ह्या कारणांचें स्पष्टीकरण करतों.

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि त्यांचीं ब्राह्मणें ह्या धर्मग्रंथांचा हेतु इतिहास सांगणें हा नसून त्यांचे हेतू देवतांची स्तुति करणें, यज्ञविधि सांगणें आणि त्या यज्ञविधींची स्तुति करणें हे आहेत. इतिहास-ग्रंथांत जें सांगितलें असेल त्याच्याविरुद्ध जर ह्या धर्म-ग्रंथांत कांहीं सांगितलें असेल तर तें ऐतिहासिक सिद्धांत ठरविण्यास प्रमाणभूत होऊं शकत नाहीं. तें यज्ञविधीची किंवा देवतांची स्तुति करण्याकरितां केलेलें कांहीं तरी भरमसाट विधान आहे असेंच मानणें भाग आहे. असा इतिहास-ग्रंथ कोणता व त्यांतील वचन कोणतें असा प्रश्न आम्हांस केला जाईलच. त्याचें उत्तर असें:—

महाभारत, रामायण, किंवा कल्हणाची राजतरंगिणी, ह्यांप्रमाणेंच वायु-पुराण आणि ब्रह्मांड-पुराण हे दोन ऐतिहासिक ग्रंथ आहेत, हें त्या ग्रंथांतीलच "इमं यो ब्राह्मणो विद्वान् इतिहासं पुरातनम् । शृणुयाच्छ्रावयेद्वापि तथाध्यापयतेऽपि च ॥ स्थानेषु स महेन्द्रस्य मोदते शाश्वतीः समाः ॥ वायुपुराण, अध्याय १०३. ॥ ४९ ॥ इतिहासमिमं श्रुत्वा धर्माय दधते मतिम् ॥ ५६ ॥–ब्रह्मांडपुराण, पाद ४, अध्याय ४

ह्या वचनांवरुन सिद्ध होतें. कारण ह्या वचनांत ते ग्रंथच स्वतःस इतिहास म्हणवितात. शिवाय, त्या ग्रंथांमध्यें वर्ण, मनु, सप्तर्षि व राजवंश यांचा इतिहास सांगितलेलाहि प्रत्यक्ष दिसतोच. महाभारत, महाभारतांतर्गत हरिवंश, विष्णु-पुराण, मार्कंडेय-पुराण वगैरेंचा उपयोग डॉक्टरांनींहि केलेलाच आहे. ह्यावरुन ऐतिहासिक ग्रंथांचें प्रामाण्य त्यांनाहि मान्यच आहे असें ठरतें. वायुपुराणांत वर्णांचा इतिहास ज्या वचनांत दिला आहे तीं अशीं:—

ब्रह्मा स्वयंभूर्भगवान् दृष्ट्वा सिद्धिं तु कर्मजाम् ।
मर्यादां स्थापयामास यथारब्धन् परस्परम् ॥ १६१ ॥
ये वै परिग्रहीतारस्तेषामासन् बलात्मकाः ॥
इतरेषां कृतत्राणाः स्थापयामास क्षत्रियान् ॥१६२॥
उपतिष्ठन्ति ये तान्वै यावन्तो निर्भयास्तथा ॥
सत्यं ब्रह्म यथाभूतं ब्रुवन्तो ब्राह्मणाश्च ते ॥१६३॥
ये चान्येप्यबलास्तेषां वैशसं कर्म संस्थिताः ॥
कीनाशं नाशयन्ति स्म पृथिव्यां प्रागतन्द्रिताः॥१६४॥
वैश्यानेव तु तानाहुः कीनाशान् वृत्तिसाधकान् ॥
शोचन्तश्च द्रवन्तश्च परिचर्यासु ये रताः ॥ १६५ ॥
निस्तेजसोऽल्पवीर्याश्च शूद्रांस्तानब्रवीत्तु सः ॥
तेषां कर्माणि धर्मांश्च ब्रह्मा तु व्यदधात् प्रभुः ॥१६६॥
क्षत्रियाणां बलं दण्डं युद्धमाजीवमादिशत् ॥
याजनाध्यापनं चैव तृतीयं च प्रतिग्रहम् ॥ १६९ ॥
ब्राह्मणानां विभुस्तेषां कर्माण्यतान्यथा दिशत् ॥
पाशुपाल्यं वाणिज्यं च कृषिं चैव विशां ददौ ॥१७०॥
शिल्पाजीवं भृतिं चैव शूद्राणां व्यदधात्प्रभुः ॥
सामान्यानि तु कर्माणि ब्रह्मक्षत्रविशां पुनः ॥१७१॥








यजनाध्ययनं दानं सामान्यानि तु तेषु वै ॥ १७२ ॥

—वायुपुराण, अ. ८, ब्रह्माण्ड पुराण, पाद २, अ. ७.

अर्थः– जो स्वतःच ब्रह्मा झाला ( स्वयंभू ), म्हणजे जो शिवाजीप्रमाणें स्वतः स्थापलेल्या राज्याचा सर्वांत श्रेष्ठ अधिकारी झाला, त्या ब्रह्म्यानें कर्मज म्हणजे कर्मविभागजनित सिद्धि पाहून ज्या मर्यादेमुळें प्रजा परस्परांचें रक्षण करूं लागल्या अशी मर्यादा स्थापन केली ॥ १६१ ॥

इतरांना पकडणारे व त्यांचा वध करून इतरांचें रक्षण करणारे जे होते त्यांना त्यानें क्षत्रिय म्हणून स्थापन केलें. त्या क्षत्रियांना न भितां त्यांच्याजवळ राहून सत्य–ब्रह्म ( म्हणजेच आजच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास कायदा ) जसें असेल तसें सांगणारे जेवढे होते तेवढ्यांना ब्राह्मण म्हणून त्यानें स्थापिलें ॥ १६३ ॥ त्यांपैकीं जे आळस टाकून कष्ट करणारे व ह्या रीतीनें क्षुधारूपी मृत्यूचा नाश करणारे परंतु दुर्बल होते, त्या कृषिकर्म करणाऱ्या लोकांना त्यानें वैश्य म्हटलें. त्यांपैकीं जे रडके, पळपुटे, अल्पवीर्य, निस्तेज आणि सेवा करण्यांतच आनंद मानणारे ( परिचर्यासु रताः ) म्हणजेच सांगकामे होते, त्यांना त्यानें शूद्र म्हटलें. त्या वर्णांचीं कर्में आणि धर्म हीं ब्रह्म्यानें ठरविलीं ॥ १६६ ॥ त्यानें सैन्य ठेवणें, दंड करणें व युद्ध करणें हीं क्षत्रियांचीं उपजीविकेचीं साधनें सांगितलीं. यज्ञ करविणें, शिकविणें आणि दान घेणें हीं ब्राह्मणांचीं कर्तव्यें त्या सत्ताधिकाऱ्यानें ( विभुः ) सांगितलीं. पशू पाळणें, वाणिज्य आणि शेती हीं कर्में त्यानें वैश्यांना दिलीं ॥ १६९, १७० ॥ आणि शूद्रांना त्या प्रभूनें शिल्पांनीं जीविका किंवा परिचर्येबद्दल मिळणारें वेतन ( भृति ) हीं सांगितलीं. ह्यांशिवाय ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या सर्वांना सामान्य कर्में यज्ञ करणें, शिकणें आणि दान करणें हीं सांगितलीं ॥१७१, १७२॥

ही हकीकत केव्हां व कोठें घडली व हा ब्रह्मा कोण हें सर्व मी "The Astronomical Method and its Application to the Chronology of Ancient India" ह्या ग्रंथांत परिच्छेद ३५५ ते ३६१ ह्यांत दाखविलें आहे. त्यावरून दिसून येईल कीं अंबाला जिल्ह्यांत खिस्तपूर्व ३१०२ ह्या वर्षीं आनंद नांवाच्या ब्रह्म्यानें ही वर्णव्यवस्था केली. हींत डॉक्टरसाहेबांना जेथें तेथें दिसणारा ब्राह्मणांनीं केलेला शूद्रांचा किंवा इतरांचा छळ तर कोठेंच दिसत नाहीं, उलट समाजशास्त्रवेत्त्यानें, समाजहितार्थ बुद्धिपुरःसर केलेली व्यवस्थाच फक्त दिसते. अशा व्यवस्थेंत क्षत्रिय आणि शूद्र ह्या दोनहि वर्णांची आवश्यकता उघडच आहे. कारण, समाजाचें आपल्या शौर्यानें रक्षण करणारे आवश्यकच आहेत. आणि रडके, पळपुटे, सांगकाम्ये, अल्पवीर्य आणि निस्तेज लोक समाजांत पुष्कळच असतात; त्यांचा एक निराळा वर्ग बनवून त्यांना जुळेल असें शिल्प किंवा हें कर्तव्य त्यांना सांगणें जरूरच आहे. शतपथ ब्राह्मणांतील ( १४। ४।२।२३ ) म्हणजेच बृहदारण्यकोपनिषदांतील एक उतारा ( पृष्ठ २६ पाहा ) डॉक्टरांनीं दिला आहे. त्यांतहि ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तीनहि वर्ण उत्पन्न केले तरी समाजास वैभव प्राप्त होईना म्हणून शूद्र वर्णहि उत्पन्न केला असें वर्णन आहे. ह्यावरूनहि दिसेल कीं वर्ण–विभाग करतांना शूद्र वर्ण उत्पन्न करणें आवश्यकच आहे. अर्थात् वर्णव्यवस्था जेव्हां झाली तेव्हांच क्षत्रिय आणि शूद्र हे वर्ण अलग केले गेले असले पाहिजेत. ब्राह्मण आणि वैश्य हे वर्णहि आवश्यकच आहेत. कारण, वैश्य जीवनोपयोगी वस्तु पुरवितो तर ब्राह्मण समाज–व्यवस्थेस आवश्यक असा कायदा क्षत्रियांस न भितां सांगतो. एकूण वर्णव्यवस्था झाली तेव्हांच शूद्र वगैरे चार वर्ण झाले असले पाहिजेत. ह्यावरून दिसेल कीं वायुपुराणांतील वरील हकीकतींत असंभवनीय आणि अविश्वसनीय असें कांहींच नाहीं. सर्व पूर्णपणें सत्य आहे. ह्या ऐतिहासिक सत्य हकीकतीच्या दृष्टीनें डॉक्टरसाहेबांनीं पुढें केलेल्या तीन वचनांकडे पाहिल्यास काय दिसतें ? पहिलें पुरुषसूक्तामधील वचन हें त्या सत्य ऐतिहासिक हकीकतीच्या आधारानें रचलेलें केवळ काव्य आहे; त्यावरून कोणताहि सिद्धांत काढतां येत नाहीं. डॉक्टरसाहेब कायदेपंडित आहेत. त्यांना माहीतच आहे कीं पुराव्याच्या कायद्यांत प्रत्यक्ष पुरावा आणि अप्रत्यक्ष पुरावा असे दोन प्रकार आहेत. आणि दोनहि प्रकारचे पुरावे, जर कोणत्याहि गोष्टी विषयीं उपलब्ध झाले तर अप्रत्यक्ष

पुरावा त्याज्य ठरतो. वायुपुराण हा प्रत्यक्ष पुरावा असून पुरुषसूक्त हा अप्रत्यक्ष पुरावा आहे; म्हणून तो सर्वांशीं त्याज्य आहे आणि त्यावरून काढलेलें शूद्र–द्वेपाचें अनुमान अगदींच चूक आहे. कारण, वर्णांविपयींचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे वायुपुराणांतील वचन; पण त्यांत हा द्वेप कोठेंच दिसत नाहीं. निस्तेज मनुष्यास हलकें काम सांगणें हा द्वेष ठरूंच शकत नाहीं. तें कसेंहि असो, पुरुषसूक्तावरून प्रथमतः वर्ण तीनच होते हें ठरतच नाहीं; कारण, त्यांत चार वर्ण स्पष्टच सांगितले आहेत.

आतां ब्राह्मणांतील वचनांचा विचार करूं. ब्रह्मदेवानें जेव्हां प्रथमतः वर्णविभाग केला, तेव्हां त्यानें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीन वर्णांनाच यज्ञ, अध्ययन आणि दान हीं तीन कर्तव्यें सांगितलीं, हें वरील वायुपुराणांतील वचन स्पष्टच सांगतें. शूद्रांना हीं तीन कर्तव्यें सांगितलीं नाहींत. शूद्र अल्पवीर्य असल्यामुळें त्यांना तीं कर्तव्यें झेंपणार नाहींत म्हणून तीं त्यांना सांगितलीं नाहींत हें उघड आहे. तीं कर्तव्यें त्यांना सांगितलीं असतीं तरी शूद्रांवर जुलूम केला असें डॉक्टरांनीं म्हटलें असतें. असो. यज्ञ हें शूद्राचें कर्म नव्हे आणि ब्राह्मणग्रंथ तर यज्ञविधि सांगण्याकरितांच लिहिले गेले. अर्थात् यज्ञविधि सांगतांना किंवा त्या विधीचीं स्तुति करतांना शूद्र गळणें साहजिकच आहे. अशा ठिकाणीं शूद्र गळल्यानें चार वर्ण पूर्वी नव्हतेच हें कसें सिद्ध होईल ? **तीनच** वर्ण होते असें तीं वचनें स्पष्ट म्हणत नाहींत, फक्त तीन वर्णांचा निर्देश करतात. चवथा नव्हताच असें म्हणत नाहींत. हें स्पष्टपणें दाखविण्याकरितां तीं संपूर्ण वचनें अर्थासह देतों व त्यांचें परीक्षण करतों.

" ऋग्भ्यो जातां सर्वशो मूर्तिमाहुः सर्वा गतिर्याजुषी हैव शश्वत् । सर्वं तेजः सामरूपं हि शश्वत् सर्वं हेदं ब्रह्मणा हैव सृष्टम् ॥ ऋग्भ्यो जातं वैश्यं वर्णमाहुः यजुर्वेदं क्षत्रियस्याहुः योनिम् । सामवेदो ब्राह्मणानां प्रसूतिः, पूर्वे पूर्वेभ्यो वच एतदूचुः ॥

अर्थः—सर्व प्रकारची मूर्ति म्हणजे सर्व प्रकारचे आकार ऋग्वेदापासून झाले असें म्हणतात. सर्व प्रकारची गति नेहमीं यजुर्वेदापासून उत्पन्न होते. सर्व प्रकारचें तेज नेहमीं सामवेदरूपच असतें. हें सर्व म्हणजे मूर्ति, गति व तेज ( डॉक्टरसाहेबांनीं " सर्वं हेदं " ह्याच्या मागील वाक्यें दिलींच नाहींत आणि " सर्वं हेदं " ह्याचें भाषांतर ' This entire Universe' म्हणजे ' हें सर्व जग' असें चुकीचें केलें आहे व त्यायोगें " सर्वं हेदं " म्हणजे पुढील ओळींत उल्लेखिलेलें असा आभास त्यांनीं उत्पन्न केला आहे व त्यावरून ब्रह्मानें तीनच वर्ण उत्पन्न केले असा अर्थ ते काढतात. परंतु मागच्या वाक्यांचा विचार केल्यास हें भाषांतरच चूक ठरतें. अर्थात् त्यावरून काढलेला सिद्धांतहि उघड उघड चूकच आहे ) ब्रह्मानेंच उत्पन्न केलें ॥ वैश्य वर्ण ऋग्वेदापासून झाला असें म्हणतात. यजुर्वेद हा क्षत्रियवर्णाचें उत्पत्तिस्थान होय असें म्हणतात. ब्राम्हणांची उत्पत्ति सामवेदापासून झाली. हें वचन पूर्वीचे लोक पूर्वीच्या लोकांस सांगत आले ॥ ह्या वचनांत सांगितल्याप्रमाणें खरोखरच तेज गति व मूर्ति आणि ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य अनुक्रमें साम, यजुस् व ऋग्वेद यांपासून उत्पन्न झाले असें डॉक्टरसाहेब मानतात काय ? ते तसें खरोखरच मानीत असतील तर मग त्यांच्याशीं पुढें कांहीं बोलण्याची गरजच नाहीं; ते तसें मानीत नसतील तर वेदांची स्तुति करण्याकरितांच हीं भरमसाट विधानें केलीं आहेत हें त्यांना मान्य करावें लागेल. स्तुति करावयाचे वेद तीनच असल्यामुळें तीनच वर्णांचा निर्देश केला; अर्थात्च ह्या निर्देशावरून चवथा वर्ण नव्हताच असें कसें सिद्ध होऊं शकेल ?

शतपथ ब्राह्मणांतील वचनाचेंहि असेंच आहे. तेथील संपूर्ण वचन असें आहेः— " तदाहुः । यन्नर्चा न साम्ना न यजुषाऽग्निराधीयतेऽथ केनाधीयत इति ब्रह्मणो हैवैष ब्रह्मणाऽऽधीयते वाग्वै ब्रह्म तस्यै वाचः सत्यमेव ब्रह्म ता वा एता सत्यमेव व्याहृतयो भवन्ति तदस्य सत्येनैवाऽऽधीयते ॥ १० ॥ भूरिति वै प्रजापतिः । इमामजनयत् । भुव इत्यन्तरीक्षं स्वरिति दिवमेतावद्वा इदं सर्वं यावदिमे लोकाः सर्वेणैवाधीयते ॥ ११ ॥ भूरिति वै प्रजापतिः ब्रम्हाजनयत्, भुव इति क्षत्रं, स्वरिति विशमेतावद्वा इदं सर्वं यावद् ब्रह्म क्षत्रं विट्सर्वेणैवाधीयते ॥ १२ ॥

भूरिति वै प्रजापतिः आत्मानमजनयत, भुव इति प्रजाः, स्वरिति पशूनेतावद्वा इदं सर्वं यावदात्मा प्रजाः पशवः सर्वेणैवाधीयते ॥ १३ ॥

अर्थः— त्याविषयीं कोणी विचारतात, "जर ऋचा, साम, किंवा यजुस् म्हणून अग्नीचें आधान करावयाचें नाहीं तर मग काय म्हणून अग्नीचें आधान करावें?" या प्रश्नाचें उत्तर असें:— हा अग्नि ब्रह्माचाच आहे. ब्रह्मानेंच ह्याचें आधान करावें. वाणी ही ब्रह्मच आहे. त्या वाणीचें सत्य म्हणजे सत्त्व अथवा सार हेंहि ब्रह्मच. त्या ह्या व्याहृती म्हणजे भूः, भुवः व स्वः ह्या वाणीचें सत्त्वच होत म्हणून ह्या ब्रह्माच्या सत्त्वानें म्हणजेच व्याहृती म्हणून अग्नीचें आधान करावें. ॥ १० ॥ प्रजापतीनें 'भूः' असें म्हणून ही पृथ्वी उत्पन्न केली, 'भुवः' असें म्हणून अंतरिक्ष उत्पन्न केलें आणि 'स्वः' असें म्हणून दिव् उत्पन्न केलें. हे जेवढे तीन लोक आहेत तेवढेंच हें सर्व आहे. म्हणून सर्व अशा ह्या व्याहृती म्हणून अग्नीचें आधान करावें. ॥ ११ ॥ प्रजापतीनें 'भूः' असें म्हणून ब्राह्मण वर्ण उत्पन्न केला, 'भुवः' म्हणून क्षत्रिय वर्ण उत्पन्न केला. व 'स्वः' असें म्हणून वैश्य वर्ण उत्पन्न केला. हे जेवढे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वर्ण आहेत तेवढेंच हें सर्व म्हणून सर्व अशा ह्या व्याहृती म्हणून अग्नीचें आधान करावें. ॥ १२ ॥ प्रजापतीनें 'भूः' असें म्हणून स्वतःस उत्पन्न केलें, 'भुवः' असें म्हणून प्रजा उत्पन्न केल्या आणि 'स्वः' असें म्हणून पशू उत्पन्न केले. हे जेवढे आत्मा म्हणजे राजा, प्रजा व पशू आहेत तेवढेंच हें सर्व आहे. म्हणून सर्व अशा ह्या व्याहृती म्हणून अग्नीचें आधान करावें. ॥ १३ ॥

येथें प्रथमतः दहाव्या वाक्यांत "भूः भुवः स्वः" ह्या व्याहृती म्हणून (म्हणजे उच्चारून) अग्नीचें आधान करावें) म्हणजे अग्नीची स्थापना करावी असा विधि आहे. ह्या व्याहृतींची व ह्या विधीची स्तुति करण्याकरितां पुढील वाक्यें लिहिलीं आहेत हें उघड आहे. ह्या स्तुतीवरून ऐतिहासिक सिद्धांत काढणें अन्याय्य आहे. तथापि डॉक्टरसाहेब "हे जेवढे ब्राह्मण व वैश्य वर्ण आहेत तेवढेंच हें सर्व आहे," ह्या वाक्यानें, हुरळून गेले आणि ब्राम्हण, क्षत्रिय व वैश्य येवढेच सर्व वर्ण होते असा अर्थ त्यांनीं काढला; पण ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य येवढेच सर्व यज्ञ करणारे वर्ण आहेत असाहि अर्थ निघूं शकतो असा विचार त्यांना सुचला नाहीं; पण हाच खरा अर्थ आहे; कारण, ब्राह्मण–ग्रंथांचा विषय यज्ञच आहे; म्हणून यज्ञ हें ज्यांचें कर्तव्य नाहीं असा शूद्र वर्ण ब्राम्हण–ग्रंथांच्या दृष्टीनें जणूं अस्तित्वांतच नाहीं. हीच गोष्ट तैत्तिरीय ब्राह्मणांतील वचनास लागू आहे. येथील "सर्वं हेदं" हें पुढील ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्यांविषयींच आहे असें मानलें तरी त्याचा खरा अर्थ "यज्ञ करणारा हा सर्व समाज" असाच करावा लागेल. एकूण वायुपुराणांत सांगितल्याप्रमाणें वर्ण प्रथमतः उत्पन्न झाले तेव्हांच ते शूद्रांसह चार होते असें मानले तरी त्याशीं तैत्तिरीय व शतपथ ब्राह्मणांतील वचनें विसंगत नाहींत; कारण, वायुपुराणांत सांगितल्याप्रमाणें यज्ञ करणें हें ब्राह्मण–क्षत्रिय–वैश्यांचेंच कर्तव्य होतें, शूद्रांचें नव्हतें; म्हणून यज्ञ करणारा समाज तीनच वर्णांचा बनला होता व त्याच समाजाचा ह्या ब्राह्मण–वचनांत निर्देश आहे असें मानतां येतें; म्हणून चवथा वर्ण प्रथमतः नव्हताच असें मानणें अपरिहार्य ठरत नाहीं.

येथपर्यंत वर्ण 'प्रथमतः उत्पन्न झाले तेव्हांहि ते तीनच नसून चार होते' असें सिद्ध केलें. ते चार वर्ण म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हेंहि सिद्ध झालेंच आहे. ह्या सिद्धान्तानें "शूद्र हे मूळचे क्षत्रियच होत" हा डॉक्टरांचा सिद्धान्त ढांसळूनच पडतो. तथापि सुदास् नांवाच्या क्षत्रिय राजाला महाभारतांत शूद्र म्हटलें आहे हा जो पुरावा डॉक्टरांनीं पुढें केला आहे त्याचा विचार आतां करूं या. महाभारतांतील संपूर्ण उतारा अनवश्यक भाग गाळून पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

शूद्रस्यापि हि यो धर्मस्तं ते वक्ष्यामि भारत ॥२७॥
प्रजापतिर्हि वर्णानां दासं शूद्रमकल्पयत् ।

तस्मात् शूद्रस्य वर्णानां परिचर्या विधीयते ॥ २८ ॥
शूद्र एतान् परिचरेत् त्रीन् वर्णाननुपूर्वशः ॥२९॥

संचयांश्च न कुर्वीत जातु शूद्रः कथंचन ॥ ३० ॥
राज्ञा वा समनुज्ञातः कामं कुर्वीत धार्मिकः ३१ (पूर्वार्ध)



अनुक्रमणिका






य च कंचिद्द्विजातीनां शूद्रः शुश्रूषुराव्रजेत् ॥ ३४ ॥
कल्प्या तेन तु ते प्राहुर्वृत्तिर्धर्मविदो जनाः
देयः पिण्डोऽनपत्याय भर्तव्यौ वृद्धदुर्बलौ ॥ ३५ ॥
शूद्रेण तु न हातव्यो भर्ता कस्यांचिदापदि ।
अतिरेकेण भर्तव्यो भर्ता द्रव्यपरिक्षये ॥ ३६ ॥
न हि स्वमस्ति शूद्रस्य भर्तृहार्यधनो हि सः ।
उक्तस्त्रयाणां वर्णानां यज्ञस्तस्य च भारत ।
स्वाहाकारवषट्कारौ मन्त्रः शूद्रे न विद्यते ॥ ३७ ॥
तस्माच्छूद्रः पाकयज्ञैः यजेताव्रतवान् स्वयम् ।
पूर्णपात्रमयीमाहुः पाकयज्ञस्य दक्षिणाम् ॥ ३८ ॥
शूद्रः पैजवनो नाम सहस्राणां शतं ददौ ।
ऐन्द्राग्नेन विधानेन दक्षिणामिति नः श्रुतम् ॥ ३९ ॥
यतो हि सर्ववर्णानां यज्ञस्तस्यैव भारत ॥ ४० ॥

——शांतिपर्व, अध्याय ६० ( मुंबई–प्रत ).

अर्थः—हें युधिष्ठिरा, मी आतां तुला शूद्रांचे धर्म सांगतों. प्रजापतीनें ( म्हणजे वायुपुराणांतल्या मागील वचनांत ज्याला स्वयंभू ब्रह्मा म्हटलें आहे त्यानें ) इतर वर्णांचा दास म्हणून शूद्राला कल्पिलें म्हणजे स्थापन केलें. म्हणून शूद्राला इतर वर्णांची ( बहुवचनावरून हे वर्ण निदान तीन तरी असलेच पाहिजेत ) सेवा हें कर्तव्य सांगितलें आहे. ॥ २८ ॥ ह्या तीन वर्णांची सेवा शूद्रानें आनुपूर्वीनें करावी म्हणजे शक्य असल्यास ब्राह्मणाची, ती शक्य नसल्यास क्षत्रियाची व तीहि शक्य नसल्यास वैश्याची सेवा शूद्रानें करावी ॥ २९ ॥ शूद्रानें धनसंचय करूं नये; परंतु धर्मनिष्ठ शूद्रानें इच्छा झाल्यास राजाच्या परवानगीनें धनसंचय करावा. ॥ ३१ ॥ द्विजातींपैकीं म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्यांपैकीं कोणाहि व्यक्तीकडे जर शूद्र सेवा करण्याकरितां आला तर त्या व्यक्तीनें त्याच्या उपजीविकेची व्यवस्था करावी असें धर्मवेत्ते लोक म्हणतात. त्या शूद्राला अपत्य नसेल तर त्याला पिंड म्हणजे खाण्यास अन्न द्यावें. तो शूद्र वृद्ध किंवा दुर्बल झाला तरी त्याचें पोषण करावें. ॥३५॥ उलट शूद्रानें देखील केव्हांहि आपत्ति आली तरी आपल्या धन्याचा त्याग करूं नये. शूद्रानें आपल्या धन्याचें धन क्षीण झालें असतां, आपल्या कुटुंबाचें पोषण करून जें शिल्लक राहील ( अतिरेकेण ) त्यानें आपल्या धन्याचें पोषण करावें. कारण, शूद्रानें मिळविलेलें धन त्याचें स्वतःचें होत नाहीं, तें घेण्याचा त्याच्या धन्यास अधिकार आहे. तीन वर्णांना म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्यांना यज्ञ कर्तव्य म्हणून सांगितला आहे. शूद्रालाहि यज्ञ कर्तव्य म्हणून सांगितला आहेच; परंतु शूद्राच्या यज्ञांत स्वाहा व वषट् हे शब्द आणि मंत्र नसतात. ॥३७॥ म्हणून शूद्रानें वेदांत सांगितलेलीं व्रतें न केलीं तरी पाकयज्ञ करावेच. पाकयज्ञांची दाक्षिणा पूर्णपात्र नांवाच्या मापानें मोजून द्यावी असें म्हणतात. ॥३८॥ आम्हीं असें ऐकलें आहे कीं पैजवन नांवाच्या शूद्रानें पाकयज्ञापेक्षां उच्च प्रकारच्या इंद्राग्नि–देवतांच्या पशु–यज्ञांतील विधानाप्रमाणें हजार पूर्ण—पात्रें दक्षिणा दिली. कारण सर्व वर्णांचा जो यज्ञ आहे तो शूद्रासहि करितां येतोच. ॥४०॥

ह्या वचनांत प्रथमतःच अगदीं स्पष्ट सांगितलें आहे कीं, प्रजापतीनें म्हणजेच ज्याला वायुपुराणांत स्वयम्भू ब्रह्मा म्हटलें आहे त्यानें वर्णांचें–अर्थातच ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीन वर्णांचें दास्य करण्याकरितां शूद्रवर्णाची स्थापना केली. अर्थात् पुढील "**शूद्रः पैजवनो नाम**" ह्यांतील '**शूद्र**' **ह्या शब्दाचा अर्थ क्षत्रियाहून भिन्न असलेल्या शूद्र वर्णांतील एक व्यक्ति असाच असला पाहिजे. 'शूद्रांनीं मंत्राशिवायच यज्ञ करावे' ह्या विधानाचें उदाहरण म्हणून पैजवनाचें नांव सांगितलें आहे. ह्यावरूनहि तो क्षत्रिय–भिन्न शूद्रवर्णांतील एक व्यक्ति असला पाहिजे असेंच ठरतें.** पृष्ठ १३९वर ज्याचें चरित्र डॉक्टरांनीं सांगितलें तो पैजवन सुदास् क्षत्रिय राजा ह्या महाभारतोक्त पैजवन शूद्राहून भिन्न असला पाहिजे, हेंच 'प्रथमतःच चार वर्ण उत्पन्न केले गेले' ह्यावरून सिद्ध होतें. क्षत्रियाचें व शूद्राचें एकच नांव असूं शकत नाहीं असें नाहीं आणि महाभारतोक्त पैजवनाची हकीकत वेदांमध्यें कोठें तरी सांपडलीच पाहिजे असेंहि नाहीं. पैजवन नांवाचा शूद्र, हें महाभारतांतील वचन लिहिलें गेलें त्याच्या आधीं पुष्कळ वर्षांपूर्वी होऊन गेला असेल. पुष्कळ वर्षांपूर्वी म्हणजे ऋग्वेदकालींच असाहि अर्थ करण्याची गरज नाहीं. एकूण सुदास् हा क्षत्रिय राजा










शूद्र होता हा सिद्धांत महाभारतावरून सिद्ध होत नाहीं आणि डॉक्टरांनीं ह्याविषयीं दुसरा पुरावाहि दिलेला नाहीं. अर्थातच ह्या सिद्धांतावर उभारलेली डॉक्टरांची भव्य इमारत पूर्णपणें ढांसळून पडते. येथें 'शूद्र मूळचे कोण ?' असा प्रश्न आम्हांस विचारला जाईल त्याचें उत्तर मागील प्रतिपादनावरून सुज्ञांस कळून चुकलेंच असेल. तरी तें पुनः स्पष्टपणें सांगतों. आनंद ब्रह्मदेवानें जेव्हां वर्णव्यवस्था केली तेव्हां त्याला जे अल्पवीर्य व निस्तेज वाटले तेच मूळचे शूद्र. त्यांतलि कांहीं आर्यांपैकींच असतील, कांहीं आर्येतरांपैकींहि असतील. त्यांत पुढें वेळोवेळीं किंवा मन्वंतराच्या वेळीं भरती झाली असावी किंवा घटहि झाली असावी. आर्य हे हिंदुस्थानाबाहेरून आले असतील किंवा मूळचे हिंदुस्थानचेच रहिवासी असतील. आर्य व आर्येतर असा विभागहि कदाचित् नसेल. ह्या दृष्टीनें डॉक्टरसाहेबांचें ४, ५ व ६ या प्रकरणांतील प्रतिपादन निरर्थक आहे हें उघड आहे.

आतां यापुढें जास्त कांहीं लिहिण्याची वास्तविक पाहतां गरजच नाहीं. परंतु डॉक्टरांच्या ग्रंथांतील पुष्कळसा भाग ब्राह्मणांनीं शूद्रांचा द्वेष वा छळ केला हें दाखविण्याकडेच लागलेला आहे (पृष्ठ २३९ (५), ५४,५५); म्हणून त्याविषयींहि थोडें लिहिणें भाग आहे.

आनंद ब्रह्मदेवानें फार प्राचीन काळीं चार वर्णांची स्थापना केली. त्यानंतरच ब्राह्मण अस्तित्वांत आले. ह्या वर्णव्यवस्थेंत ब्राह्मणांकडे कांहीं कर्तव्यें आलीं व तीं त्यांना चोख बजावतां यावीं म्हणून त्यांना कांहीं हक्कहि देण्यांत आले. ब्राह्मणांनीं "शिकविणें व यज्ञ करविणें" हाच उद्योग करावा आणि राजाला न भितां सत्य दिसेल तो कायदा सांगावा. इतर उद्योग ब्राह्मणांनीं करूं नये. हीं ब्राह्मणाचीं कर्तव्यें त्यांना नीट करतां यावीं म्हणून दान घेणें, राजानें त्यांजपासून कर न घेणें आणि त्यांना देहदंड न करणें हे हक्क त्यांना दिले गेले. ह्या हक्कांकरितां ब्राह्मण क्षत्रियांशीं झगडले आणि इतर लोकांनीं ब्राह्मणांचा पक्ष खरा असल्यामुळें ब्राह्मणांस साथ दिली म्हणून ब्राह्मण यशस्वी झाले. त्यांत ब्राह्मणांचा अपराध कोणता ? डॉक्टरांनीं ब्राह्मण-शूद्रांचा म्हणून जो झगडा नवव्या प्रकरणांत वर्णिला आहे तो वास्तविक पाहतां ब्राह्मणक्षत्रियांमधला हा झगडा होय हें आतां सुज्ञांच्या ध्यानीं सहजच येईल.

शूद्रवर्ण अल्पवीर्य, म्हणून त्याचें कर्तव्य सेवा किंवा शिल्प असें ब्रह्मदेवानेंच ठरविलें व त्यानें यज्ञ, अध्ययन व दान करूं नये अशी मोकळीकहि त्याला ठेविली, यांत वावगें काय झालें ? शूद्राच्या पोषणाचा सर्व भार त्याच्या धन्यावरच ठेवला गेला हेंहि महाभारतांतील वचनावरून दिसतेंच. त्याला धनसंचय करण्याची व मंत्राशिवाय यज्ञ करण्याचीहि परवानगी होती असें महाभारतांतील ह्या वचनावरूनच दिसतें. मनुस्मृतींत दहाव्या अध्यायांत स्पष्टच म्हटलें आहे कीं,

" न शूद्रे पातकं किञ्चिन्न च संस्कारमर्हति ॥
नास्याधिकारो धर्मेऽस्ति न धर्मात्प्रतिषेधनम्॥ १२६॥
धर्मेप्सवस्तु धर्मज्ञाः सतां धर्ममनुष्ठिताः ॥
मन्त्रवर्ज्यं न दुष्यन्ति प्रशंसां प्राप्नुवन्ति च॥ १२७ ॥

अर्थः—शूद्रामध्यें कोणतेंच पाप नाहीं म्हणून त्याला उपनयन-संस्कार करण्याची गरज नाहीं. त्यानें धर्म म्हणजे यज्ञ केलेच पाहिजेत अशी जबरदस्तीहि नाहीं आणि त्यानें यज्ञ करूं नये असा प्रतिबंधहि नाहीं ॥१२६॥ धर्म जाणणाऱ्या शूद्रांना यज्ञ करण्याची इच्छा झाली व त्यांनीं मंत्राशिवायहि यज्ञ केला तरी त्यांना दोष लागत नाहीं; उलट, त्यांची प्रशंसाच होते.—ह्यांत शूद्रांचा छळ किंवा द्वेष कांहींच नाहीं; उलट त्यांच्यांत सुधारणाच घडवून आणण्याचीच प्रवृत्ति दिसते. डॉक्टरांना ह्या गोष्टी छळाच्या दिसतात; पण त्यांनीं आपल्या डोळ्यांवरील चष्मा काढल्यास, शूद्र निस्तेज व अल्पवीर्य असल्यामुळें त्या म्हणजे त्यांस दिलेली मोकळीक होय असेंच त्यांसहि दिसून येईल.

ह्यावर असा आक्षेप घेण्यांत आला आहे कीं, ह्या गोष्टी करणाऱ्यांस शिक्षा सांगितल्या आहेत आणि सर्वच शूद्र व त्यांची सर्वच संतति ह्यांना उन्नतीचा मार्गहि ठेवलेला नाहीं ( पृष्ठ ५४-५५ ),

# शूद्र व क्षत्रिय भिन्न होते

हा द्वेष वा छळच नव्हे काय ? ह्याचें उत्तर असें:— संततीमध्यें तिच्या आईबापांचे गुण सामान्यतः उतरत असले तरी ह्या नियमांस अपवादहि असतात. शूद्र वर्गांतहि केव्हां केव्हां ब्राह्मण–वर्णास योग्य अशीं माणसें उत्पन्न होतात. कोणत्याहि वर्णाच्या संततीमध्यें भिन्न वर्णांत जाण्यास योग्य असे पुरुष केव्हां केव्हां उत्पन्न होतात, ह्याचें डॉक्टरसाहेबच उत्कृष्ट उदाहरण आहेत. कै० शिवराम गणपतराव पवार हे मराठे वंशांत जन्मले असूनहि त्यांना मी ब्राह्मणच समजत होतों व त्याप्रमाणेंच त्यांच्याशीं वागत होतों. कारण ते अत्यंत सच्छील असून, हिंदुस्थानांत कोणींच न केलेलें, सूर्याकर्षणामुळें चंद्राच्या गतीवर होणाऱ्या परिणामांचें अत्यंत कठिण गणित वीस वर्षे मेहनत करून सूक्ष्मतेच्या चवथ्या पायरीपर्यंत त्यांनीं केलें. असो; संततीच्या वरील नियमानुसार वर्ण–व्यवस्थेंतहि असा नियम होता कीं, संततीचा वर्ण तिच्या आईबापांचा जो वर्ण असेल तोच प्रथमतः मानावा; परंतु तिनें भिन्न वर्णाचे गुण प्रकट केले तर तिला तिच्या वयाच्या चोविसाव्या वर्षानंतर (आ सप्तमात् युगात् ; युग म्हणजे चार वर्षे ) त्या भिन्न वर्णाची मानावें. ह्यास आधार मनुस्मृतींतीलच दहाव्या अध्यायांतील ४२वा, ६४वा व ६५वा हे श्लोक आहेत. ह्यांचा विचार मीं "धर्मविवाद-स्वरूप" ह्या ग्रंथांत वर्णोत्कर्षापकर्ष ह्या निबंधांत पूर्णपणें केला आहे, तो पाहावा. ह्या श्लोकांत वर्णांतराचा नियम सांगितला आहे. "शूद्रो ब्राम्हणतामेति" म्हणजे शूद्र ब्राह्मण होतो असें स्पष्ट म्हटलें आहे. विश्वामित्रादि पुष्कळ क्षत्रिय ब्राह्मण झाल्याचें पुराणांत सांगितलें आहे, ते ह्याच नियमानें झाले हें उघड आहे. मनु–सप्तर्षि ह्यांची वेळोवेळीं नेमणूक ज्या कारणांकरितां होत असे त्यांपैकीं वर्ण–विभाग पुनः करणें हें एक होतेंच, हें मीं "Social Institutions in Ancient India" ह्या ग्रंथांत सविस्तर दाखविलेंच आहे. ह्या मनु–सप्तर्षींशिवायहि वर्णान्तर होत असे, हेंहि मीं त्याच ग्रंथाच्या चौतिसाव्या व पस्तिसाव्या परिच्छेदांत दाखविलें आहे. हें वर्णान्तर करण्याचें कार्य जर आजपर्यंत चालू असतें, तर डॉक्टरांची कोणतीच तक्रार राहती ना. दुर्दैवानें हें वर्णान्तर बंद झालें. तें बंद होण्यास ब्राह्मणच जबाबदार असा आक्षेप घेण्यांत येईल; पण तो चूक आहे वर्णव्यवस्था सुस्थितींत ठेवणें हें ज्याचें कर्तव्य होतें तोच वर्णान्तर बंद झाल्याबद्दल जबाबदार ठरेल. वर्णव्यवस्था सुस्थितींत ठेवणें हें राजांचें कर्तव्य होतें. राजानें राज्याभिषेकाच्या वेळीं घ्यावयाच्या शपथेंत या कर्तव्याचा उल्लेख आहे असें "लोकं च संकरात्कृत्स्नं त्रातास्मीति परंतप !" ह्या ऋषींनीं वेनास दिलेल्या शपथेवरुनच दिसतें. ( महाभारत, शांतिपर्व, अ. ५९वा, श्लोक १०८वा पाहा. ) संकर म्हणजेच वर्णव्यवस्थेचा उच्छेद आणि वर्णान्तर झाल्यानें वर्णव्यवस्थेचा उच्छेदच होतो. म्हणून "वर्णांतर बंद होऊं न देणें" हें वास्तविक राजांचेंच कर्तव्य होतें; पण तें कर्तव्य ते करीनासे झाले त्यामुळें वर्णांतर बंद पडलें हाच सिद्धांत ठरतो.

ब्राह्मणांनीं चुका केल्याच नाहींत असें माझें म्हणणें नाहीं. ब्राह्मणांनींहि इतरांप्रमाणेंच चुका केल्या असें माझें निश्चित मत आहे. राजांना त्यांचें योग्य कर्तव्य दाखविलें नाहीं, वेद अपौरुषेय आहेत असें प्रतिपादिलें, परलोकप्राप्ति हेंच धर्माचें साध्य आहे असें म्हणून धर्म बुद्धिगम्य नाहीं असें प्रतिपादिलें, ह्या ब्राह्मणांनीं केलेल्या चुका. शूद्रांचे किंवा इतरांचे धर्म सांगण्यांतहि त्यांनीं कांहीं चुका केल्या असतील; पण त्याहि त्यांनीं कोणाच्या द्वेषामुळें केल्या हें म्हणणें मात्र टिकूं शकत नाहीं. त्या चुका गैरसमजामुळें, अज्ञानामुळें किंवा कदाचित् शूद्रांच्या तिरस्कारामुळेंहि ( तिरस्कार द्वेषाहून भिन्न आहे ) झालेल्या असतील. ह्याविषयीं मला एक चांगलें उदाहरण माहीत आहे तें सांगतों:—नागपुर येथील राजे लक्ष्मणराव भोसले ह्यांचे केशवशास्त्री घोंगे नामक पुरोहित होते. राजांना आपल्या मुलाचें उपनयन वैदिक मंत्रांनीं करावयाचें होतें; पण घोंगेशास्त्री त्यास कबूल होईनात. राजांनीं त्यांचें पौरोहित्य काढून घेण्याचा धाक घातला. ह्या पौरोहित्यापासून घोंगेशास्त्र्यांना सालीना दोन हजार रुपयांचें उत्पन्न होतें. तरीहि शास्त्रीबोवा आपल्या निर्णयापासून ढळले नाहींत व त्यांनीं आपलें पौरोहित्य सोडून दिलें. ह्याच्या मुळाशीं शास्त्रीबोवांची द्वेष–भावना नव्हती, तर उलट त्यांची चुकीची कां होईना धर्मनिष्ठाच



अनुक्रमणिका






होती, ही गोष्ट पुढें राजांनाहि पटली हें, राजे आपल्या दुसऱ्या मुलाच्या उपनयनाच्या वेळीं शास्त्रीबोवांना उपनयनाचें आमंत्रण देण्याकरितां त्यांच्या घरीं स्वतः गेले, यावरूनच सिद्ध झालें.

ब्राह्मणांना शूद्रांचा द्वेष करण्याचें कारण तरी काय ? इंग्लंडांत राजा व प्रजा ह्यांमध्यें झगडा झाला तसाच इकडे ब्राह्मणांचा क्षत्रियांशीं झगडा झाला; त्यांचा शूद्रांशीं झगडा झालाच नाहीं. शूद्रांनीं ब्राह्मणांस छळलें नाहीं आणि ब्राह्मणांनीं त्याबद्दल त्यांचा द्वेषहि केला नाहीं. शूद्रांना अमका हक्क नाहीं, त्यांनीं अमुक केल्यास अमुक शिक्षा, असें म्हणणें हा द्वेष नव्हे. अल्पवीर्य व निस्तेज मनुष्याबद्दल असें म्हणणें हें सरळ बुद्धिचेंहि लक्षण असूं शकतें. शूद्रांना ब्राह्मण होण्याचा मार्ग खुलाच होता. महिदास ऐतरेय हा इतरेचा म्हणजे शूद्रेचा पुत्र असूनहि त्यानें ऐतरेय ब्राह्मण हा ग्रंथ रचला व त्याचा वेद म्हणून स्वीकार झाला. हें तरी हेंच दाखवितें कीं, शूद्रांनाहि उन्नतीचा मार्ग खुला होता. तो मार्ग वर्णान्तर बंद झाल्यापासून बंद झाला हें खरें आहे. पण ह्या दुर्दैवी घटनेबद्दल एकटे ब्राह्मणच जबाबदार नसून सर्वच समाज आणि विशेषतः क्षात्रिय राजेहि जबाबदार आहेत, किंबहुना बुद्धच जबाबदार आहे. कारण, मनुसप्तर्षींची शेवटची नेमणूक झाल्यावर शेवटचा वर्णविभाग बार्हद्रथ वंशांतील "शुचि" नांवाचा राजा मगध देशांत राज्य करीत असतां खिस्तपूर्व ९५० ह्या वर्षी झाला (परिच्छेद छत्तिसावा, Note. The Social Institutions in Ancient India). असा वर्णविभाग पुनः पुनः सुमारें ३०० ते ४०० वर्षांनीं ह्यापूर्वीं होत असे. अर्थातच तो ह्यानंतर सुमारें खिस्तपूर्व ५५० ह्या वर्षी व्हावयास पाहिजे होता; पण ह्या सुमारासच खिस्तपूर्व ५५८ ह्या वर्षी जन्मलेल्या बुद्धाची चळवळ सुरू झाली व ही चळवळ आणि तिची प्रतिक्रिया ह्यांनीं सर्व समाज विस्कळित झाला. बुद्धानें यज्ञांवर, वेदांवर आणि मनुस्मृतीवर ह्या सुमारासच हल्ला चढविला. वेद व मनुस्मृति मनुसप्तर्षींच निर्माण करीत. अर्थातच तो हल्ला अप्रत्यक्षपणें 'मनुसप्तर्षि'–संस्थेवरच होता. ह्याचा प्रतिकार करण्याकरितांच वेद अपौरुषेय आहेत असें प्रतिपादिलें गेलें असावें असें दिसतें व हें मात्र चुकलें. ही चुकी ब्राह्मणांनीं केली; पण त्या चुकीस बुद्धाची चूक कारणीभूत झाली. बुद्धास जो कांहीं फरक समाजांत करावयाचा होता तो त्यानें मनुसप्तर्षींकडून करवावयास पाहिजे होता; पण तो फरक स्वतंत्रपणें करण्याचा प्रयत्न त्यानें केला हें चुकलें. कारण, समाज–नियंत्रण करणाऱ्या त्या संस्थेवर त्यामुळें अतिक्रमण झालें आणि पुढें ती संस्थाच विसरली गेली. समाजनियंत्रण करणारी संस्था विसरली गेल्यामुळें खोट्या व बेजबाबदारपणें लिहिलेल्या स्मृती अस्तित्वांत आल्या आणि त्यांनीं समाजाचा विस्कळितपणा वाढविला तो अजूनहि कायमच आहे. ह्या सर्वांचें मूळ बुद्धच होय असें दिसतें.

आतां हिंदुस्थान स्वतंत्र झाला असून स्वतःचें नियंत्रण करण्यास समर्थ आहे व समाजांतील द्वैत–भावना नष्ट करून ऐक्य–भावना वाढविण्याचें कंकण पुढाऱ्यांनीं हातांत बांधलें आहे. अशा वेळीं मागील भांडणें उकरून काढून तीं द्वेष–मूलक होतीं असें प्रतिपादणें योग्य आहे काय ?

---











# जल–उषा

: माधवकरणी

दिशासतींनो चंद्रमुखींनो! पुन्हां पुन्हां सांगा
सांगा पुनश्च अभिमानें,
'निळवंतविर निशाण अमुचें नाचत जाईल
यापुढें डोलत डौलानें'

\+ + +

अखेरच्या त्या चौल नृपाची अखेरची आशा
तरळते तरल सागरांत?
सागरलक्ष्मी विजयनगरची विजनवासिनी वा
नाहते फिरून तेजांत?
झामोरिनची बुडलेली वा दौलत उसळून
आली जलपृष्ठावरतीं?
तुफान किंवा कान्होजीच्या शक्तिसागराची
ओहटी संपुन ये भरती?
दिशासतींनो सूर्यमुखींनो! पुन्हां पुन्हां सांगा
सांगा पुनश्च अभिमानें,
'पराक्रमाला पुन्हां मोकळ्या दश दिशा झाल्या
कशाला पूर्वस्मृतिगानें?'

\+ + +

सागरिके! ही पहिली वहिली विश्वासानें ग
टाकली तुझिया पदरांत
सांग तुझ्या लहरींलहरींना—'सांभाळा जपुनी...
जोजवा हलक्या हातांत'
वरती खालीं दो पाकळ्या निळ्या शिंपल्याच्या
आंत हा मौक्तिक आरक्त
सहस्रतारानयनीं हणुनी विश्वेदेवांनो
पहारा ठेवावा सक्त
दिशासतींनो चंद्रमुखींनो सूर्यमुखींनो ग!
जगाला सांगा अभिमानें,
'वृथा कशाला खंत हवी ही? संरक्षण अपुलें
करीलच अपुल्या तेजानें.' २



अनुक्रमणिका

# नवभारत

सागरतीरीं वलसागर हा नायक राष्ट्राचा
वन्दी महासागराला
उज्ज्वल अपुल्या स्वप्नांमधुनी एका स्वप्नाचें
वाहतो दिव्य पुष्प त्याला
काय जगा संदेश सांगण्या तुवां सोडलें हें
कबूतर निळया सागरांत ?
तुझ्या कराच्या स्पर्शामधल्या सामर्थ्यावरतीं
निघालें कोठें वेगांत ?
चन्द्रमुखींनो सूर्यमुखींनो दिशासुन्दरींनो !
जगाला सांगा अभिमानें,
'पुण्यात्म्यांच्या पुण्याईचें चिलखत चढवून
पाहूं नवीं नवीं गगनें.' ३

\+ + +

अगे जलउषे ! उषा तूं परी अजून मागून
यायचे उदयाला भानू
नौकायानें अभंग फिरतां ... इवल्या क्षितिजांच्या
कशाला मर्यादा मानूं ?
सह्याद्रीचा ... हिमालयाचा अचलपणाचा तो
कशाला ऐकावा डौल ?
तरते फिरते दुर्ग होउनी वेलाशक हिंडा
मोकळा आहे भूगोल !
चन्द्रमुखींनो सूर्यमुखींनो दिशासुन्दरींनो ?
निक्षुनी सांगा अभिमानें,
'आक्रमणाची ना आकांक्षा. स्वतंत्रता मात्र
तोलतों आम्ही प्राणानें ! '

पुणें,
१५।३।१९४८.

**वसंत बापट.**










# बापू

१९१६. बापूंना मीं पहिल्या प्रथम पाहिल्याला ३२ वर्षे झालीं. तेव्हांपासून जणूं एक युगच लोटल्यासारखें वाटतें! साहजिकच आपली दृष्टि मागें वळते आणि मनांत आठवणींचें काहूर माजतें. हिंदुस्थानच्या इतिहासांतील हा काळ किती अद्भुत होऊन गेला! उत्कर्ष–अपकर्ष, जय–अपजय यांनीं भरलेला ह्या काळाचा इतिहास एकाद्या काव्याप्रमाणें वा कादंबरीप्रमाणें किती अद्भुत–रम्य आहे! आपण ह्या काळांत जीवनाचा जो अनुभव घेतला आणि भारताच्या या विशाल नाट्य-प्रसंगांत आपण जो थोडाफार भाग घेतला, त्यामुळें आपणां पामरांचीं जीवनें पण अद्भुतरम्य अशा तेजोवलयानें उजळून निघालीं!

सर्व जगभरच हा काळ युद्धांनीं, नानाप्रकारच्या आंदोलनांनीं आणि रोमहर्षण घटनांनीं भरूनगेलेला असला तरी हिंदुस्थानांत घडून आलेल्या घडामोडींचें वैशिष्ट्य इतरांपेक्षां कांहीं विशेषच ठळकपणें उमटून दिसतें! कारण ज्या भूमिकेवर या घडामोडी घडल्या ती हिंदुस्थानांतील भूमिका इतरांपेक्षां मुळीं अजीबांतच भिन्न होती. बापूजींचें कार्य फारसें लक्षांत न घेतां जर एकाद्या माणसानें ह्या काळांतील घटनांचा अभ्यास केला तर ह्या सर्व गोष्टी हिंदुस्थानांत कां व कशा घडून आल्या याचें त्याला एक मोठें कोडेंच पडेल. त्यांचा अन्वयार्थ लावणें खरोखरच कठिण आहे. आपणांपैकीं प्रत्येक व्यक्तीनें–मग ती स्त्री असो वा पुरुष असो—ह्या सर्व प्रसंगीं जी कृति करून दाखविली तिचीं कारण–मीमांसा केवळ रूक्ष बुद्धिवादानें करणें खरोखरच अशक्य आहे. असेंहि कित्येक वेळीं घडून येतें कीं, केवळ व्यक्तिच नव्हे तर राष्ट्र देखील एकाद्या उत्कट भावनेच्या आहारीं जाऊन एकादी विशिष्ट प्रकारची कृति करण्यास उद्युक्त होतें. कित्येक वेळीं ती कृति सात्त्विक असते तर पुष्कळदां ती तामसीहि असते; त्या उत्कट भावनेचा आवेग लवकरच नाहींसा होऊन ती व्यक्ति पूर्वीप्रमाणेंच आपलें मूळचें क्रियामय किंवा निष्क्रिय जीवन कंठूं लागते.

हिंदुस्थानांत मात्र खरोखरींच नवल घडून आलें! ह्या काळांत आपल्या सर्वच देशाचे व्यवहार एका उच्च पातळीवरून चालले होते येवढेंच नव्हे, तर बराच दीर्घकाळपर्यंत त्याच उच्च पातळीवरून ते व्यवहार साधारणतः सतत चालू राहिले. ही गोष्ट खरोखरींच अत्यंत विलक्षण अशी घडून आली. ज्या लोकविलक्षण विभूतीच्या व्यक्तिमत्त्वानें हा कालखंड घडविला गेला तें व्यक्तिमत्त्व लक्षांत घेतल्याशिवाय त्या गोष्टींचा अर्थ सहज लागणें शक्य नाहीं. हिंदुस्थानच्या इतिहासाचें गेलें अर्धशतक ह्या विराट पुरुषानें व्यापून टाकलें आहे. अर्थात् हा पुरुष शरीरानें नव्हे तर बुद्धीनें आणि आत्म्यानें खरोखरींच विराट्––जगड्व्याळ असा होऊन गेला.

आपण बापूंबद्दल शोक करितों. आपल्याला पोरकें झाल्यासारखें वाटतें, परंतु त्यांच्या भव्य जीवनाचा जर आपण आढावा घेतला तर शोकाचें काय कारण आहे? आपल्या जीवनाची सफलता पाहण्याचें त्यांच्यासारखें भाग्य इतिहासांत फारच थोड्या व्यक्तींना लाभलेलें आहे. आपल्या सर्वांच्या चुकांबद्दल त्यांना वाईट वाटे. हिंदुस्थानचें नांव












आपण सर्वांनीं अधिक वैभवशाली केलें नाहीं म्हणून त्यांना दुःख होई. हें त्यांचें वाईट वाटणें आणि हें त्यांचें दुःख हीं आपणांस समजूं शकतात; तथापि त्यांचें जीवन अपेशी झालें, असें म्हणण्याचें धाष्टर्य कोण करील ? ज्या ज्या गोष्टीला त्यांनीं हात घातला ती ती त्यांनीं चिरंजीव आणि कृतार्थ केली. त्यांनीं जें जें कार्य केलें त्या त्या कार्याला त्यांच्या अपेक्षेप्रमाणें नसलें तरी पुष्कळच यश आलें. त्यांनीं जो जो प्रयत्न करावा तो तो हटकून यशस्वीच व्हावा असें त्यांच्याविषयीं वाटत असे. गीतेंतील तत्त्वाप्रमाणें आचरण करीत, फलाविषयीं आसक्ति न ठेवतां ते अनासक्तपणें कर्म करीत राहिले आणि त्यांचीं कर्में आपोआप सफल झालीं. त्यांचें दीर्घ आयुष्य अविरत परिश्रमांनीं, उद्योगांनीं आणि सामान्यतः न आढळून येणाऱ्या नवनवीन साहसांनीं परिपूर्ण होतें. त्यांच्या ह्या दीर्घ जीवनांत बदसूर असा कोठेंच आढळून येत नाहीं. नाना प्रकारच्या उद्योगांनीं भरलेलें त्यांचें जीवन वृंदसंगीताप्रमाणें दिवसेंदिवस अधिकाधिक मधुर व सुरेल बनत होतें. त्यांचा प्रत्येक शब्द, त्यांची प्रत्येक कृति त्यांच्या या जीवनसंगीताशीं संवादी व सुरेल अशी होती, इतक्या नकळत ते श्रेष्ठ कलावन्ताच्या पदवीला जाऊन पोहोंचले होते! त्यांनीं अंगीकारलेली जीवनपद्धति जरी जगावेगळी होती तरी जीवनाची परमोच्च कला त्यांनीं हस्तगत करून घेतली होती. सत्य आणि सौजन्य हीं आचरणांत आणतां आणतां जीवन किती सुंदर होतें, एकाद्या परमोच्च कलाकृतीप्रमाणें तें किती रमणीय बनतें हें बापूंच्या उदाहरणावरून स्पष्ट होतें.

जसजसे ते वृद्ध होत चालले तसतसें त्यांचें शरीर त्यांच्या पराक्रमी आत्म्याचें एक नाममात्र वाहन होय असेंच वाटूं लागलें होतें. त्यांचें बोलणें ऐकत असतांना, त्यांच्याकडे पाहत असतांना त्यांना शरीर आहे ह्या गोष्टीचा आपणांला विसर पडत असे. म्हणून जेथें जेथें ते बसत ती जागा देवळाप्रमाणें वाटे, ज्या जागेवरून ते चालत ती जागा पुनीत झाल्यासारखी वाटे.

त्यांच्या मृत्यूंतहि केवढी भव्यता, केवढी कलासुंदर रमणीयता आहे! कोणत्याहि बाजूनें बघितलें तरी मृत्यूनें या पुरुषाच्या जीवनावर वैभवशाली कळस चढविला आहे, असेंच वाटतें. त्यांचीं जीवनमूल्यें त्यांच्या मृत्यूमुळें अधिकच तेजानें तळपत आहेत. त्यांच्या मानसिक शक्ती संपूर्णपणें अक्षीण, अव्यंग आणि विकसित असतांना त्यांना मृत्यु आला. तो मृत्यूहि त्यांना पाहिजे अशा वेळीं—प्रार्थनेच्या वेळीं—आला. ज्या सामाजिक ऐक्याकरितां त्यांनीं आपल्या स्वतःला सदैव वाहून घेतलें होतें, आणि गेलें वर्षभर ज्याप्रीत्यर्थ त्यांची अहर्निश खटपट चालू होती त्या कार्याकरितां त्यांचें बलिदान झालें! ते एकाएकीं अचानक वारले! अशा मृत्यू बद्दल कोणाला हेवा वाटणार नाहीं ? शरीर पंगु होणें, रुग्णशय्येवर बराच काळ पडून राहणें, वयोमानाप्रमाणें मनाची शक्ति क्षीण होणें, हे प्रकार त्यांच्या बाबतींत घडून आले नाहींत. तर मग आपण त्यांच्याकरितां कां म्हणून शोक करावयाचा ? आमच्या या गुरुजींच्या (Master च्या) आठवणी आमच्याजवळ सदैव राहतील. त्यांच्या गतींतील शेवटपर्यंत असलेली तरळता, आजूबाजूचें वातावरण प्रसन्न करून टाकणारें त्यांचें तें प्रसन्न स्मित, त्यांचे ते सदैव हंसणारे डोळे, या गोष्टी आम्ही कधींहि विसरूं शकणार नाहीं. बापूजींचें शरीर आणि त्यांचें मन यांच्या शक्ती क्षीण होत आहेत अशी कल्पनाहि आम्हांला कधीं शिवली नाहीं! आपलें मनःसामर्थ्य आणि आपली शक्ति यांच्या ऐन वैभवशाली अमदानींत असतांना त्यांना मृत्यु आला. आमच्या आणि आमच्या समकालीनांच्या मनश्चक्षूंसमोर जी त्यांची उज्ज्वल प्रतिमा उभी राहते ती सदैव अजर आणि अमर अशीच आहे.

आपल्या मनश्चक्षूंसमोरील ती प्रतिमा कधींहि नष्ट होणार नाहीं. त्यांनीं आपणांकरितां काय केलें नाहीं ? त्यांनीं अगदीं अंतरंगांत शिरून, आपले मानसिक व आध्यात्मिक पिंड बदलून टाकले, त्यांना निराळें वळण लावलें. गांधीजींची पिढी जरी निघून गेली तरी त्यांनीं वळण दिलेला तो प्रकृतिपिंड कायम राहून त्यांचा पुढील पिढ्यांवर परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं, इतका तो हिंदुस्थानच्या जीवनाशीं एकजीव होऊन गेला आहे. आध्यात्मिक दृष्ट्या ज्या वेळीं आपण दारिद्री बनत चाललों होतों अशा ऐन वेळीं बापूजींचा अवतार











झाला. त्यांनीं आमचें आध्यात्मिक जीवन समृद्ध करून आम्हांला बलशाली केलें. आम्हांला जें सामर्थ्य त्यांनीं दिलें तें केवळ क्षणभर वा एकादा दिवसभर किंवा एकादें वर्षभरच टिकणारें असें नाहीं. त्यांच्या योगानें आमच्या युगानुयुगें चालत आलेल्या राष्ट्र-संस्कृतीच्या संचितांत कायमची भर पडली आहे. आपल्या हिंदुस्थानची, जगाची—आपणांसारख्या पामरांची—गांधीजींनीं जी प्रचंड सेवा केली आहे ती बघून कोणीहि आश्चर्यानें थक्कच होऊन जाईल! आतां मात्र आपलें कर्तव्य करावयाची पाळी आपणांवर येऊन ठेपली आहे. त्यांच्याशीं किंवा त्यांच्या स्मृतीशीं बेइमान न होतां आपली संपूर्ण शक्ति वेंचून आपण त्यांचें कार्य पुढें चालू ठेवलें पाहिजे. आणि आपण अनेक वेळीं केलेल्या प्रतिज्ञा पूर्ण केल्या पाहिजेत.

—पं. जवाहरलाल नेहरू, ५।२।४८.
(इंग्रजी हरिजन १५।२।४८.)

## २ गांधींजींचें आपल्या वीरमरणाचें भाकित

"१९३३चा सप्टेंबर महिना नुकताच सुरू झाला होता. बापूजी त्या वेळेला नुकतेच अत्यवस्थ आजारांतून उठून पुण्याला 'पर्णकुटी'त विश्रांतस्तिव राहिले होते. त्यापूर्वी तुरुंगामधूनच अस्पृश्योद्धाराची मोहीम करण्याकरितां त्यांनीं सरकारजवळ परवानगी मागितली होती. पण सरकारनें ती नाकारल्यामुळें त्याविरुद्ध निषेध प्रदर्शित करण्याकरितां त्यांनीं येरवड्याच्या तुरुंगांतच प्राणांतिक उपोषण आरंभिलें होतें. उपवासाच्या पहिल्या पांच दिवसांतच त्यांची प्रकृति इतकी खालावली कीं सरकारनें त्यांना ससून–हॉस्पिटलमध्यें नेलें. या दुखण्यांत त्यांच्या जिवाला धोका आहे हें सरकारला कळून आल्यावर, सरकारनें बापूंची बिनशर्त सुटका २३ ऑगस्ट १९३३ रोजीं केली. त्यानंतर त्यांना 'पर्णकुटी'त आणिलें.

'हरिजन'चे नेहमींचे संपादक रजेवर असल्यामुळें त्या अवधींत त्यांचें काम संभाळावयास बापूंनीं मला सांगितलें. त्यामुळें साहजिकच मीं बापूंच्या त्या वेळच्या 'पर्णकुटी'च्या वास्तव्यांत सबंध वेळ त्यांच्याबरोबर होतों.

एकदां संध्याकाळीं मीच एकटा त्यांच्याजवळ होतों. 'पर्णकुटी'च्या बगीच्यांत ते शतपावली करीत होते. त्यांची मुद्रा चिंतनमग्न होती. मावळत्या सूर्याच्या मन्द प्रकाशांत बगीच्यांतील पानेंफुलें चमकत असून मोहक दिसत होतीं. एकदम त्या वेळच्या शांततेचा भंग करीत बापू उद्गारले:—

"आनंद, सध्यांच्या माझ्या या स्थितींत मीं काय करावें, असें तुला वाटतें? या वेळेला माझी सुटका होईल, असें नव्हतें मला वाटलें! मला आपलें ते मला मरूं देतील असें वाटत होतें; त्याकरितां मीं आपल्या मनाची अगदीं पूर्ण तयारी करून ठेवली होती. इतकी कीं माझ्या अशा ज्या कांहीं थोड्या जिनसा होत्या त्या मीं सुटण्याच्या आदल्या दिवशीं इस्पितळांतील परिचारक–परिचारिकांना देऊन टाकल्या होत्या. या उपवासांत मला मृत्यु आला असता, तर लोक काय म्हणाले असते, कोणाला ठाऊक?"

"असें काय म्हणतां, बापू? तें वीराला साजेसें कीर्तिशाली असेंच मरण झालें असतें!" मी उत्तर दिलें.

"काय वेडा आहेस तूं!" बापू म्हणाले, "उपवास करून मरून जाणें याला तूं कीर्तिशाली मरण म्हणतोस! मला तरी असें वाटत नाहीं. अशा मरणांत का कुठें वीरता असते? तुला माहीत नाहीं, माझ्या पत्रिकेवरून मला वीरमरण यावें असें आहे?"

"पण, बापू" मीं उत्तर दिलें, "उपवास करून मरून जाणें हें देखील वीर–मरणच नव्हे तर काय? अगदीं योजून हेतुपूर्वक तसूतसूनें झिजत झिजत मरणें ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं. त्यालाहि कमालीचें धैर्य लागतें!"

"छे! मला नाहीं असें वाटत! मला मृत्यु येईल तो, एक मला फांशी तरी देतील किंवा गोळी







घालून तरी त्यामुळें मारतील ! तें खरें वीर-मरण ! अंथरुणावर पडल्यापडल्या उपवास करून येणारें नव्हे !"

मी यावर कांहीं उत्तर देणार इतक्यांत मीराबेन तेथें आल्या आणि हें बोलणें तेवढेंच थांबलें.

म्हणून ३० जानेवारीला नभोवाणीवरून बापूंच्या मृत्यूची भयंकर बातमी मीं ऐकिली व मला बापूंची ती भविष्यवाणी आठवली...!"

आनंद हिंगोरानी, ३-२-४८.
( इंग्रजी हरिजन, १५-२-४८. )

## ३ दोन हजार वर्षांपूर्वींचे उद्‌गार

३० जानेवारीला गांधीजी प्रभुसंनिध गेले. जगांत मानवांच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे हाहाकार उडाला. या दुःखांत मानवांचें सांत्वन करणें कठिण आहे. अशा सारख्याच परिस्थितींत दोन हजार वर्षांपूर्वी जीझसनें उच्चारलेल्या शब्दांची आठवण होऊन ते शब्द आपल्या कानांशीं निनादल्याशिवाय राहत नाहींत. जीझसनें आपल्या लोकांच्या आचार-विचारांवर निर्दयपणें टीका केली. त्यामुळें त्याच्याच लोकांपैकीं कांहींच्या कुटिल नीतीमुळें जीझसला सुळीं जावें लागलें. मृत्यूच्या यातना सुरू होण्यापूर्वी जीझसनें जे उद्गार काढले, ते आजच्या परिस्थितींत आपणांस विशेष अर्थपूर्ण वाटतातः—

" तुमच्याकरितां मी शान्ति ठेवून जात आहें. तुमचीं हृदयें अशान्त किंवा क्षुब्ध होऊं देऊं नका. जर तुम्ही माझ्यावर प्रेम करीत आलां असाल, तर तुम्हांला आनंद वाटला पाहिजे. कारण मी आपल्या पित्यासंनिध जात आहें.

"आणखी कांहीं थोड्या वेळानें मी जगाच्या दृष्टीआड होईन. पण तुम्हांला मात्र मी सदैव दिसेन. जो माझे आदेश ध्यानांत धरून त्याप्रमाणें आचरण करतो त्याचेंच माझ्यावर खरें प्रेम आहे. मीहि त्याच्यावर प्रेम करीन. त्यालाच मी प्रकट होईन. माझा पिताहि त्याच्यावर प्रेम करील.

"जर तुम्ही माझे आदेश पाळाल, तर माझें शाश्वत प्रेम तुम्हांला लाभेल; जसें मीं आपल्या पित्याचे आदेश पाळून त्याचें शाश्वत प्रेम संपादिलें आहे. हा माझा आदेश तुम्ही लक्षांत ठेवा : जसें माझें तुमच्यावर प्रेम आहे तसें तुमचें एकमेकांवर असूं द्या. आपल्या बांधवांकरितां आपले प्राणहि मनुष्य देतोः यापेक्षां पराकाष्ठेचें प्रेम तें आणखी कोणतें ?

"मीं ह्या गोष्टी तुम्हांला बोलून दाखविल्या. कारण, माझा हा आनंदाचा ठेवा तुमच्यापाशीं कायमचा राहावा आणि तुम्हांलाहि संपूर्णपणें आनंद व्हावा.

"होय ! खरोखरींच काळ असा कांहीं उफराटा झाला आहे कीं तुम्हांलाहि लोक मारतील आणि जे मारतील त्यांना आपण हीं ईश्वराचीच सेवा करीत आहों असें वाटेल. तुमच्याशीं ते असें वागतील. कारण त्यांनीं पित्याला किंवा मला ओळखलें नाहीं.

"मीं ह्या गोष्टी तुमच्याजवळ बोलून दाखविल्या म्हणून तुमचीं अंतःकरणें साहजिकच दुःखित झालीं आहेत; खरें सांगायचें म्हणजे तुम्हांला आतां रडावें लागणार आहे, शोक करावा लागणार आहे. जगाला हर्ष होईल आणि तुम्ही मात्र दुःखित व्हाल. पण तुमच्या दुःखाचें रूपान्तर आनंदांत होईल आणि तो आनंद तुमच्यापासून कोणीहि हिरावून घेऊं शकणार नाहीं.

"पिता तुमच्याकडे 'सत्य' (Spirit of Truth) पाठवील. तें तुम्हांला धीर देईल व तुमचें सत्यदर्शनाच्या बाबतींत मार्गदर्शन करील.

"पित्याचें प्रत्यक्ष तुमच्यावर प्रेम आहे. कारण तुम्ही त्याची भक्ति करितां आणि तुमची अशी श्रद्धा आहे कीं मी परमेश्वराकडून आलों. मी माझ्या पित्याकडून निघून या संसारांत आलों. हा संसार सोडून पुनः मी पित्याकडे जात आहें.

"बघा ! तो समय समीप येत आहे; नव्हे आलाच, कीं ज्या वेळीं तुमची सर्वांची पांगापांग होऊन, जो तो आपापल्यापुरतें पाहील. मला एकटा टाकून तुम्ही जाल. पण मी एकटा नाहीं. कारण पिता माझ्या संनिध आहे.

"या गोष्टी मी तुमच्याशीं येवढ्याकरितां बोललों, कीं तुम्हांला शान्ति लाधावी. जगांत तुम्हांला भयंकर क्लेश सहन करावे लागतील. तरी पण धीर धरा.








मी संसारांतील यातनांवर मात करून त्यापलीकडे गेलों आहें. ''

गांधीजींनीं आपलें देहबंधन आतां टाकून दिलें आहे. दिक्‌कालांचीं बंधनें झुगारून ते आतां विश्वात्म्यांत विलीन झाले आहेत. आपणांपैकीं ज्यांची त्यांच्यावर खरी भक्ति असेल त्यांना, गांधीजींनीं आपल्या जीवनानें आणि कृतींनीं घालून दिलेल्या मार्गानें जाण्याचें सामर्थ्य देण्याची परमेश्वरानें कृपा करावी.

जे. सी. कुमाराप्पा.

[ इंग्रजी हरिजन( ८–२–४८ )वरून. ]

## शास्त्रें आणि संस्कृति

बंगलोर येथें म्हैसूर–सरकारनें एक संस्कृति–संवर्धक हिंदी संस्था नुकतीच काढिली आहे. संस्थेच्या वाचनालयाचा उद्‌घाटन–समारंभ झाला, त्या प्रसंगीं बंगलोर येथील 'शास्त्रीय संशोधन'–संस्थेचे त्या वेळचे डायरेक्टर, सर जे. सी. घोष यांनीं शास्त्रें आणि संस्कृति यांसंबंधीं एक भाषण केलें, त्यांतील कांहीं बहुमोल विचार सारांशरूपानें पुढें दिले आहेत.

प्रथमतः संस्कृतीची व्याख्या करणें फार कठिण आहे असें सांगून ते म्हणतात कीं, जेव्हां मनुष्याच्या अंगची निर्माणशक्ति वाङ्मय, संगीत, कला, तत्त्वज्ञान आणि धर्म तसेंच सामाजिक रूढि आणि आचार, राजकीय व आर्थिक संघटना आणि शास्त्रसंशोधन या व्यापारांत प्रकट होऊं लागते, तेव्हां संस्कृतीचा जन्म होत असतो. यांपैकीं कोणत्याहि एका व्यवसायास संस्कृति असें म्हणतां येणार नाहीं, तर या सर्व मानवी व्यापारांना समुच्चयरूपानें संस्कृतीचें निदर्शक मानतां येईल. अशा संस्कृतीच्या बुडाशीं एका सुधारलेल्या समाजघटनेचें अस्तित्व गृहीत धरलें पाहिजे. ज्या समाजांतील व्यक्ती केवळ अन्नावर जगून राहिलेल्या नाहींत, पण ज्यांना मनाचा विकास करण्यास पुरेशी फुरसत मिळूं शकते, त्यांतील व्यक्ती आपलें जीवन कांहीं निश्चित नियमानुसार व्यतीत करीत असतात. स्वतःचीं जीवनांत त्यांना ध्येयें व मूल्यें असतात व त्या व्यक्ती आपल्याहून भिन्न ध्येयांच्या व जीवनमूल्यांच्या व्यक्तींशीं सहिष्णुतेनें वागूं शकतात. अशा समाजांच्या अधिष्ठानावरच मानवसंस्कृतीचे विविध व विशिष्ट वृक्ष फोफावूं शकतात. आजपर्यन्त मानवसंस्कृतीचे असे अनेक विविध प्रकार जगांत जन्मास येऊन वाढलेले व कालांतरानें ऱ्हास पावलेले आहेत. अशा संस्कृतींत हिंदी संस्कृति, चिनी संस्कृति, रोमन, ग्रीक व हिब्रू संस्कृति यांची गणना करतां येईल. आजपर्यंत कोणत्याहि संस्कृतीचा ऱ्हास ही केवळ विशिष्ट भूप्रदेशांतील मानवांवर ओढवलेली आपत्ति असें गणण्यांत येई. पण आज निसर्गावर मनुष्याचें प्रभुत्व वाढत असल्यामुळें अशी परिस्थिति निर्माण होत आहे कीं त्या परिस्थितींत सर्व पृथ्वीवर एकच मानवसंस्कृति नांदूं शकेल. एक जग, सुधारणेचा एकच प्रकार व एकच संस्कृति या गोष्टी आज शक्य वाटत आहेत. हें दृश्य मानवाला जिकडे आवाहन करीत आहे तिकडे, तितक्या उच्च भूमिकेवर मानवाला चढतां येईल काय ? आपल्या या संस्थेला 'हिंदी संस्कृतीची संस्था'(Institute of Indian Culture) असें नांव न देतां संस्कृतिसंवर्धक हिंदी संस्था Indian Institute of Culture असें नांव देण्यांत जी उदार दृष्टि व्यक्त झाली आहे ती कौतुकास्पद आहे.

यापुढें शास्त्रसंशोधन आणि संस्कृति यांचा संबंध विशद करतांना ते म्हणतात, योजनापूर्वक निरीक्षण करणें आणि पूर्ण प्रामाणिकपणानें व निःपक्षपाती वृत्तीनें सत्यसंशोधन करणें ही शास्त्रज्ञाची विशिष्ट पद्धति आहे. आपणास सत्याचें ज्ञान होऊं शकतें असा त्याला विश्वास असतो आणि सत्य हें संशोधनास पात्र आहे व तितकें त्याचें महत्त्व आहे अशी त्याची निष्ठा असते. सत्यसंशोधनाची ही पद्धति, त्यासंबंधींचा हा आत्मविश्वास आणि जीवनांतील सत्याच्या स्थानासंबंधीं ही निष्ठा यांत शास्त्रज्ञाचा संस्कृतिविषयक दृष्टिकोन प्रकट होत असतो. शास्त्रीय विचारपद्धतीमुळें मानवाची अधीरता नष्ट होते. तो निर्विकार, अनासक्त आणि धीर बनतो व निर्णय देण्यापूर्वीं लागणारा संयम पाळूं शकतो. कल्पनेची तरलता आणि संशयी वृत्तिचें महत्त्वहि तो जाणतो. विकार आणि भावना यांना वश झालेल्या

जगाला निष्कर्ष काढण्यापूर्वी पुराव्याचें मूल्य-मापन करण्याची जबाबदारी शास्त्रज्ञ दाखवून देतो.

यानंतर शास्त्रसंशोधनाच्या कार्यांत निरनिराळ्या असंख्य व्यक्तींचें सहकार्य कसें घडावें लागतें तें सर जे. सी. घोष यांनी परमाणूच्या स्फोट-शक्तीच्या संशोधनाचें उदाहरण देऊन दाखवून दिलें आहे. यानंतर अणु बॉंब कोणीं व कशासाठीं शोधून काढला याची माहिती देतांना ते म्हणतात कीं, फर्मी, बोहर आणि मॅडम लिझ् माईटनर या तीन शास्त्र-संशोधक व्यक्ती युरोपखंडांतून निर्वासित बनून अनेक साहसांतून मार्ग काढून युद्धकाळांत अमेरिकेस जाऊन पोहोंचल्या. जुन्या जगावर नाझी व फॅसिस्ट यांचें जें प्रभुत्व प्रस्थापित होत होतें तें कसेंहि करून कोणत्याहि साधनानें उलथून पाडलेंच पाहिजे असा त्या सर्वांचा निर्धार होता. आइन्स्टीन यांची व प्रेसिडेंट रुझ्वेल्ट यांची मुलाखत घडवून आणण्यांत त्यांनीं प्रमुख भाग घेतला आणि अमेरिकेंतील एंजिनियर व युरोपांतून निर्वासित झालेले शास्त्रज्ञ या दोघांनीं सहकार्य करून फॅसिस्ट दोस्तराष्ट्रांचें पारिपत्य करणारें शस्त्र शोधून काढावें, असें सुचविलें. तीन वर्षें सतत यत्न करून परमाणु-शक्ति मानवाला हस्तगत करतां आली. आणि दोनचार मिनिटांत लक्षावधि लोकसंख्येचें ' हिरोशिमा ' हें शहर १९४५ सालीं भस्मसात् करण्यांत आलें !

आपल्या संशोधनामुळें जे दुष्टपरिणाम घडतील त्यांचा विचार करीत असतां आज या अणु-संशोधक शास्त्रज्ञांना एक धक्का बसला आहे. जगांतील शांतता रक्षण करण्यासाठीं त्यांनीं एक आंतरराष्ट्रीय मंडळ स्थापन केलेलें आहे. त्याचें अध्यक्षपद आइन्स्टीन यांनीं स्वीकारलें असून अध्यक्ष या नात्यानें काढलेल्या पत्रकांत ते म्हणतात, " इतिहासपूर्व कालांत अग्नीचें संशोधन करणाऱ्यांनीं जशी एक क्रान्तिकारक शक्ति जगांत निर्माण केली, तशीच एक नवी क्रान्तिकारक शक्ति परमाणुशक्तीच्या रूपानें आज आमच्या पिढींत जगांत निर्माण झाली आहे. विश्वघटनेला आधारभूत असणारी ही शक्ति आमच्या संकुचित राष्ट्रनिष्ठेच्या जुन्यापुराण्या विचारांच्या जगाच्या बंधनांत सामावूं शकत नाहीं. ही शक्ति कोणापासूनहि लपवून ठेवतां येणार नाहीं व तिचा प्रतिकार करणारें कोणतेंहि संरक्षक साधनहि नाहीं. जगांतील सामान्य जनतेला अधिक जागृत व सज्ञानी बनविणें व त्यासंबंधींचा जनतेंत आग्रह निर्माण करणें यावांचून या शक्तीचें नियंत्रण करण्यास कोणताहि मार्ग शक्य नाहीं. आम्ही शास्त्रज्ञ परमाणु-शक्तीसंबंधींचें ज्ञान आमच्या बांधवांना करून देण्याची अटळ जबाबदारी पूर्णपणें जाणतों व समाज-जीवनावर या शक्तीचे घडणारे परिणाम मानवाला कळविण्याचीहि जबाबदारी ओळखतों. हें ज्ञान झालेली जगांतील जनता मृत्यूचा मार्ग न स्वीकारतां जीवनाचा मार्ग स्वीकारील असा आम्हांस विश्वास आहे. मनुष्याला आपल्या भवितव्यावर आपल्या बुद्धीनें प्रभुत्व प्रस्थापित करतां येईल या निष्ठेनें या कामीं आमचें सर्व ज्ञान व बल खर्ची घालण्याची आम्हीं प्रतिज्ञा केली आहे."

यानंतर सर जे. सी. घोष म्हणतात, " यापुढें जग एक तरी झालें पाहिजे किंवा तें नष्ट तरी झालें पाहिजे. आपल्या या भरतखंडांत नुकताच एक द्रष्टा व कवि होऊन गेला. दोन जागतिक महायुद्धें होऊन गेल्यानंतर जगांतील मुत्सद्द्यांच्या व विचारवंतांच्या डोक्यांत हा विचार सुचण्यापूर्वी एका जगाचें हें दृश्य त्याला दिसलें. संस्कृतीची व्याख्या करणें कठिण असलें तरी संस्कृतीचा मूर्तिमंत अवतार आमच्यापुढें येऊन उभा राहिला तर आम्हांस त्याची ओळख पटूं शकते. गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकूर ही अशी व्यक्ति होती. इतिहासाच्या खिडकींतून त्यांनीं पूर्व कालाकडे दृष्टिक्षेप केला आणि त्यांना असें दिसलें कीं आपल्या या भारतमातेचा संदेश हा आहे कीं, आपल्या घरीं येणाऱ्या अनेकविध अतिथींचा योग्य सत्कार करावा. यामुळेंच तिची संस्कृति विविधतेनें नटली आहे आणि विविधतेंतूनहि एक सूर ऐकूं येत आहे. या देशांत अनेक संस्कृतींनीं आपलें प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठीं झगडे केलेले आहेत; पण अखेरीस सर्वांनाच येथें इतरांशीं समन्वय करून नांदावें लागलें आहे. ते एके ठिकाणीं म्हणतात, " माझ्या सुप्त मना, जागें हो. अनेक जनांच्या प्रवाहांचा जेथें पवित्र संगम घडलेला आहे अशा या पवित्र हिंदभूमींत जागें हो. या संकीर्ण आणि विशाल मानवतेच्या किनाऱ्यावर

उभा राहून माझे बाहू पसरून दैवी मानवाला मी अभिवादन करीत आहें आणि परमानंदानें भरलेलें स्तुतिस्तोत्र मी गात आहें. या ध्येयाला केवळ ओठांनीं मान्यता देऊन भागणार नाहीं तर तें आमच्या नित्यकर्मांचा व उपासनेचा विषय बनलें पाहिजे; '' आणि म्हणूनच त्यांनीं चाळीस वर्षांपूर्वी बंगालच्या एका कोपऱ्यांत शांतिनिकेतनांत 'विश्व-भारती'ची संस्थापना केली.'यत्र विश्वं भवति एकनीडं' 'या शांतिनिकेतनांत जागतिक विद्या आणि संस्कृति यांचें केंद्र आहे. तेथें राहणारे उपासक अध्ययन–अध्यापनांत जीवन व्यतीत करीत असतात. मानवता हा एकच धर्म आहे, न्याय ही एकच उपासना आहे आणि प्रेम व ज्ञान या दोनच जीवनज्योती आहेत, असा संदेश आपल्या आचरणानें जगांतील सर्व देशांतून येथें जमलेले हे उपासक मानवाला देत आहेत.

[ आर्यन पाथ–सप्टेंबर १९४७ वरून ]

## ५ दोन अर्थशास्त्रें

आज जगांतील अर्थशास्त्रज्ञांत दोन मूलतः भिन्न दृष्टिकोनांचे विचार–संप्रदाय नांदत आहेत. या दोन अर्थशास्त्रीय संप्रदायांना सनातनी व समाजवादी अथवा व्यक्तिवादी व समाजवादी अशीं नांवें देतां येतील. मार्क्सवादी पंथानें समाजवादी अर्थशास्त्राचा पाया घातला. आज हा संप्रदाय बरीच प्रतिष्ठा पावूं लागला असून त्याची विचारसरणीहि अधिक पुरोगामी व शास्त्रीय आहे असें जुने अर्थशास्त्रज्ञहि मान्य करूं लागले आहेत. व्यक्तिवादी अर्थशास्त्रज्ञांचा संप्रदाय प्रथमतः ब्रिटनमध्येंच शास्त्रीयत्व व प्रतिष्ठा पावला. याचीं अनेक रूपांतरें होतां होतां अगदीं अलीकडे त्या संप्रदायाचें नेतृत्व थोड्याच वर्षांपूर्वी दिवंगत झालेले लॉर्ड कीन्स यांच्याकडे आलें होतें. पूर्वींच्या व्यक्तिवादी किंवा अनियंत्रणवादी अर्थशास्त्रज्ञांच्या अनेक चुका त्यांनीं मान्य करून आर्थिक व्यवहारांचें योजनापूर्वक नियंत्रण करणें समाजहिताच्या दृष्टीनें कसें आवश्यक आहे हें दाखवून देऊन औद्योगिक तेजी–मंदी आणि आर्थिक अरिष्टें कशीं व कां गुदरतात यासंबंधीं जी मीमांसा केली, तिच्यामुळें समाज–वादी अर्थशास्त्रज्ञांनी आजच्या भांडवलशाही आर्थिक व्यवहारावरील टीका आणि त्यांतून निर्माण होणारीं आर्थिक अरिष्टें यांसंबंधीं त्यांनीं केलेलें विवेचन यांना कीन्स यांनीं जणूं मान्यताच दिली आहे असें कांहीं लोक मानतात.कीन्स यांच्या वरील मीमांसेमुळें समाजवादी अर्थशास्त्रज्ञांच्या आर्थिक अरिष्टासंबंधींच्या विवेचनाला त्यांनीं मान्यताच दिली आहे असें स्थूलमानानें दिसलें तरी व कीन्सच्या मताचा आधार घेऊन समाजवादी अर्थशास्त्राचें समर्थन करणारे कांहीं अनुयायी त्यांना मिळाले असले तरी, मूलतः समाजवाद्यांच्या शास्त्रीय दृष्टिकोनाचें अद्यापि या कीन्सच्या अनुयायांना आकलन झालें नाहीं व तो कीन्सच्या अनुयायांच्या सनातनी दृष्टिकोनाहून मूलतःच कसा भिन्न आहे हें हारवर्ड युनिव्हर्सिटीपुढें एक व्याख्यान देऊन पॉल. एम्. स्वीझी ह्यांनी पुढील-प्रमाणें विशद केलें आहे. पॉल. एम्. स्वीझी यांचें असें म्हणणें आहे कीं, सनातनी अर्थशास्त्रज्ञ व मार्क्सवादी अर्थशास्त्रज्ञ यांच्या विचारसरणींत मूलतः तीन भेद आहेत:–( १ ) मार्क्सवादी अर्थशास्त्रज्ञ अर्थशास्त्राचा विचार ऐतिहासिक दृष्टीनें करीत असल्यानें प्रत्येक समाजघटनेचें एक निराळें अर्थ-शास्त्र बनत असतें असें मानतात. म्हणजे सरंजाम-शाहीचें अर्थशास्त्र निराळें, भांडवलशाहीचें अर्थ-शास्त्र निराळें आणि समाजवादी घटनेप्रमाणें अर्थ-शास्त्र निराळें असें मानून भांडवलशाही आर्थिक घटनेचें विशिष्ट स्वरूप विशद करण्यासाठीं आणि तिच्यांतील आंतरविरोधांची मीमांसा करण्यासाठीं मार्क्सवाद्यांनीं आपलें अर्थशास्त्र बनविलें आहे. त्यांचें विवेचन करतांना ते भांडवलशाहीची उत्पत्ति, वृद्धि आणि विनाश यांचीं कारणें दाखवून देतात. याच्या उलट सनातनी अर्थशास्त्रज्ञ ( आणि यांत कीन्सचे अनुयायीहि येतात ) आपल्या अर्थशास्त्रीय सिद्धांतांचें विवेचन करतांना हे सिद्धान्त जणूं काय सर्वच सामाजिक घटनांना सारखेच लागू पडतील, अशा वृत्तीनें बोलत व लिहीत असतात. प्रत्येक समाजघटनेचे आर्थिक व्यवहार भिन्न भिन्न तत्त्वा-नुसार चाललेले असतात याची यथातथ्य जाणीव ठेवून ते लिहीत नसल्यामुळें त्यांनीं आजच्या भांडव-लशाही युगांतील व्यवहारांची मीमांसा अथवा त्यांचा उलगडा करण्यासाठीं जे सिद्धांत सांगितले ते











सनातन असून कोणत्याहि समाजघटनेस तेच लागू पडतील, अशी भूल पडते. आणि त्यांनीं ज्या भांडवलशाही आर्थिक घटनेचें विवेचन केलेलें असतें, ती आर्थिक घटना व तिचे व्यवहार हे सनातन, शाश्वत व त्रिकालाबाधित आहेत, असा भ्रम वाचकांना होऊं लागतो. (२) या अर्थशास्त्राच्या मूलभूत दृष्टिकोनांत दुसरा मतभेद असा आहे कीं मानवाची मनोरचना व त्याची वृत्तिहि समाजघटनेनुसार व त्या त्या व्यक्तीच्या सामाजिक वर्गानुसार अथवा त्या वर्गाच्या सामाजिक स्थानानुसार बदलत असतात, याची जाणीव ठेवून सनातनी अर्थशास्त्रज्ञ बोलत नाहींत अथवा विचार करीत नाहींत. उदाहरणार्थ,मानवी अंतःकरणांत भोगवृत्ति व संग्रहवृत्ति असतात असें हे म्हणतील. आर्थिक अरिष्टांचें परिमार्जन करण्याचें विवेचन करतांना अथवा त्यावर उपाय सुचवितांना समाजांत आतां भोगवृत्ति वाढवा अथवा संग्रहवृत्ति वाढवा, असा उपदेश ते करतील. पण तसें करतांना कोणत्या परिस्थितींत मानवाची भोगवृत्ति वाढते व कोणत्या परिस्थितींत त्याची संग्रह–वृत्ति वाढते, याचें विवेचन ते करणार नाहींत. भांडवलदारवर्ग भोग कमी करतो व संग्रह वाढवितो, तेव्हां तो त्या संग्रहापासून पुढें किती टक्के नफा मिळेल याचा विचार करीत असतो; आणि कामगारवर्ग आजचा भोग कमी करून संग्रह करतो तेव्हां भावी आपत्कालासाठीं तरतूद करण्याच्या वृत्तीनें तसें करीत असतो. या दोन व्यवहारांचीं प्रेरक कारणें व परिणाम भिन्न असतात हें लक्षांत न घेतां सर्वच वर्गांतील व्यक्तींना उद्देशून "जनता" असा शब्द हे सनातनी अर्थशास्त्रज्ञ योजतील व या 'जनते'नें भोगवृत्ति अथवा संग्रहवृत्ति वाढवावी किंवा कमी करावी असा उपदेश ते करतील किंवा या वृत्ती वाढल्याचे अथवा कमी झाल्याचे अमुक अमुक परिणाम घडतात असें सांगतील. सामाजिक घटना व त्यांतील स्थान व संबंध यांना अनुसरून मनुष्य–स्वभावाची घटना बदलत असते या समाजवादी अथवा मार्क्सवादी सिद्धांताकडे सनातनी अर्थशास्त्रज्ञांचें पुरेसें लक्ष अद्यापि जात नाहीं. (३) या दोन अर्थशास्त्रांच्या दृष्टिकोनांत तिसरा असा महत्त्वाचा भेद आहे कीं राज्यघटना, आर्थिक घटना व एकंदर सामाजिक घटना यांचे व्यवहार एकमेकांत कसे गुंतलेले व परस्परांशीं निगडित झालेले असतात, हें या अर्थशास्त्रज्ञांच्या बरोबर लक्षांत येत नाहीं. आर्थिक घटनेंत ज्या वर्गाला वरिष्ठ स्थान असतें, त्या वर्गाचें वर्चस्व राज्यघटनेवरहि पडत असतें; आणि असें वर्चस्व असणाऱ्या राज्ययंत्राकडून आर्थिक व्यवहाराचें नियंत्रण कितपत व कशा प्रकारें होऊं शकेल याचा खोलवर विचार न करतां, हे समाजाला व सरकारला अमुक अमुक दिशेनें आपलें धोरण व वर्तन सुधारा असा उपदेश करीत असतात. केवळ न्यायदृष्ट्या किंवा तर्कशास्त्रदृष्ट्या कीन्सप्रभृति सनातनी अर्थशास्त्रज्ञांनीं सुचविलेल्या अनेक सुधारणा आणि अरिष्ट–प्रतिबंधक अथवा अरिष्ट–निवारक उपाय मोहक व आकर्षक वाटतात. त्यांत मालकवर्गानें आपलें धन कमी करून मजूरवर्गाचें धन वाढविण्यास साह्य करावें अथवा अशा कायदेशीर नियंत्रणास पाठिंबा द्यावा अशी अपेक्षा केलेली असते. पण ज्या समाजाच्या आर्थिक घटनेवर भांडवलदारवर्गाचें प्रभुत्व असेल, त्या समाजांतील राज्ययंत्र असे नियंत्रक कायदे करील का अथवा ते केल्यास त्यांची बजावणी योग्य प्रकारें करण्याची इच्छा अथवा शक्ति अशा राज्ययंत्रांत येऊं शकेल काय, याचा पुरेसा विचार हे अर्थशास्त्रज्ञ करीत नाहींत.

कीन्सच्या अनुयायांची अर्थशास्त्रीय मीमांसा सनातनी अर्थशास्त्रज्ञांच्या विकासाच्या दृष्टीनें बरीच पुरोगामी व सुधारणावादी असल्यानें ती अर्थशास्त्रीय इतिहासांत क्रांतिकारक गणली जाते. अशा वेळीं मार्क्सवादी अर्थशास्त्र व सनातनी अर्थशास्त्र यांच्या मूलभूत दृष्टिकोनांतील भेदांचें हें जें मार्मिक विवेचन केलें आहे तें विचारप्रबोधक आहे.

['सायन्स ॲन्ड सोसायटी', समर नंबर १९४७, प्रॉ. एम. स्वीझी यांच्या व्याख्यानाचा सारांश.]








# साभार स्वीकार

खालील वृत्तपत्रें व नियतकालिकें ' नवभारता'चे परतभेटीस येत आहेत, त्याबद्दल ' नवभारत ' त्यांचा अत्यंत आभारी आहे.

**दैनिकें:—**

**लोकमान्य:**—सं. श्री. पां. वा. गाडगीळ, जन्मभूमि मुद्रणालय, १३६–४२, मेडोज स्ट्रीट, फोर्ट मुंबई.

**नवशक्ति:**—सं. श्री. प्रभाकर पाध्ये, २१, दलाल स्ट्रीट, फोर्ट, मुंबई.

**कर्तव्य:**—सं. सानेगुरुजी, १९, गिरगांव रोड, सोमण बिल्डिंग, मुंबई ४.

**लोकशक्ति:**—सं. श्री. ह. मो. जोशी, ४०५, नारायण पेठ, राजगुरु प्रेस, पुणें.२.

**साप्ताहिकें:—**

**मौज:** —सं. श्री. वि. पु. भागवत, मौज प्रिंटिंग ब्यूरो, गिरगांव, मुंबई ४.

**झंकार:**—सं. श्री. वि. श्री. मोडक, ५७५, शनिवार पेठ, पुणें २.

**लोकयुग:**—सं. श्री. एम्. वी. राव. न्यू एज प्रिंटिंग प्रेस, १९० बी. खेतवाडी मेनरोड, मुंबई ४.

**जनवाणी:**—सं. श्री. ना. ग. गोरे व श्री. मा. ग. बुद्धिसागर. ६२३।२७ देशमुखवाडी सदाशिव पेठ, पुणें २

**लोकमत:**—सं. श्री. र. के. खाडिलकर, लोकमत कार्यालय ३००-ब. नारायण पेठ, पुणें. २

**स्वदेश:**— सं. श्री. वि. ना. शिरवाडकर व श्री. रमाकांत वेलदे, सुदर्शन प्रेस, रविवार पेठ, नाशिक.

**संघशक्ति:**—सं. श्री. व्यं. शि. भारदे. गरुडवाडा, आनंदी बाजार, अहमदनगर.

**अखंड भारत:**—सं. श्री. माधवराव बागल. प्रभाकर प्रेस, राजारामपुरी, कोल्हापूर.

**सुराज्य:**—सं. श्री. बा. गो. गावंडे, गुरुदेव मुद्रणालय, महाल नागपूर.

**समाधान:**—संचा० श्री. प्रा. श्री. ना. बनहट्टी, नारायण मुद्रणालय, धनतोली, नागपूर.

**आझाद हिंद:**—सं. भाई राम निसळ, सातभाई गल्ली, अहमदनगर

**मासिकें:—**

**किर्लोस्कर:** — सं. श्री. शं. वा. किर्लोस्कर, किर्लोस्कर बंधु लि. किर्लोस्करवाडी.

**स्त्री:**—सं. श्री. शं. वा. किर्लोस्कर, किर्लोस्कर बंधु लि. किर्लोस्करवाडी.

**मनोहर**:—सं. श्री. शं. वा. किर्लोस्कर: किर्लोस्कर-बंधु लि. किर्लोस्करवाडी.

**सह्याद्रि**:—सं. श्री. दि. वि. काळे, एम्. ए. 'केसरी' मुद्रणालय, ५६८ नारायण पेठ, पुणें २.

**प्रसाद** :—सं. प्राचार्य शं. वा. दांडेकर; श्री. स. आ. जोगळेकर, एम्. ए. एल्एल्. बी., श्री. य. गो. जोशी 'प्रसाद' प्रकाशन, ६२३।१५ सदाशिव पुणें २.

**सत्यकथा**:—सं. श्री. वि. पु. भागवत. मौज प्रिंटिंग-ब्युरो खटाववाडी. मुंबई ४.

**वाङ्मयशोभा**:—सं. श्री. म. म. केळकर. वाङ्मयशोभा कार्यालय १९६:८६ सदाशिव पेठ, पुणें २.

**अभिरुचि**:—सं. सौ. विमल चित्रे, श्री. पु. आ. चित्रे, आत्माराम प्रिन्टिंग प्रेस बडोदें.

**रोहिणी**:—सं. प्रा. श्री. म. माटे. 'रोहिणी' कार्यालय ५५४सदाशिव पेठ, पुणें २.










# सामार स्वीकार

**महात्मा:**—सं. श्री. दा. न. शिखरे. ' महात्मा ' कार्यालय, नातूबाग, सदाशिव पेठ, पुणें २.

**पूजा:**—सं. श्री. ना. रा. शेंडे, मार्गदर्शक: श्री. ग. त्र्यं. माडखोलकर. ' पूजा ' कार्यालय, धावडे–भुवन, धनतोली, नागपूर.

**वसंत:**—सं. श्री. दत्तप्रसन्न काटदरे, ' वसंत ' कार्यालय. ८७ चर्नी रोड मुंबई ४

**श्रीगुरुदेव:**—सं. श्री. रामचंद्र कानडी, श्री. सुदाम सावकार, संचालक श्री. तुकडोजी महाराज श्री गुरुदेव कार्यालय अमरावती वऱ्हाड.

**व्यापार-उद्योग:**—सं. श्री. अविनाश मोहाडीकर, १० गंगानिवास, रानडेरोड, दादर ( बी. बी. ) मुंबई १४.

**सेवक:**—सं. श्री. कुंदर बळवंत दिवाण. ग्रामसेवा मंडळ, नालवाडी, वर्धा

**उद्यम:**—सं. श्री. वि. ना. वाडेगांवकर. ' उद्यम ' कार्यालय, धरमपेठ, नागपूर.

**चित्रमयजगत्:**— सं. श्री. त्र्यं. र. देवगिरिकर, चित्रशाळा प्रेस, १०२६ सदाशिव पेठ, पुणें २

**ध्रुव:**— सं. श्री. रा. प्र. कानिटकर, चित्रशाळा प्रेस, १०२६ सदाशिव पेठ, पुणें २

**हिंद**—: सं. श्री. न. मो. जोशी, हिंद मुद्रणालय, आंग्रेवाडी, मुंबई ४

## द्वैमासिक:—

**साहित्य**—सं. श्री. वा. रा. ढवळे, मुंबई मराठी साहित्य संघ, ' सरस्वती ', मुंबई ४.

## त्रैमासिक:—

**महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका**—सं. श्री. य. दि. पेण्ढरकर, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणें २.

**तत्त्वज्ञान मंदिर:**—सं. श्री. दि. सा. नाईक, तत्त्वज्ञानमंदिर कचेरी, अमळनेर.

## हिंदी मासिक:—

**राष्ट्रवाणी:**—सं. श्री. गो. प. नेने, महाराष्ट्र राष्ट्रसभा, पुणें २

## गुजराथी मासिक:—

**शिक्षण अने साहित्य:**—सं. जुगतराम दवे, गोपालदास पटेल ठाकोरभाई देसाई, मणिभाई देसाई, नवजीवन, अहमदाबाद.

---

अनुक्रमणिका

वर्ष पहिलें
अंक सातवा

# नवभारत

एप्रिल
१९४८

# औद्योगिक-वृत्त विशेष

( पॅरामाऊंट पब्लिसिटी सिंडिकेट लि० मार्फत )

—सांगलीची **श्री गजानन मिल** गेल्या दंगलींत जाळण्यांत आली. ती नुकसानी लक्षांत घेऊन गिरणी सुरू व्हावी या हेतूनें सांगलीच्या राजशासन मंडळानें सदर गिरणीला गेल्या तीन वर्षांत द्यावा लागणारा प्राप्तीवरील कर माफ केला आहे. सांगलींत झालेल्या सहा कारखान्यांच्या नाशामुळें १०००० कामगार बेकार झाले.

—गेल्या दंगलींत सांगली येथील **"दांडेकर बंधूंचा मशिनरीचा कारखाना"** शाबूत राहिला असून कारखान्याचें कांहींहि नुकसान झालें नाहीं. सिंगापूर येथें भरणाऱ्या प्रदर्शनाकरितां सरकारतर्फें दांडेकर बंधूंची चक्की पाठविण्यांत आली आहे.

—मुंबईजवळ विक्रोली येथें मे. **ओगले ग्लास वर्क्स** हे अद्यावत् यंत्र सामुग्रीनें सज्ज असा कांचेचा कारखाना सुरू करीत आहेत.

—दक्षिण महाराष्ट्रांतलि अशांत वातावरण लक्षांत घेऊन सातारा रोड येथील **"कूपर एंजिनीअरिंग वर्क्सचें"** स्थलांतर मुंबईस करण्याचा चालकांचा विचार चालू असल्याचें कळतें.

**मे. पांडुरंग ॲग्रिकल्चरल प्रॉडक्ट्स्** कुरोली, व्हाया कुर्डुवाडी--यांचा पहिल्या वर्षाचा ताळेबंद व नफातोटा पत्रक भागिदारांच्या सभेंत मंजूर झालें. खर्चवेच वजा जातां कंपनीस रु. ९३०६ निव्वळ नफा उरला. कंपनीनें साध्या भागांवर करमाफ १० टक्के व अग्रभागांवर करमाफ ५ टक्के नफा वांटण्याचें उरविलें आहे. कंपनीनें पहिल्या वर्षाअखेरलाच वाटलेल्या या मोठ्या नफ्यावरून तिच्या यशाची कल्पना येईल.

—**पंपा कॉटन मिल्स् लि.** बेळगांव हा ७० लक्ष रुपये अधिकृत भांडवलाची कंपनी स्थापन झाली असून ती गिरणीचें सूत व कापड काढणार आहे. श्री. डी. एस्. अंबेकर हे कंपनीचे पहिले डायरेक्टर आहेत.

—सरदार गं. ना. मुजुमदार यांच्या संचालकत्वाखालीं अहमदनगर येथें **दी एज्युकेशनल अँड इंडस्टियल सीनेटोन लि.** या कंपनीची स्थापना झाली असून चित्रपटद्वारां जनतेला साक्षर करणें हें कंपनीचें प्रमुख ध्येय आहे. श्री. जी. आर. अत्रे वकील हे कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर आहेत.

**आयडियल ड्रग्ज लि.** मुंबई नं. २६--ही दहा लक्ष रुपये अधिकृत भांडवलाची कंपनी अव्वल दर्जाची औषधें तयार करण्यासाठीं स्थापन झाली असून डॉ. जी. आर. कोकटनूर हें कंपनीस अध्यक्ष लाभले आहेत.

—**कैसरी इंडस्ट्रियल्स् लि** अहमदनगर-- ह्यांनीं कैसोचे सुवासिक 'कॅस्टर ऑईल नवीनच बाजारांत आणलें असून तें गिऱ्हाइकांना विशेष पसंत पडलें आहे. हे एरंडेल श्री. डी. आर. कैसरी, कैसो पर्फ्युमरीचे मालक ह्यांनीं तयार केलें आहे.

—जबलपूर येथील आयुर्वेदीय संमेलनाचे प्रसंगीं भारत वनस्पति फार्मसीनें- मंचर, जि. पुणें, भीमाशंकर येथील ताज्या वनस्पति व तेलें मांडली होती.

—नाशिक, येथील सरकारी डिस्टिलरी कालांतरानें पॉवर अल्कोहल निर्मितीचें केंद्र होईल. दख्खनमधील साखरेच्या कारखान्यांतून या उत्पादनासाठीं सालिना सुमारें २०,००० टन काकवी मिळूं शकेल. पेट्रोलच्या टंचाईच्या कालांत मुंबई प्रांतास स्वयंपूर्णतेच्या दृष्टीनें पॉवर अल्कोहलच्या उत्पादनाचें महत्त्व पटणारें आहे.

—रूरकी येथें—ता.९ ते २४ एप्रिल पर्यंत अ. भा. इंजिनिअरिंग व इंडस्ट्रियल एक्झिबिशन भरणार आहे.

—गत वर्षी इंग्लंडहून हिंदुस्थानांत तीन लाखांवर सायकली आल्या. याच सालांत हिंदुस्थानांत ७०,००० सायकली तयार झाल्या,

**मगनलाल अँड सन्स्**—लोणावळें—या ८० वर्षांच्या जुन्या कारखान्यानें पिस्ता, बदाम, काजू, शेंगदाणा इत्यादि बारा प्रकारची चिक्की (टॉफी) तिचा स्वादिष्ट व टिकाऊपणामुळें पारशी, ख्रिश्चन व युरोपियन समाजांतही लोकप्रिय केली असून तिला हिंदुस्थानच्या कानाकोपऱ्यांतून मागणी आहे.






चिक्काची मोठ्या प्रमाणांवर आधुनिक पद्धतीनें व्यापार करणारी महाराष्ट्रांतील ही पहिलींच फर्म आहे.

—अमेरिकेंत जाहिरातीवर एकूण खर्च सालिना सुमारें सहा अब्ज रुपये होतो. हिंदुस्थान, पाकिस्तान व सीलोन मधील वृत्तपत्रांतून १९४७ च्या जुलै ते डिसेंबर या सहामाहींत रु. ७०७९९३७ मालाचे जाहिरातींवर खर्च झाले.

—पंचवीस लक्ष रुपये अधिकृत भांडवलाची " सकाळ पेपर्स लि. " ही खाजगी कंपनी नुकतीच स्थापन झाली असून तिचे पहिले डायरेक्टर डॉ. ना. भि. परुळेकर हे आहेत. मुद्रण व प्रकाशन हें कंपनीचें कार्य राहील.

—व्यापारी वर्गाला प्रवास वारंवार करावा लागतो. प्रवास याच विषयाला वाहिलेलें " **भारतीय प्रवासी** " पोस्ट बॉक्स नं. ५४३ पुणें २ हे इंग्रजी, मराठी पाक्षिक तारीख १०-४-४८ पासून पुन्हा नियमित सुरूं होणार असून उद्योग धंद्यांतील मंडळींनीं प्रवासाबाबत त्यांचे अनुभव, तक्रारी वगैरे पाठविल्यास त्याचा परामर्ष घेतला जाईल.









अनुक्रमणिका

Regd. No. B. 5177

गांधी-तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांसाठीं

# आमचीं आदर्श प्रकाशनें

**सत्याचे प्रयोग** अर्थात् **म. गांधींची आत्मकथा**
( नवी आवृत्ति छापत आहे )

| | |
|---|---|
| **उपनिषदांतील दहा गोष्टी** ( तृतीयावृत्ति ) :— शंकरराव देव | रु. ।॥. |
| **जवाहरलाल नेहरू** : आत्मचरित्र ( द्वितीयावृत्ति ) | रु. १२॥ |
| **भारतीय संस्कृति** ( चतुर्थावृत्ति ) :— साने गुरुजी | रु. ३॥ |
| **गांधीजींचें विविध दर्शन** ( द्वितीयावृत्ति ) :— डॉ. राधाकृष्णन् | रु. २॥ |
| **जिवंत व्रतोत्सव** ( द्वितीयावृत्ति ) :— आचार्य कालेलकर | रु. ३॥। |
| **सत्याग्रही महाराष्ट्र** :— प्रेमा कंटक | रु. ३ |
| **अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ?** ( द्वितीयावृत्ति ) :— जॉन रस्किन | रु. २ |
| **जीवन-दर्शन** ( तृतीयावृत्ति ) :— खलिल जिब्रान | रु. १॥। |
| **बापू** :— घनश्यामदास बिडला | रु. १॥ |
| **संस्कृतीचें भवितव्य** ( द्वितीयावृत्ति ) :— डॉ. राधाकृष्णन् | रु. १। |
| **महात्मा गौतम बुद्ध** :— डॉ. राधाकृष्णन् | रु. १ |
| **जीवन आणि साहित्य** :— आचार्य भागवत | रु. २॥ |
| **संयम कीं स्वैराचार ?** :— महात्मा गांधी | रु. १॥। |
| **हिंदु-मुसलमान-ऐक्य** :— आचार्य जावडेकर | रु. ३ |
| **गीता-हृदय** ( तृतीयावृत्ति ) :— साने गुरुजी | रु. ।॥. |
| **हिंदूंचें समाजकारण** :— आचार्य कालेलकर | रु. २। |
| **काँग्रेस-कथा** ( द्वितीयावृत्ति ) :— गो. आ. देशपांडे | रु. ४॥ |
| **भगवान् बुद्धासाठीं** :— शंकरराव देव | रु. ३॥ |
| **आचार्य कृपलानी** :— निवडक लेख व भाषणें | रु. ३ |
| **वाल्मिकी-आश्रमांतील प्रवचनें** : — आचार्य जावडेकर | रु. १ |
| **संपूर्ण स्वदेशी** — : महात्मा गांधी | रु. २। |
| **लो. टिळक व महात्मा गांधी** :— आचार्य जावडेकर | रु. २ |
| **पत्री** :— साने गुरुजी | रु. ३॥ |

**सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला**, पुणें २.







